# भगवच्चिंतन

श्री. सिध्देश्वर स्वामीजी

श्री. ज्ञानयोगाश्रम विजापूर

अनुवादक : प्रा. श्रीकांत अरळी संकेश्वर.

श्री. गुरुदेवाश्रम कागवाड, जि. बेळगांव.

मूल्य ५० रूपये.

**Bhagavachchintan**

Spiritual discourse by : H. H. Shri. Siddheshwar Swamiji
Shri Dnyanyogashram, Bijapur.

Translated in Marathi by : Prin. Shrikant G. Arali, Sankeshwar.

Published by : Shri. Gurudevashram Kagwad,
Dist Belgaum

@ Fist Edition 1999
@ Second Edition 2000

Price : Rs. 50/-

Printed by : Shri. Durudundeeshwar Offset Printers,
Sankeshwar.
Phone (08333) 73504.

# प्रस्तावना

परम पूज्य श्री. सिध्देश्वर स्वामीजी, ज्ञानयोगाश्रम विजापूर यांनी आपले संपूर्ण जीवन अध्यात्म ज्ञानाच्या प्रसारांत व्यतीत केले. बालवयांतच भगवंताचा शोध घेत, सर्व संग परित्याग करून लिंगैक्य वेदान्त केसरी श्री. मल्लिकार्जुन महास्वामी महाराजांच्या सन्निधी आले. श्री. मल्लिकार्जुन महास्वामीजीनी आपल्या जीवनाद्यंत केलेल्या तपश्चर्येची सिध्दी श्री. सिध्देश्वरांना प्रदान केली.

शिवयोग साधने बरोबरच वेदांत, सिध्दांत, व्याकरण, न्याय, योग, उपनिषदें, भगवद्‌गीता, कन्नड वचन साहित्याचे श्री. सिध्देश्वर स्वामीजीनी सखोल अध्ययन केले. पौर्वात्य व पाश्चात्य तत्वज्ञान, मानसशास्त्र, तर्कशास्त्र या विषयांत 'श्री'नी एम. ए. पदवी मिळविली. जगांतील सर्व धर्मग्रंथांचे सखोल अध्ययन केले. समाजवाद, गांधीवाद, भांडवलशाही, राजशाही, लोकशाही इत्यादि सामाजिक वादांचाही 'श्री'नी अभ्यास केला.

निसर्ग–विज्ञान–समाज आणि अध्यात्म यांचा समन्वय करून 'श्री'नी कर्नाटक व महाराष्ट्रांत सर्वत्र संचार करून प्रवचनांद्वारे जन जागृती केली. गरीब, श्रीमंत, उच्च–नीच भेदभाव न मानतां हजारो भक्तांना आत्मज्ञान–आत्मानंद आणि समाधान प्रदान केले.

मधुर भाषी, सरळ स्वभावाचे 'श्री' विनयशील आणि सर्वांना आपलेसे वाटतात. पाश्चात्य राष्ट्रांच्या आमंत्रणावरून 'श्री'नी परदेशांतही व्याख्याने दिली आहेत.

श्री. सिध्देश्वर स्वामीजींच्या प्रवचनांचा लाभ दक्षिण कर्नाटकांत

व्हावा या उद्देशाने परमपूज्य श्री. मन्महाराज राजगुरुतिलक जगद्गुरु डॉ. श्री. शिवरात्रि देशिकेंद्र महास्वामी महाराज सुत्तूर मठ 'श्री'नी सुत्तूर, म्हैसूर, कोळ्ळेगाल वगैरे भागांत श्री. सिध्देश्वर स्वामीजींच्या प्रवचनांचे आयोजन केले. आतांही करीत आहेत.

१९९१ साली श्रावण मासांत सुत्तूर जगद्गुरु श्री. शिवरात्रीश्वर मठामध्यें अत्यंत गहन अशा अध्यात्म ज्ञानावर दि. १२-८-१९९१ पासून दि. १२-९-१९९१ पर्यंत श्री. सिध्देश्वर स्वामीजीनी एक महिनाभर प्रवचन केले.

अत्यंत साधे, सरळ स्वभावाचे, सज्जनतेची साकार मूर्ति अशा श्री. सिध्देश्वर स्वामीजींच्या अमृतवाणींत श्रोतृवर्ग आनंदाने देहभान विसरून जात असे. निसर्गावर नितांत प्रेम करून; निसर्गाच्या सानिध्यांत राहून सरळ जीवन कंठून भगवच्चिंतन केल्याने आत्मसाक्षात्कार होतो. भगवंताची करुणा आपणांस लाभते. याचा प्रत्यय श्रोतृवर्गाला आला. या प्रवचनांचा लाभ सर्वांना व्हावा या उद्देशाने या प्रवचनांचे ध्वनिमुद्रण करून ग्रंथांत रूपांतर केले. १९९३ साली प्रथम कन्नड भाषेंत प्रसिध्द झालेल्या 'भगवच्चिंतन' पुस्तकाच्या प्रति हातोहात खपल्या. कन्नड भाषेंतील 'भगवच्चिंतन' वाचतां न आल्याने निराश झालेल्या मराठी भाषिकांना हा अमृतकुंभ देण्याच्या उद्देशाने श्री मज्जगद्गुरु श्री. मन्निरंजन प्रवण स्वरूपी श्री. शिवलिंगेश्वर महास्वामी महाराज सिध्द-संस्थान मठ निडसोसी स्वामी महाराजांनी या ग्रंथाचा मराठी अनुवाद १९९६ साली प्रसिध्द केला.

मराठी भाषिकांनी अत्यंत प्रेमाने या ग्रंथाचे स्वागत केले. प्रथम आवृत्तीच्या सर्व प्रति संपल्या. आतां ही दुसरी आवृत्ति श्री. गुरुदेवाश्रम कागवाड, जि. बेळगांव या संस्थेच्या वतीने प्रसिध्द होत आहे.

या ग्रंथाचे अनुवादक सेवानिवृत्त प्राचार्य श्रीकांत अरळी संकेश्वर (हल्ली मुक्काम कणगला) हे १९६० सालापासून लिं. श्री. मल्लिकार्जुन महाशिवयोगीश्वरांचे सन्निधी होते. आपल्या हायस्कूल व कॉलेजांतील अध्यापना बरोबरच सुटीचा सर्व काळ लिं. श्री. मल्लिकार्जुन स्वामी महाराजांच्या सेवेंत कंठून सिध्दांत शिखामणि, अक्कमहादेवी इत्यादि ग्रंथ मराठींत आणले. सध्यां श्री. सिध्देश्वर स्वामीजींच्या प्रवचनांचे ग्रंथ 'भगवच्चिंतन' 'मी कोण आहे ?' 'भक्तियोग' यांचा मराठी अनुवाद प्रा. अरळी यांनी केला आहे. महात्मा बसवेश्वर, अक्कमहादेवी या शिवशरणांच्या वचनांचा मराठी अनुवाद सुध्दां त्यांनी केला आहे. अनेक वर्षे लिंगैक्य श्री. मल्लिकार्जुन महास्वामीजी व श्री. सिध्देश्वर स्वामीजींच्या सानिध्यांत भगवच्चिंतन केल्याने प्रा. श्रीकांत अरळी यांची भाषा प्रासादिक साधी-सोपी-सुंदर हृदयाला स्पर्श करणारी मधुर अशी झाली आहे.

पूज्य श्री. सिध्देश्वरांच्या प्रवचनांवर आधारित अध्यात्म ग्रंथ घाई-घाईने एकदां वाचून संपविले तर त्यांची गोडी समजणार नाही. खडीसाखर तोंडात ठेवावी. ती जस जशी विरघळेल तस तशी त्याची गोडी चाखावी. त्याप्रमाणें वरचेवर या ग्रंथांचे सावकाश वाचन करून मनन चिंतन केल्यास आत्मानंदाचा प्रत्यय सर्वांना येईल.

श्री. दुरुदुंडीश्वर ऑफसेट प्रिंटर्स संकेश्वर यांनी या ग्रंथाचे सुंदर मुद्रण केले. त्यांनाही धन्यवाद.





आपण क्षणा-क्षणाला कसले-ना-कसले तरी चिंतन करीतच असतो. एखादी वस्तु आपल्या डोळ्यांना दिसली, ती वस्तु आपणांस हितकारक वाटली; तर आपले मन त्या वस्तुच्या चिंतनांत गुंतते. ते चिंतन तेवढ्यांतच थांबेल अथवा आपले अंतिम फळ मिळवून देईल. फल-प्राप्ति होई पर्यंत चिंतन चालले तर ते पूर्ण चिंतन होय ! फल न देतां मध्यंतरीच थांबले तर ते अपूर्ण चिंतन ! विषय चिंतन असो वा भगवत् चिंतन, ते जर प्रासंगिक असेल; आपल्या अंतरंगात ओतप्रोत भरून राहिले नाही तर ते चिंतन इच्छित फळ देणार नाही.

चिंतनामध्ये तीन (प्रकार) अंग. पहिले **अनन्य ममता** अथवा उत्कट प्रेम. चिंतनीय वस्तूमध्यें **अतुलनीय ममता** (उत्कट जिव्हाळा) दुसरे **अविच्छिन्न तन्मयता** (एकाग्र तन्मयता) विच्छिन्न न होणारी अखंड निमग्नता. तिसरे **आनंदानुभूति**-वस्तू समालीनतेने होणारा निर्मल आनंदाचा अनुभव ! चिंतन लौकिक असो वा अलौकिक; हे तीन अंग त्यामध्ये असतात.

**✻ पहिले अंग : अनन्य ममता !**

ज्याचे चिंतन करायचे ती व्यक्ति असो वा वस्तु असो, त्यावर अत्यंत प्रेम ! ही प्रीती जितकी गाढ होईल, तिलकीच चिंतनाची गहनता वाढत्त जाते.

सामान्य प्रेम प्रासंगिक, क्षणिक आणि अस्थिर. अनन्य प्रेम तसे नव्हे. ते सर्वकालिक, सुस्थिर : प्रेम पात्रासाठी प्राण त्याग करण्याची सुध्दां मनाची तयारी ! इतके गाढ असते ते !

**कथा :** एक धनलोभी जंगलांत एका संताला भेटला. धनाविषयी त्याचे प्रेम जाणून संत म्हणाला,

''इथे समीपच एक गुहा आहे. त्या गुहेंत हिरे-माणके-मोती यांचे ढीगच्या-ढीग विखुरले आहेत. तूं त्या गुहेत जा. तुला तृप्ति होईल तितकी रत्ने गोळा करून घे. मात्र एक गोष्ट लक्षांत ठेव. सूर्य बुडायच्या आंत तूं बाहेर आले पाहिजे. नाही तर तूं प्राणाला मुकशील.''

धनलोभी माणसाला अतोनात हर्ष झाला. संताला वंदन करून त्याने दाखविलेल्या मार्गाने तो गुहेंत शिरला. पाहतो तों काय ?

जिकडे पाहावे तिकडे चम-चम-चमकणारी रत्नेच रत्ने ! आनंदाने देहभान विसरून गेला. त्याला वेड लागायचे तेवढे शिल्लक राहिले. त्याने अधाशीपणानें रत्ने गोळा करायला सुरूवात केली. एकाहून एक लख-लखणारे रत्न ! तहान भूक विसरून तो रत्ने गोळा करीतच राहिला. सूर्य अस्ताला जाण्याचा क्षण जवळ आला. त्याने गोळा केलेली रत्ने गाठोड्यात बांधली. बाहेर अंधार पसरू लागला. गुहेंत मात्र रत्नांचा सौम्य प्रकाश पसरला होता. त्याने गोळा केलेली रत्ने बांधून घेतली; अन् तो बाहेर जाण्यास सिध्द झाला. पण त्याचा धनलोभ सुटेना.

''का जावे ? कोठे जावे ? ज्याच्यासाठी जगायचे ते धन जिकडे पहावे तिकडे असतांना, ते सर्व आपल्या मालकीचे असतांना ते टाकून बाहेर जाऊन

करायचे तरी काय ? जीवनाचे परम ध्येय जे द्रव्य संपादन... ते आपल्या स्वाधीन झाल्यानंतर प्राण राहिले तरी काय ? अन् गेले तरी काय ?''

प्राणांहून अधिक धनप्रेम. संपत्तीच्या सागरांत हर्षोन्मत्त होऊन त्याने प्राण अर्पण केले ! याला म्हणावे अनुपम-अनन्य प्रेम ! मरणांतसुध्दां सुख देणारी ! ममता.

या धनलोभी माणसाला जसे धनाविषयी आत्यंतिक प्रेम; तसेंच भगवंताच्या ठिकाणी, सत्याविषयीं असदृश्य प्रेम असेल तर ते भगवत्-चिंतन होय ! चिंतनाचे अत्यंत महत्वाचे असे प्रथमांग !

*** दुसरे अंग : अविच्छिन्न तन्मयता !**

सुचिंतनीय वस्तूच्या आठवणींत, त्या वस्तूच्या चिंतनांत मन निमग्न होणे; हीच तन्मयता. ती विच्छिन्न होऊं नये. जलधारेप्रमाणे अखंड असावी. भिन्न उद्देश्य, अन्य विषयांची आशा, त्या तन्मयतेला बिघडवूं नये. कवि निसर्ग सुंदर स्थळीं जसा रममाण होतो; कलाकार जसा सौंदर्य निर्मितीमध्ये, संगीतकार जसा नाद माधुर्यांत तन्मय होतो; तशी तन्मयता कार्यसिध्दीला कारण.

**कथा :** एक झेन गुरु. सुप्रसिध्द ज्ञानी, कलानुरागी. एकदां तो भगवान बुध्दाचे चित्र रंगवायला बसला. बाजूला त्याचा शिष्य उभा होता. गुरुचे चित्रीकरण पहात. चित्र पूर्ण झाले.

''कसे आहे चित्र ?'' गुरु म्हणाले.

''क्षमा असावी गुरुजी, म्हणावे तितके चांगले नाही.'' शिष्य म्हणाला.

गुरुने पुनः पुनः चित्र रचनेचा प्रयत्न केला. पन्नास-साठ वेळा चित्र चितारले गेले. तृप्ति नाही. रंग संपत आला. शिष्य रंग बनवून आणायला बाहेर गेला. तेवढ्यांत गुरुने असेल तेवढ्याच रंगात एक चित्र चितारले. क्षणार्धात चित्र पूर्ण झाले. शिष्य आला. त्याने पाहिले.

''गुरुजी, अद्‌भुत! किती सुंदर कृति ही! न भूतो न भविष्यती असे हे सुंदर चित्र! क्षणार्धातच आपण हे चित्र चितारले ना ? ते कसे ?''

''शिष्या, साठ वेळां मी चित्र रचिले तेव्हां तूं पहात होतास. त्याची जाणीव माझ्या एकाग्रतेला भंग करीत होती. तूं बाहेर जातांच मी मुक्त झालो. मी चित्र रचना करतो. हा भावच नाहीसा झाला. तेथे तूं नव्हतास. मी नव्हतो. पाहणारा नाही. रेखाटणारा नाही. गुरु नाही. शिष्य नाही! केवळ बुध्द! केवळ रेखाटण्याची क्रिया! या अप्रतिम तन्मयतेच्या क्षणीं ही अनुपम रचना झाली. ही अविच्छिन्न तन्मयता! हेच कार्य-सिध्दीचे मूळ!''

भगवत् चिंतनही तसेच. कोणीतरी पहात आहे, ''मी आराधना-स्मरण-चिंतन करतो.'' हा भाव नाहीसा होऊन केवळ देवभाव राहिला तर ती तन्मयता होय!

### ✻ तिसरे अंग : आनंदानुभूति!

प्रियतम वस्तुमध्ये मन मग्न होऊन त्या वस्तूशी समरस होते. त्या क्षणी विलक्षण आनंद उद्‌भवतो. ही आनंदानुभूती.

अरण्यांत एक सरोवर. त्यांत कमळवेलीवर फुले उमलली आहेत. कोठेतरी दूर-वर भृंग, त्या भृंगाला सुगंधाचा स्पर्श. परिमळामध्ये अनन्य ममता उत्पन्न होते. तिकडे आकर्षित होऊन धांव घेतो. फूल पाहून वेंडा होतो,

त्या फुलावर बसतो. मकरंद शोषून घेतो. देहभान विसरतो. आपण व परिमल एक होतात. सामरस्य सिध्दि ! ऐक्यावस्था ! तेव्हां आनंदाचा बांध फुटतो. 'मी नाही. फूल नाही.' केवळ आनंद ! हीच आनंदानुभूति ! हाच साक्षात्कार !

संतही तसेच. तो देवावर प्रेम करतो. अनन्य प्रेम. त्याच्या स्मरणांत देहभान विसरतो. तेव्हां 'मी' हा भाव नाही. केवळ देव ! सामरस्य अनुभव ! अदभुत आनंदाचा उन्माद !

श्री रामकृष्ण परमहंस, रामतीर्थ व पूर्वकालीन अनिमिषार्य, चैतन्य महाप्रभू हे या उन्मादावस्थेच्या वैभवात होते. हर्षातिरेक, आनंदाश्रु !!...

असे हे चिंतनाचे तीन अंग ! हे तीन पूर्णांग चिंतन साधले तर सत्य-सिध्दि ! आत्मसाक्षात्कार !!

हे चिंतन फलित होण्याचा समय कधी प्रयत्नतः तर कधी आकस्मिक आणि अनायासाने लाभतो. लौकिक चिंतनसुध्दां गाढ असेल तर एकदम तीव्रतेने पारमार्थिक रूप धारण करणे साध्य होते.

तुलसीदास युवक. पत्नीवर नितांत प्रेम करणारा होता. एक दिवस सुध्दां पत्नीला सोडून राहणे त्याच्या जिवावर येई. माहेरी गेलेल्या पत्नीच्या विरह-व्यथेने व्याकुळ होऊन भयंकर वादळी पावसांत काळरात्री महापूर आलेल्या नदीतून पोहून पैलतीरी पोहोचला. सापाला दोरी समजून त्या सापाचा आधार घेऊन माडी चढून गेला. प्राणांची सुध्दां पर्वा न करणारे प्रेम ते ! नववधूला जेवढा आनंद झाला, तेवढेच भय ! ती म्हणाली.

"कसले अद्‌भुत प्रेम तुमचे ! येवढे प्रेम देवावर केले तर देव तात्काळ प्रसन्न होईल !"

त्याच क्षणीं तुलसीदास रामाचा दास झाला. पत्नीचे चिंतन टाकून प्रभु रामचंद्राचे चिंतन सुरू झाले ! तो महान संत झाला !! आपण आयुष्यभर भाराभर ग्रंथ वाचतो. अव्याहतपणे भाषणे करतो. पण तुलसीदासाप्रमाणे आपणांत परिवर्तन घडले नाही. कां बरे ? पत्नीने सांगितलेल्या एका वाक्याने तो तरला. पण ऋषी-मुनींनी पुनः पुनः सांगितले तरी थोडासुध्दां परिणाम आपल्यावर होत नाही ना ! कारण तो आपल्या पत्नीच्या चिंतनांत मग्न झाला होता. चिंतन कसे करावे हे त्याला माहित होते. अपूर्ण चिंतनांत असणाऱ्याला पूर्ण चिंतनाचा अनुभव येत नाही. तो एका बाबतींत परिपूर्ण होता. प्रेमाची पराकाष्ठा त्याने साधली होती. प्रेम-पूर्ण प्रेम. फक्त विषयात, प्रेम पात्रांत बदल हवा होता इतकेच. पत्नीची मूर्ति बाजूला सारून त्याने रामाच्या मूर्तीचा स्वीकार केला. प्रेम पात्र बदलले. मग सर्वत्र राम भरून राहिला. जेथे जेथे पाहूं जाई तेथे तेथे राम ! राम ! राम !

म्हणून चिंतनाचे महत्व अनन्यसाधारण आहे. चिंतन ! सर्वांगपूर्ण चिंतन !! गाढ चिंतन !!

चिंतनाचा विषय कोणता ? भगवंत हाच चिंतनाचा विषय ? भगवंत म्हणजे काय ? कोण तो ? हे जाणणे आवश्यक !

या फुलाप्रमाणे स्पष्टपणे देव दिसला असता तर त्याचे चिंतन करणे किती बरे सोपे झाले असते ! पण नाही ? तो काय आहे ? तो कोठे आहे ? तो कसा आहे ?... याचे ज्ञान आपणांस नसेल तर त्याचे चिंतन कसे शक्य आहे ? अज्ञात वस्तूवर कसे बरे प्रेम करावे ? त्याच्या स्मरणांत कसे बरे निमग्न व्हावे ?

आपणांपैकी अनेक जण पूजा करतो. ध्यान करतो. जप करतो.

आयुष्यभर ! तरी ते चिंतन नव्हे. तन्मयावस्था प्राप्त होत नाही. कारण स्पष्ट आहे. देवा विषयी आपली धारणा स्पष्ट नाही. त्यामुळे बहुतेक साधकांची समस्या "मन ध्यानांत स्थिर होत नाही !" कोठे स्थिर करावे ? हेच जर समजले नाही तर मन स्थिर राहण्याचा प्रश्न कोठून आला ? सांगा बरे !

एक साधक होता. तो ध्यान साधना करीत होता. त्याचे मन स्थिर राहीना. काय करावे ? समजेना. तो एका संताजवळ गेला. आपली समस्या सांगितली.

"संत महाराज ! माझे हे दुष्ट मन स्थिर होत नाही ! काय करावे ? कांहीतरी उपाय सांगा !"

त्याचे मन म्हणाले, "संत महाराज, माझे ऐका. हा साधक मला सांगतो की, ध्यान कर ! चिंतन कर ! स्थिर रहा ! पण मी कोठे स्थिर व्हावे ? कशाचे ध्यान करावे ? हेच सांगत नाही. चूक कोणाची तुम्हीच सांगा !"

आतां या साधकाची स्थिती आणि आपली स्थिती कांही भिन्न नाही. मन कांही सामान्य नव्हे. ते छली ! (आग्रही) अभिमानी ! त्याची मिठी मगरमिठी ! तुम्ही ज्याच्यावर प्रेम करायला, धरायला सांगाल त्याला येवढे घट्ट पकडून ठेवील की नंतर सोडविणे कष्ट ! बुध्दांच्या मनाने राज्य सोडून त्याला अरण्यांत नेले. सत्य साक्षात्कारापर्यंत ते थांबले नाही.

मन चांगलेच असते ! अत्यंत चाणाक्षपणाने त्याचा उपयोग केला पाहिजे. ते मन देवचिंतनासाठी नियोजण्यापूर्वी देवाचे खरे ज्ञान मिळविणे. अत्यंत अनिवार्य होय !

देव म्हणजे कोण ? हे सुलभपणे समजायचे असेल तर तो सत्य, शिव,

सुंदर. तो 'मधु'. सूर्योदय, सूर्यास्त, तरंगणारे ढग, वाहणारा वारा, चमचमणारे नक्षत्र, नदी, नाले, अरण्य, पर्वत, पाहणाऱ्याला मुग्ध करण्याचे सौंदर्य त्यामध्ये आहे.

व्यष्टि, समष्टीमध्ये भरून राहिलेले हे सौंदर्य म्हणजेच देव ! सुंदर वस्तु आणि व्यक्ति भिन्न भिन्न. असंख्य. आई, पत्नी, मुले, घर, मंदिर, वन, सागर, आकाश सगळीकडे हे सौंदर्य ओतप्रोत भरून राहिले आहे. त्या वस्तु आणि त्या व्यक्ति यांना विसरून त्यांत ओतप्रोत भरून राहिलेल्या सौंदर्याकडे पाहिले तर ते सौंदर्य एकमेव होय. त्यांत भेद नाही. अद्वय ! वस्तूंनी सीमित असे सौंदर्य ओलांडून त्यापलीकडले सौंदर्य पाहिले तर ते सौंदर्य दिव्य ! भव्य ! राग लोभापलीकडील सत्य होय ! ते सौंदर्य व भगवंत वेगवेगळे नव्हेत. किंचितसुध्दां !

आपण सौंदर्याचा आस्वाद घेतांना, हे फुलाचे सौंदर्य ! हे बाळाचे सौंदर्य ! हे हसण्याचे सौंदर्य ! असे सौंदर्य वेगवेगळे करून त्याचा आस्वाद घेतो. ते सोडून, फुलामध्ये, बाळामध्ये, हसण्यामध्ये एकच एक आणि ते म्हणजे देव सौंदर्य या दृष्टीने पहावे. त्यासाठी विशिष्ट दृष्टिकोन लाभला पाहिजे. ''सौंदर्यामध्ये देव आहे.'' हे ओळखणेच चिंतन होय. हेच देव चिंतन हीच दिव्य दृष्टी. ही दिव्य दृष्टी लाभली की सकलविश्व बदलून जाते.

एकदां सॉक्रिटीसजवळ एक युवक आला. म्हणाला, ''गुरु महाराज, माझ्या लग्नाला चार वर्षे झाली. प्रेमलग्न होते ते ! पण आतां मला आढळून आले की माझी पत्नी अत्यंत कुरूप आहे. मी अजून तरूण. यापुढील ४०-५० वर्षे मी त्या कुरूप बायकोशी कसा बरे संसार करूं ? माझे संपूर्ण जीवनच नाश पावले. आपणच यांतून योग्य मार्ग काढण्याची कृपा करावी !''

सॉक्रिटीस म्हणाला, ''तूं कशाला चिंता करतोस. ही तर सोडविण्याला अतिशय सोपी समस्या ! या सर्व समस्येला कारण तुझी दृष्टि ! पहिल्यांदा ज्या दृष्टीने पाहून तूं लग्न केलेस ना, त्या दृष्टीला कुरूप दिसत नाही. दिसले नाही. याच बायकोमध्ये तुला अपरूप मोहक सौंदर्य दिसले होते. ते सौंदर्य पाहून तू वेडा झालास. येवढे हे सौंदर्य !! तशी ती दृष्टी ! त्या प्रेम दृष्टीने पुन: तिच्याकडे पहायला प्रारंभ कर. तीच पत्नी तुला सुंदर, अप्रतिम रूपमति दिसूं लागेल. तूं पतीदृष्टी झांकून प्रियकर दृष्टी उघड. तुझे जीवन स्वंर्ग समान होईल.''

सॉक्रिटीसची पत्नी कठोर, कजाग, भांडकुदळ ! तिची भाषा अत्यंत कठोर, सदा शिव्या-शाप ! भांडणामध्ये तिची बरोबरी करणारा कोणीच नव्हता. तरी काय त्याचे ? सॉक्रिटीस तिच्याकडे प्रेमळ दृष्टीने पाही. कजाग बायकोशी संसार करावा लागला तरी त्याचे घर ''सौख्यमंदिर !''

मधुरता ह्रदयांत, सौंदर्य दृष्टींत असेल तर जग, जन कसेही असले तरी ते सुंदरच दिसते. तेव्हा शिळ्या भाकरीचा तुकडा सुध्दा मिष्टान्न ! भाताची पेजसुध्दां पंचामृत ! झोपडीसुध्दा राजवाडा ! जीवन ह्रद्य होते. आपणांस ती दृष्टी लाभत नाही. ती दैवी कळा आपणांस प्राप्त होत नाही. इतकेच.

आपण फुले आणून देवाच्या डोक्यावर वाहतो. देव दर्शनाची इच्छा करतो. देव म्हणतो,

''ते फूल कां बरे अर्पण करतोस ? ते फूल म्हणजे मीच. तूं मला पहावेस. पाहून आनंदित व्हावे. आनंदोन्मादांत देहभान हरपावे, म्हणूनच मी फुलामध्ये सौंदर्यरूपाने प्रकट झालो. तूं त्या फुलामध्येच मला पहा !''

आपण देवाला पहावे ! शोधू नये ! तो लपला असेल तरच त्याला

शोधायचे ना ? मल्लिकेच्या लता मंडपांत, कमळे उमललेल्या सरोवरांत; आम्र मंजिरींत, पोपट मैनेच्या मंजुळ कंठांत, महतांत, महत्तांत त्या देवाचे रूप भरून राहिले आहे. ते रूप डोळे भरून पाहणे, ते ओळखणे, तेच भगवत् चिंतन !

भगवंताचे दर्शन घ्यायला एखाद्या विशिष्ट मंदिराला, पर्वत शिखरावरील देवळाला, तीर्थ-क्षेत्राला जाण्याची आवश्यकता नाही. जाऊं नये असेही नाहीं ! देवाला पाहण्याला आणि जाण्याला संबंध जेवढ्यास तेवढाच. हृदयांत मधुर रस भरून घेऊन कोठेही गेले, कांहींही पाहिले तरी तेथे भगवंत दर्शन ''सौंदर्य'' ''आनंद'' रूपांत होते.

सौंदर्य केवळ रूपामध्ये नाही. शब्द, स्पर्श, रस, गंध यांमध्ये सुध्दां असते. पंचेंद्रियांना अनुभववेद्य ते सर्व सुंदरच. आणि जे सुंदर आहे ते सर्व देवाचेच रूप ! तेथे लोभ, मोह, मद, मत्सर, काम-क्रोध, अहं, मम यांना स्थान नाही. या षड्‌रिपूंचा अभाव हीच मनाची मधुरता. ही मधुरता देह-वचन-मन यांचे द्वारा प्रकट करणे हेच भगवत् चिंतन !!



## ॥ २ ॥

आपल्या सभोवती पसरलेले हे जग किती विशाल आहे ! त्यात लक्षावधी जीव-जंतू आहेत. गगनचुंबी पर्वत राजी आहे, अथांग सागर आहे, वरती आकाश आहे, असंख्य नक्षत्रे आहेत. सूर्य-चंद्र आहेत. किती विलक्षण आणि किती अद्‌भुत आहे हे जग ! हे जग जाणण्याचे माणसाला मोठे कुतूहल आहे. या जगाचे खरे स्वरूप ओळखण्याची त्याची गाढ आकांक्षा आहे. पण जग जाणण्याचा मार्ग कोणता हे त्या आदि-मानवाला माहित नव्हते. त्याकाळी योग तंत्र, ध्यान-भक्ति इत्यादि साधने, ज्ञात नव्हती पण तो आदि मानव मोठा हुषार होता. अंतिम सत्य शोधण्याचा आपला हव्यास त्याने सोडून दिला. सत्य प्राप्तीची सिध्दता त्याने स्वतःच केली. डोळे, मति, मनं यांच्या द्वारे ते सत्य जाणता येत नाही; हे कळल्यामुळे त्याने त्यांचा उपयोग करण्याचे सोडून दिले. त्याने आपले डोळे मिटले. बुध्दीला पूर्ण विश्रांती दिली. मनाला संपूर्ण निवृत्त, निश्चल आणि निराकार केले. ती अमनस्क स्थिती होय. मौन हीच मनाची अवस्था. आणि सर्व कांही शांत ! शांत !! 'मी' पणाची भावना पूर्णपणे हरपली. त्या क्षणी, त्या प्रशांत अंतःकरणात ते अतीत सत्य तत्व अभिव्यक्त झाले. तेच दर्शन होय ! तेच ऋत दर्शन ! त्या पहिल्या मानवाने सत्य जाणिले आणि तो ऋषि झाला !!

त्या दार्शनिक ऋषीच्या मुखातुन व्यंक्त झालेले शब्द हेच वेद होत !

वचने होत ! ते केवळ शब्द नव्हते ! तो एक उद्गार होता. त्याचे ते केवळ म्हणणे नव्हते. तर तो एक मंत्र होता ! त्या मंत्रामध्ये अनंताचे सत्य आणि अदृश्याचे तत्व प्रकट झाले होते.

अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथारसं नित्यमगंधवच्च यत् ।
अनाद्यनंतं महतः परं ध्रुवं निचाय्य तन्मृत्युमुखात् प्रमुच्यते ।।
क. १-३-१५

ते सत्य आणि तो देव शब्दादि गुणरहित आहेत. तो अनादि अनंत आहे. तो परात्पर आहे. तो अढळ ध्रुव आहे. त्याला एकदा जाणले की मृत्यू कोठून ? त्याने वापरलेले शब्द निषेधार्थ असतील पण ते शब्द त्या दिव्य तत्वाचाच अचूक निर्देश करतात. म्हणूनच भगवंताला पाहता येत नाही. कारण डोळ्यांची शक्ति अपूरी पडते भगवंताला नीट जाणता येत नाही. कारण बुध्दीची शक्ति अपुरी पडते. प्रेम आणि शांती यांच्याप्रमाणे भगवंत हा केवळ अनुभवता येतो. सांगता येत नाही. तो ''निश्शब्दं ब्रह्म'' आहे. शब्द कंपन, रूप कंपन, भाव कंपन आणि विचार कंपन हे सारे थांबल्यावरच त्याचा अनुभव घेता येतो. उदा. शून्य पाहता येईल कां ? शून्याची कल्पना बुध्दीने करतां येईल कां ? कारण ती संख्येचा आधार आहे. संख्येला मूल्य आहे, शून्याला नाही. त्याचे मूल्यांकन करणे बुध्दीला अशक्य आहे. कोणतीही संख्या घ्या. तेवढीच संख्या त्यातून वजा करा. जे शिल्लक राहते ते केवळ भावगम्य होय. तशीच ही अनंतता. संख्या वाढवीत जा. न थांबता. ती संख्या अनंत होते. सांत जाणू शकणारी बुध्दी अनंतेला जाणण्यास हतबल ठरते. केवळ कल्पना करायची त्यानेच त्याचा अर्थ जाणतां येतो.

तसेच भगंवत जाणता येतो. सर्वातून सर्व म्हणजे जड, जीव इत्यादि

सारे वजा करा. जे बाकी राहते ते केवळ शून्य ! पारमार्थिक शून्य ! दैवी अनंतता. त्याच्यामुळेच सर्व वस्तु संचय, जीव समूह उत्पन्न होतात. त्यामुळे सर्व संख्यांच्या अंतरंगात शून्य आहेच. अंतात जशी अनंतता असते तसा सर्व वस्तुमध्ये भगवंत असतो. सर्व वस्तूंच्या अंतामध्येही भगवंत असतो. अशा भगवंताला सुंदर वस्तूमध्ये पाहणे हेच सुंदरम चिंतन. काल आपण ते पाहिले आहे. आज शक्तीच्या अंतरंगात भगवंताला पहायचे आहे ! शक्तीची लीला म्हणजेच हे जगत. या शक्तीची क्रीडा सर्वत्र सुरू आहे. अणूंच्या पोटात प्रोटान्सना तिने बंदिस्त केले आहे. इलेक्ट्रान्सना अणू केंद्रांशी जखडून टाकले आहे. जगाच्या कानाकोपऱ्यांत तिने प्रकाश पसरविला. आकाश निस्सीम आहे. केवळ एक उजाड पण विशाल अशी पोकळी. त्या पोकळीमध्ये अगणित असे असंख्य महा प्रकाशकाय. नक्षत्र, सूर्य. विश्वाच्या पोकळीमध्ये हे असंख्य सूर्य-नक्षत्रे तरंगत आहेत. कोट्यानुकोटी वर्षे ! प्रचंड प्रमाणात जळत आहेत. ही महिमा कशाची ? महाशक्तीची ! त्या शक्तीने मानवाच्या अंतरंगात प्रवेश केला आहे. प्रेम-द्वेष ही त्या शक्तीची रूपे. प्रेमशक्ती जोडते. जवळच्याच नव्हे तर दूर-दूरच्या व्यक्तींना. द्वेषशक्ती जवळच्या व्यक्तींना सुध्दां दूर सारते. ही शक्ती बाहेरही आहे. माणसाच्या अंतरंगातही आहे. ती सर्व व्यापक. सर्व कार्यांना मूळ. विश्वनाटकाचे मूळसूत्र ! ही अद्भुत शक्ति म्हणजेच भगवंत. तेवणारी ज्योत, उगवता चंद्र, गाणारा पक्षी या रूपाने शक्तीची लीला प्रकट होते. तेच भगवंताचे रूप ! या भगवंताला ओळखणे हेच भगवत् चिंतन !

एका खगोल शास्त्रज्ञाला त्याचा मित्र विचारतो, ''आपण संपूर्ण आकाशाचे अवलोकन केले आहे. काना-कोपरा धुंडाळून काढला आहे. तुमच्या दृष्टीतून कांहीच सुटले नसेल. तर मग सांगा बरे, कोठेतरी देव आहे कां ? तुम्हांला तो दिसला कां ?''

"मित्रा, देवाला सोडून मी दूसरे कांहींही पाहिले नाही. जेथे पहावे तेथे त्या देवाचाच अखंड खेळ. त्या नक्षत्रांमध्ये धगधगणारी शक्ति म्हणजेच देव. सर्व महाकाय वस्तूंना चालना देणारी प्रेरणा शक्ति म्हणजेच देव. नक्षत्रे उत्पन्न होतात, नाश पावतात. त्यांना जन्म देणारी-त्यांचा नाश करणारी शक्ति म्हणजेच देव ! मित्रा, पाहण्याची दृष्टि असेल तर देवाला सोडून दुसरे काय बरे दिसेल ?" विश्व जोपर्यंत आहे, तो पर्यंत त्या विश्वाच्या रूपाने तो देव आहे. या विश्वाचा अस्त झाला की जे काहीं शिल्लक राहील ती केवळ दिव्यशक्ति ! देव !!

शरीरांत अनेक कार्ये चालली आहेत. रक्त चलन, वायु चलन, पचन, विसर्जन, मांस पिंडांचा संकोच-विकास, जीव कणांचे नवीनीकरण मेंदूचे नियंत्रण ! ही सर्व कार्ये देहगत शक्तीच्या आश्रयाने चालली आहेत. पण ती शक्ती अदृश्य आहे. ती कोठे आहे ? कशी आहे ? शोधू पाहतां कोठेच दिसत नाही. तीच देव शक्ति ! दैहिक क्रिया पाहून-त्या क्रियांचे मूळ जाणणे हेच ते भगवत् चिंतन !

भगवंत जसा सौंदर्य रूपाने प्रकटतो-शक्तिरूपाने प्रकटतो तसाच तो 'श्री' (संपत्ति) रूपाने प्रकटतो. सामान्यपणे धान्य, भूमि-वस्तू, सोने-नाणे यांना धन म्हणतात. त्यांचा संग्रह केला की मानवाचा भाव बदलतो. 'मी श्रीमंत !' ही भावना त्याच्या मनांत उत्पन्न होते. त्याची भाषा, त्याचा हाव-भाव त्याची दृष्टी बदलते.

सर्व संपत्ति सर्वांना भूषणास्पद ठरत नाही. सुवर्णाभूषण संताला संपत्ति नव्हे. गायीला सुध्दां दागिन्यांनी मढवून काढले तरी तिच्या दृष्टीने ते दागिने म्हणजे संपत्ति नव्हे. आम्हांला मात्र पैसा हाच परमेश्वर वाटतो. खरी संपत्ति

पैसा-अडका, सोने-नाणे नव्हे. आपल्या जीवनाला जे अनिवार्य-आधार तीच खरी संपत्ति. अन्न, पाणी, हवा, प्रकाश ही अमूल्य संपत्ति. ही संपत्ति केवळ आम्हालांच नव्हे तर सकल जीव-जंतूंना, निसर्ग हा देवच होय !

*'अन्न देवर मुंदे इन्नु देवरू उंटे ?*
*अन्न उंटादरूणलुंटु जगदोळगे*
*अन्नवे दैव सर्वज्ञ !'*

**भावार्थ :** या जगांत अन्न देवाहून श्रेष्ठ देव तो कोणता ? अन्न असेल तरच जगांतील सर्व प्राणी जेवतील-जगतील. अन्न हाच खरा देव-सर्वज्ञ.

भूक शमविण्याची शक्ति नसलेले कोट्यावधी रुपयांचे धन एका घासभर अन्नाची बरोबरी करू शकत नाही. अनंत कोटी माणिक-मोती तहान भागवू शकत नाहीत. आपण पैसा-अडका सोने नाणे यांना संपत्ति समजतो ते चूक आहे. देवाने दिलेली अन्न-पाणी, हवा-प्रकांश हीच खरी संपत्ति होय.

एकदा एक कोंबडी एका श्रीमंताच्या उकिरड्यावर गेली. तिला वाटले. श्रीमंताच्या उकिरड्यावर अमूल्य असे कांहीतरी मिळेल. ती उकिरडा उपसूं लागली आणि काय आश्चर्य ! खरोखरच तिला एक रत्नाचा खडा सापडला. कोट्यावधी रुपये किंमतीचा हिरा. क्षणभर निरखून ती कोंबडी म्हणाली, "त्या वेड्या मानवाच्या दृष्टीने तू संपत्ति, मला तुझा काय उपयोग ? माझ्या दृष्टीने तूं एक अत्यंत सामान्य खडा ! जीवनाला अत्यंत निरूपयोगी ! बुध्दिहीन राजा-महाराजांना तूं भुरळ पाडू शकतोस मला नाही."

असे म्हणून तिरस्काराने तिने ते रत्न भिरकावून दिले. पुनः उकरू लागली. तिला धान्यांचा एक कण सांपडला. खूपच आनंद झाला तिला.

"ही माझी खरी संपत्त ! माझे जीवन फुलविणारी-समृध्द करणारी संपत्ती ! माझ्या देहाला पोषण ! मनाला तृप्ती, जीवाला समाधान देणारे अमूल्य रत्न हे !" ती कोंबडी खरीच ज्ञानी; संत साधु !

एक सुंदर पक्षी. राजवाड्यांत अतिथि. सोन्याचा पिंजरा. दास-दासी सेवा करायला. हवे-नको पहायला राजा होताच. एके दिवशी तो पक्षी म्हणाला,

"महाराज, मला नको हा राजवाडा, हे वैभव हे राजआतिथ्य, हिरे माणके जडविलेला हा सोन्याचा पिंजरा नको. या राजवाड्याबाहेर पहा ! वसंत ऋतूचे आगमन झाले आहे. सृष्टीचे वैभव मला खुणावून बोलावत आहे. हा पहा मी निघालो." आणि तो पक्षी भुर्रकन उडून गेला. त्या पक्षाला वसंत ऋतूची वनश्रीच खरी श्री-संपत्ति. त्या श्री पुढे बाकी सर्व श्री-संपत्ति शून्य !

उधाण आलेले सागर ! भरून वाहणाऱ्या भद्रा-कावेरी सारख्या नद्या ! आकाशांतून होणारी पर्जन्य वृष्टि ! एक बी पेरले तर हजारो पटीने-लाखो पटीने उत्पन्न देणारी भूमि ! नित्य-नित्य उष्णता देणारा सूर्य ! आपणांस जिवंत ठेवणारा वायु ! हे सर्व आपणांस लाभलेले असताना आपण गरीब कसे ? आपण दरिद्री आहोत का ? देवाने ही जी संपत्ति आपणांस दिली आहे त्यात तर-तम भाव आहे का ? कोणाला कमी किंवा कोणाला अधिक असा पक्षपात आहे का ? घरातून बाहेर येऊन जे जे बसतील त्या सर्वांना सूर्याची उष्णता, प्रकाश ! मोकळ्या मैदानांत-शेतांत संचार केलात तर शुध्द प्राणवायु ! या सृष्टींत कसली कमतरता आहे बरे ? येथे कोण श्रीमंत ? कोण गरीब ? कोण श्रेष्ठ ? कोण कनिष्ठ ? खऱ्या अर्थाने कोणी श्रीमंत नाही. कोणी गरीब नाही. सगळे सारखेच. मानव निर्मित सामाजिक बंधनांमध्ये गरीबी किंवा श्रीमंती ! भगवंताच्या दृष्टीला श्रीमंत कोण ? गरीब कोण ?

एकदां एक श्रीमंत सोन्याची नौका घेऊन सागर प्रवासाला निघाला. नौकेचे सर्व भाग सोन्याचे बनविलेले. दुसरा माणूस लाकडी नौका घेऊन निघाला. तो गरीब, खोल समुद्रांत गेल्यावर वादळ झाले पर्वतप्राय लाटांचे थैमान सुरू झाले. नौका डगमगूं लागल्या. श्रीमंत म्हणाला,

''अरे सागरा ! माझी नौका साधी-सुधी नव्हे. सोन्याची. त्यावर हिरे-माणके जडविलेली आहेत. अतिशय मौल्यवान माझी नौका. या नौकेला नको बरे त्रास देऊ !''

समुद्र म्हणाला, ''अरे मानवा ! सोने-नाणे जड-जवाहिर यांनी लगडलेली तुझी नाव मौल्यवान आणि त्या माणसाची लाकडी नाव हलक्या दर्जाची ? ही सगळी तुझी कल्पना ! मला सर्व सारखेच !'' दोन्ही नौका बुडाल्या !

तत्वतः पाहिले तर सगळं कांही 'श्री' संपत्ति, सर्व कांही मौल्यवान येथे कमी-अधिक कांही नाही. जाणून घेतले तर सर्वजण श्रीमंत ! अद्‌भुत विभव ही प्रचंड आणि विविधतेने नटलेली सृष्टी ! ही सर्वांची ! म्हणूनच आपण सर्वजण श्रीमंत ! देवच विश्व, श्री-संपत्तिच्या रूपाने प्रकट झाला आहे. तोच अन्न ! तोच प्रकाश ! तोच पाणी ! तोच वायु ! असे चिंतन करणे हेच श्री रूपाने भगवत् चिंतन !

संपत्ति असूं नये, असे नाही म्हणतां येत ! अन्न-पाणी यांचा संग्रह करूं नये असेही नाही. कितीही संग्रह केला तरी त्याचा मालक मी नव्हे, तो देवच या साऱ्या संपत्तीचा मालक ! या भावनेने जगावे हेच भगवत् जीवन !

सूर्य-चंद्र, नक्षत्र, तारे, आकाश, ही भूमि, पर्वत, नद्या, सागर ही सर्व

माझी संपत्ति ! जशी माझी संपत्ति तशीच ती सर्वांचीही मग त्यांत कमतरता कसली ? वाटणी कसली ? मी विश्व श्रीमंत अक्षय श्रीमंत !

त्यक्तेन भुंजीथाः ! देवाचा प्रसाद म्हणून सकल संपत्तीचा उपभोग घ्यावा. हे माझे हा भाव नसावा. हीच यशस्वी जीवनाची गुरुकिल्ली. हेच खरे दैवी भोग वैभव !

या विश्वक्षेत्रांत आपण कां बरे आलो ? देवाची ही अपार विश्व श्री पाहून, रूचि घेऊन, आघ्राण करून आनंद घेण्यासाठी तर आलो. या दृश्य रूपामध्ये, श्राव्य शब्दामध्यें तशाच अन्य ग्राह्य विषयांमध्ये बंधित होण्यासाठी नव्हे. जीवन्मुक्त होऊन आनंदमय जीवन जगण्यासाठी इथे आलो. भगवत्चिंतनाशिवाय हे साध्य होत नाही.



## ॥ ३ ॥

आशा-आकांक्षा असंख्य ! कांही आशा आकांक्षाची अनायास पूर्तता होते. तर कांही प्रयत्न पूर्वक पूर्ण होतात. तेव्हां खूप-खूप समाधान वाटते. संतोष होतो. पण कांही आकांक्षा अतृप्तच राहतात. त्यामुळे आपल्या जीवनांत चिंता, दुःख, निराशा होते. कांही इच्छा असाध्यच असतात. त्या इच्छा कधीच पूर्ण होत नाहीत. उदा. "सर्वे जनाः सुखिनो भवंतु ! सर्वे संतु निरामयः" या जगांतील सर्व प्राण्यांना सुख लाभावे. 'मा कश्चित् दुःखमाप्नुयात् !' कोणालाही, कधीही, कसलेही दुःख होऊ नये !

हिमालयाच्या कुशींत, स्वर्गंगेच्या तीरावर... प्रशांत रमणीय स्थळी, डोळे मिटून... अंतमुर्ख होऊन त्या सत्यदर्शीं ऋषीने प्रार्थना केली ! इच्छा केली ! "कोणालाही दुःख होऊ नये ! सर्वांना शांति लाभावी ! सर्वांचे जीवन सार्थक व्हावे !"

अगदी हृदयाच्या गाभ्यापासून निघाले हे उद्‌गार ! एकदां हे विचार आले आणि नाहीसे झाले असेही नव्हे. नित्य या इच्छेचा जप त्याने केला. वर्षानुवर्षे...

तर मग जगांतील सर्व जीव दुःख मुक्त झाले कां ? अजूनही दुःख आहे. यापुढेही दुःख राहणारच ! पणं ऋषीने तिकडे लक्ष न देतां सर्वांच्या

कल्याणाची इच्छा केली. आपली विश्व-सद्भावना व्यक्त केली.

निसर्गाकडे पहा ! सूर्य उगवतो. अस्ताला जातो. मेघ पर्जन्य वृष्टि करतात. नाहीसे होतात. आपल्या प्रकाशाचा कोणी, किती सदुपयोग केला ? आपल्या पावसामुळे किती जणांना पाणी मिळाले ? याची चिंता ते करत नाहीत. म्हणूनच सूर्य... मेघ... सदा प्रसन्न ! साधु-संत आणि ज्ञानी लोकही तसेच ! आपल्या निष्कल्मष प्रेमाचा वर्षाव ते सर्वांवर करतात. सकल जगतावर ! पण त्याचा सदुपयोग किती जणांनी केला ? किती जणांनी केला नाही ? याचा शोध घेण्याचा प्रयत्न ते करत नाहीत. आपल्या सगळ्या इच्छा पूर्ण होत नाहीत, हे त्यांना चांगलेच माहीत आहे. म्हणूनच ते निश्चिंत असतात. चिंता करूनही ते निश्चिंत !

"सर्वांना अन्न पाणी मिळावे, सर्वांना शिक्षण मिळावे." अशी इच्छा आपण करावी. आपल्या शक्तीनुसार प्रामाणिक प्रयत्न ही करावेत. मात्र त्याच्या परिणामांविषयी आपण चिंता करू नये ! ते विश्व-नियतीवर सोडून द्यावे.

भगवंताचा साक्षात्कार व्हावा म्हणून आपण चिंतन करावे. पण हे चिंतन चिंतेमध्ये परिवर्तित होऊन आपल्या मनाच्या प्रसन्नतेला बाधक होऊ नये. भगवत्-चिंतन सहज-सुंदर असावे. आपण एक सुंदर फूल पाहतो. आपल्या दृष्टीमध्ये ते फूल भरून राहते. आपण ते फूल केवळ डोळ्यांनी पहावे. ते तोडावे... त्याचा वास घ्यावा... त्याचा स्पर्श अनुभवावा अशी इच्छा कां करावी ? फूल पाहिल्यानंतर... दृष्टि भरून... मन सौंदर्याने भरून राहिल्यानंतर त्या सौंदर्याचा अनुभव... आस्वाद ! अद्भुत आनंद ! तन्मयतेचा अनुभव ! ते फूल शाश्वतंपणें आपल्याजवळ असावे असा हव्यास नको. असा हव्यांस

साध्य होत नाही. सर्वांनी सत्य बोलावे. अहिंसेचे आचरण करावे. सर्वांनी नीतिमान व्हावे अशी इच्छा असावी. पण जबरदस्तीने मारून-मुटकून तसे होणे शक्य आहे का ?

एक संत-वयोवृध्द. असेल ७०-५० वर्षांचा. त्याला आगा-पीछा कोणीच नव्हते. एक जीव, सदाशिव ! कुटिराबाहेर सुंदर चांदणे, त्याला झोप लागेना. तो चिंता करीतच होता. त्याच्या समोर देव प्रकटला. "तुला झोप कां नाही लागली ? कसली चिंता करतोस ?"

संत म्हणाला, "देवा तुला समजत नाही असे या जगांत काय बरे आहे ? माझे मन दुःखी आहे. पहा ना ! या जगांत कोट्यावधी लोक गरीबीने पीडलेले, लाखो लोक व्यसनाधीन ! जेवढे म्हणून सुशिक्षित व श्रीमंत, ते सर्वजण अप्रामाणिक. अन्यायाने अर्थोपार्जन-अर्थसंचयांत गुंतले आहेत. सगळीकडे अपराध भरून राहिले आहेत. या सर्वांचा विचार करतां करतां मन दुःखाने भरून राहिले आहे. केंव्हा बरे हे सर्व सुधारेल ? केंव्हा बरे सर्वांना सुख लाभेल ? अशा एक ना अनेक चिंतेमुळे मी तळमळत आहे. मला झोप कशी लागेल ?"

देव म्हणाला, "तूं कशाला डोक्यांत राख घालून घेतोस ? या जगाची रचना मी केली. हे जग कसे असावे ? केव्हां आणि कोणत्या उपायाने ते सुंदर बनवावे, ते मला माहित ! संत महाराज, आतां तुम्ही करायचे महत्कार्य एकच ! आता निवांतपणे झोपा ! सर्व कांही माझ्यावर सोपवून निश्चिंत रहा ! तुझे कर्तव्य इतकेच की तुला जेवढे शक्य असेल, तेवढे चांगले काम कर ! सर्वांच्या कल्याणाची कामना कर ! पण शेवटी निश्चिंत रहायला शीक !"

हे सगळे जग आपल्या कल्पनेप्रमाणे-मनांप्रमाणे असावे अशी आपली

इच्छा असते. पण ते कसे शक्य आहे ? आपल्या अवास्तव आशा-आकांक्षा, स्वप्ने, हीच दुःखास कारण ! याला उपाय एकच ! देव चिंतन ! जगाचे-जगदीश्वराचे सम्यक् ज्ञान ! फळाकडे-परिणामाकडे ध्यान न देतां पवित्र कार्य करीत रहावे. सत्संकल्प करावा. प्रार्थना करावी. पण त्यासाठी अतिशय चिंता नको ! बोलण्या येवढे हे काम सोपे नाही. आचरणांत आणणे तर आणखी कठीण ! सध्यां आपण या प्रवचनांत मग्न झालो आहोत. मन निर्मळ झाले आहे. शांत ! पण प्रवचन संपून बाहेर जाताना आपल्या नव्या चपला दिसल्या नाहीत तर तत्क्षणीच केवढा मनस्ताप होतो ! मलाही ताप होतो. तुम्हालाही ताप होतो. तसा ताप होऊ नये असे नव्हे. क्षणमात्र ताप होऊं द्या. पण तो सार्वकालिक नसावा ! वाऱ्याने पान हलवावे तसे, दगड टाकतांच सरोवरांत तरंग उत्पन्न व्हावेत. थोड्या वेळांत सर्व कांही शांत, शांत ! आपण तसे वागायला शिकलो नाही तर आपले जीवन दुःखी कष्टी होते. चिंता आपणांस जाळून टाकते. तसे होऊं नये.

देवाने हे सुंदर विश्व आपणांस दिले आहे. आपण संतोषाने या जगाकडे पहावे ! ऐकावे ! काम करावे ! अनुभवावे ! चिंता कां करावी !

***''परचिंते यमगेकय्या ? नम्मचिंते नमगे सालदे !***
***कूडल संगय्य ओलिदानो, ओलियनो एंब चिंते***
***हासलुंटु होदेयलुंटु !'' – म. बसवेश्वर***

**भावार्थ :** परचिंता आम्हांला कशाला हवी ? आमची चिंता आम्हाला पुरेशी आहे. कूडलसंगमदेव प्रसन्न होईल किंवा नाही ही चिंता आंथरायला पांघरायला पुरेशी आहे.

विश्वाविषयीं, विश्वेश्वराविषयीं चिंतन करणें-महत्वाचे. कोणातरी एखाद्या माणसाने बोललेल्या गोष्टीला कां बरे महत्व द्यावे ? इम्म्यान्युअल कांट नांवाचा तत्वज्ञानी भगवत् चिंतनांत-सत्य चिंतनांत येवढा गुंतून गेला होता की आपले लग्न झाले आहे-आपली पत्नी आहे, हे विसरून गेला होता. ऐंशी वर्षे ! आपण मात्र लग्नाच्या घाई गर्दीत चिरंतन सत्यच विसरून राहिलो आहोत ! आपण लहान सहान समस्यांमध्ये आयुष्यभर गुरफटून गेलो आहोत. कां बरे ? त्याने कोणते सुख मिळते ? विज्ञान क्षेत्रांत, तत्वज्ञान क्षेत्रांत, चिंतन करायला खूप वाव आहे. त्या चिंतनाने सुख-शांती लाभते.

आपल्या जीवनांत अनेक घटना घडतात. काहीं कटु, काहीं गोड. त्या-त्या क्षणी तो कटु अथवा गोड अनुभव घ्यावा आणि नंतर ते विसरावे. जीवनाचे सोने व्हायचे असेल तर विसरण्याची कला साधली पाहिजे. विसरणे ही सुध्दा कला आहे. तपस्या आहे. मन उदात्त कार्यांत गुंतले असेल, त्यांत संतोष मानीत असेल तर क्षुद्र कटुता विसरणे शक्य होते. त्यासाठी सत्यचिंतन हवे ! सत्य चिंतन वाढत जाईल, तस तसे क्षुल्लक गोष्टीविषयीची चिंता क्षीण होत जाते.

सौंदर्य, श्री, शक्ति या जशा संपत्ति, तसेंच 'भाव' ही सुध्दां अमूल्य संपत्ति. जे जे चांगले आहे, ते ते पाहून, स्पर्शून, रुचि घेऊन संतोष मानणे हा बालकाचा भाव-सुभाव ! हा सुभावच बालकाच्या प्रसन्नतेचे कारण !

बायजेद नांवाचा एक युवक होता. अविवाहित. त्याची माता प्रेमळ. एकदां त्याच्या मनांत देवाला पहायची इच्छा उत्पन्न झाली. त्याने आईची परवानगी मागितली.

''मला सोडून दूर जायला मी कशी संमति देऊं ? तरी पण माझ्या प्रेमाहूनही थोर देवाला पहायची पवित्र इच्छा ? जा ! देवाला प्रसन्न करून घे ! माझी एक इच्छा पुरव. देवदर्शनाने पवित्र झालेले तुझे प्रसन्न मुख मी पहावे. मांझे जीवन सार्थक होईल. मी आतुरतेने तुझी वाट पहात राहीन. तूं लौकर ये ! मला दुसरे कांहीही नको. माझ्या बाळा, तुझ्या सुखामध्येच माझे सुख ! तुझ्या धन्यते मध्येच माझी धन्यता !''

बायजेद घर सोडून निघाला. देवाच्या शोधांत. कितीतरी वर्षे उलटली. देवदर्शनासाठी नाना यत्न केले. साक्षात्कार झाला नाही. त्याची घोर निराशा झाली. ह्रदय व्यथित झाले. एका दिवशी त्याला आपल्या आईची आठवण झाली.

''माझी आई वृध्दा ! मी येईन म्हणून आतुरतेने वाट पहात असेल. किती दीर्घकाळ लोटला ! मला देवदर्शन घडले नाही. निदान आई प्राण सोडण्याआधी एकदां तिला भेटावे.'' असा विचार करून तो निघाला. घराकडे पोहोचलां रात्र झाली होती. सर्वत्र अंधार. दाराच्या फटीतून त्याने आंत पाहिले दिवा जळत होता.

आई खूपच थकली होती. पुढच्या सोप्यांत दिव्यापुढे बसून अत्यंत एकाग्रतेने प्रार्थना करीत होती.

''देवा, तुझ्या दर्शनासाठी माझ्या मुलाने घर सोडले. तीस वर्षे लोटली त्या गोष्टीला. तुझ्यासाठी तो तळमळला असेल. देवा, लौकर दया कर. त्याला दर्शन दे. त्याच्यावर अनुग्रह कर. त्याचे यश हेच माझे यश ! त्याला सिध्दि लाभली तर तीच माझी सिध्दि ! त्याच्या कृतार्थतेतच माझी कृतार्थता. देवा

मला कांही नको ! माझ्या मुलालाच तुझी करूणा लाभूं दे !''

बायजेद बाहेर उभा राहून मातेचे अप्रतिम बोल ऐकत होता.

''मी किती स्वार्थी ? स्वहित साधनेत तीस वर्षे घालविली. पण एकदां सुध्दा आईची आठवण झाली नाही. ती मात्र गेली तीस वर्षे प्रार्थना करते आहे... माझ्यासाठी ! केवढा हा त्याग ! केवढे अविच्छिन्न प्रेम हे ! अशी ही प्रेमरूप देवता सोडून मी न दिसणाऱ्या देवाच्या शोधांत भटकलो. केवढा मूर्ख मी !''

डोळ्यांतून घळघळा आंसू वाहूं लागले. एकीकडे पश्चात्ताप ! दुसरीकडे प्रेमळ मातेच्या रूपांत देवदर्शन झाल्याचा अपूर्व अनुभव. मातेचा हा सुभाव. हाच दिव्य-भाव ! ती खरी अंत:संपदा. देवाचे हृदय-रूप ही संपत्ती देवाने सर्वांना दिली आहे. पण हे भाव-वैभव, राग-द्वेषांमुळे मलिन झाले आहे. आशा-दुराशा यांमुळे कलुषित झाले आहे.

*भूत भूतव कूडि अद्भुत वायित्तु;*
*किच्चु कोडित्तु नीरू नीरडिसित्तु ।*
*उरि पवनदोषदोळगिद्दु वायुविम्मडिसित्तु कंडे गुहेश्वरा !*

*– म. बसवेश्वर*

भावार्थ : भूत-भूत मिसळून अद्भुत, त्यांतील अग्नि शांत झाला. पाण्याला तहान लागली. आग पवन दोषांत. वायु कित्येक पटीने वाढलेला मी पाहिले-गुहेश्वरा.

पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश ही पंचमहाभूते, ही पंचमहाभूते विशिष्ट प्रक्रियेने संमिश्रित झाल्याने 'देह' झाला. हे असामान्य. अद्भुत चमत्कार

हा ! पंच महाभूतांमध्ये नसलेले गुण व क्रिया या देहामध्ये आहेत. ऐकणे, पाहणे, चव घेणे ही अद्‌भुत तंत्रे इथे आहेत. म्हणूनच अल्लमप्रभूनी या देहाला 'अद्‌भुत' म्हटले आहे.

**किच्चु कोडित्तु :** किच्चु-आग म्हणजे ज्ञानाग्नि ! भूता-भूतांच्या संमीलनातून उत्पन्न झालेल्या अद्‌भुत अशा देहांतील असदृश्य असा ज्ञानाग्नि शांत झाला.

**नीरू नीरडसित्तु :** पाण्याला तहान लागली. पाणी म्हणजे मन. त्याला तहान लागली. विषयसुखाची. किती किती अदम्य आशा ! ज्यांचा उपशम कधीच शक्य होणार नाही. अशा हजारो आशा-आकांक्षा ! गरीब असो, श्रीमंत असो. लक्षाधीश असो, कोट्याधीश असो. दाह सुटला नाही. मागणी थांबली नाही. हा दाह केवळ प्रापंचिकांनाच आहे असे नव्हे. आमच्या सारख्या संन्याशांनासुध्दां हा दाह सुटला नाही. संन्याशी सुध्दां अतृप्तच ! धनाचा दाह ! कीर्तीचा दाह ! पीठाचा दाह ! संन्यास स्वीकार केलेल्यांचे मन इतके तहानलेले असेल तर असंन्यस्त-भोग जीवन जगणाऱ्यांना किती बरे आशा-आकांक्षा असतील !

***"उरि पवन दोषदोळगिद्दु वायु इम्मडिसित्तु काणा गुहेश्वरा."***

उरि म्हणजे चिंता किंवा ताप. पवन दोष म्हणजे चांचल्य दोष. चंचल मनांत ताप भरलेला आहे. चंचलता वाढेल तसा ताप वाढतो. दुःख-कष्ट द्विगुणित होतात. शतगुणित होतात. शेकडो आशा आणि सदा अस्थिर असणारे मन ! परस्परांना पोषकच ते ! आशा जितकी वाढते त्याच प्रमाणांत चंचलता वाढते. चांचल्य वाढेल त्या प्रमाणांत दाह वाढत जातो. कोट्यावधी

लोकांची मने अशीच असंतुष्ट ! संतांचे मन-संतांचा भाव वेगळा. सुमन ते ! केवळ सद्भाव. सर्वहित भाव ! मधुर हृदय ! स्वार्थ रहित, दुराशा रहित. आम्हांला केवळ आपलीच चिंता, त्यांना सत्याची चिंता. सकल प्राणी-मात्रांचे कल्याण व्हावे ही चिंता. असे हे हृदयंगम विमल भाव म्हणजेच अंतः श्री ! ही दैवी संपदा. त्याची उपासना हेच भगवत् चिंतन.

जेथे जेथे हा भाव आहे, तेथे तेथे भगवदाविर्भाव. रामाच्या आगमनाची उत्कंठेने वाट पाहणाऱ्या शबरीच्या ठायी हा भाव ! 'येवढ्या तांदळाची आशा तुम्हांला कशाला हवी !' म्हणून आपल्या पतीला जागे करणाऱ्या आय्दक्की लक्कमा मध्ये हा भाव. 'चन्नमल्लिकार्जुन हाच माझा पति' असे सांगणाऱ्या अक्कमहादेवीच्या ठायी; 'सकल विस्ताराचे रूप तूंच देवा' असे आळविणाऱ्या बसवण्णाच्या ठायीं हा सद्भाव-ही भावश्री वास करते. तेथे ईश्वराचा वास आहे असे नित्य स्मरणे हेच ''भगवत् चिंतन'' होय !

**ज्ञान-रूपाने चिंतन :** आकाशांत सूर्य-नक्षत्रे प्रकाश देतात. जिकडे पहावे तिकडे प्रकाश भरून राहिला आहे. आकाशाच्या काना-कोपऱ्यांत प्रकाश किरणांचा संचार. घरा-घरांतून दीप ज्वलन. प्रकाश पसरला आहे. अग्नि तत्वाची अभिव्यक्ति रूप. तसेच ज्ञान ही ! हा प्रकाश व्यापक. हा प्रकाश कोठे नाही बरे ? सकल जीवांमध्ये, सर्व देहांमध्ये, भू-मंडलामध्ये, अंतिरिक्षामध्ये सर्वत्र भरून राहिला आहे. तो कांही ठिकाणी व्यक्तरूपांत आहे तर कांही ठिकाणी अव्यक्त रूपांत आहे. हा ज्ञान रूपी प्रकाश सर्वव्यापी. ज्ञान-देव म्हणजे कधीही न विझणारी, विकार न होणारी परंज्योति ! सर्व जीव-जंतूमध्ये, फुला-पानामध्ये त्याला पाहणे हेच ज्ञानरूपी देव चिंतन ! ब्राह्मणाच्या घरांतील प्रकाश वेगळा आणि शूद्राच्या घरांतील प्रकाश वेगळा

असतो कां ? श्रीमंताच्या घरातील प्रकाश आणि गरीबाच्या घरांतील प्रकाश यामध्ये भेद आहे कां ? प्रकाश येथे-तेथे सगळा सारखाच. ब्राह्मणादि भेद भ्रमात्मक ! व्यक्तीला पाहिल्यानंतर त्याच्या अंतरीचा प्रकाश ओळखणे; हीच ज्ञानोपासना ! हीच सम्यक दृष्टि ! हेच सम-दर्शन !

दीपाची पणती मातीची असो वा सोन्याची, पणती मुख्य नव्हे. ज्योत मुख्य ! प्रकाश मुख्य ! व्यक्तीही तशाच भिन्न भिन्न आकाराच्या, रूपांच्या, रंगाच्या असोत. त्यांची सांपत्तिक आणि शैक्षणिक स्थिती, सामाजिक स्थान मान कांही असो. तिकडे लक्ष न देतां त्यांच्या अंतरी तेवणारी ज्ञान ज्योति ओळखणे हेच ज्ञान-रूप भगवत् चिंतन.

*''ममैवांशो जीव लोके*
*जीव भूतः सनातनः !''*

सर्व जीवांमध्ये प्राणीमात्रांत जीव म्हणून ओळखला जाणारा चैतन्याचा अंश देवाचाच होय. शिवलिंगाची मूर्ती दगडाची असो वा सोन्याची असो. तो देव दगडही नव्हे आणि सोने ही नव्हे. तसेच सामान्य मनुष्याच्या प्राणांतील चैतन्य असो वा साधु-संताच्या प्राणांतील चैतन्य असो, चैतन्य ते चैतन्यच ! तेव्हा स्त्री-पुरुष हा भेद, लहान-थोर हा भेद, उत्तम-कनिष्ठ भेद लोप पावून अखंड प्रकाशाचे दर्शन होते. हेच देव चिंतन होय !

ज्ञान दोन प्रकारचे. एक तर-तम. दुसरे अखंड. लौकिक ज्ञान तर-तम ! कोठे कमी-कोठे अधिक ! गणित शास्त्राचा प्राध्यापक गाढा विद्वान असतो. पण तो आपल्या विषयापुरता. त्याची पत्नी व्यवहार चतुर. तिला गणितं शास्त्राची गहन प्रमेयं सोडविता येत नाहीत. पतीच्या दृष्टींने पत्नी

अज्ञानी. पत्नीच्या दृष्टीने व्यवहार ज्ञानाच्या बाबतीत पती अडाणी ! अखंड ज्ञान तसे नव्हे. ते सर्वत्र एकरूप असते. त्या अखंड ज्ञानाची उपासना हाच शांतीचा मूळमंत्र होय.



## ४

मी हे फूल पाहतो. फुलाने मन व्यापिले तर ते पुष्प-चिंतन होय. नंतर पाहणारा मी ! त्याला पहायला कारण मन. या दोहोंचा भाव नाहीसा झाला तर तेच दर्शन ! परिदर्शन ! त्याक्षणीं आपण अनुभवतो तो विशेषानंद.

भगवंताच्या विषयींसुध्दा असेच ! भगवत् वस्तु मनाला व्यापून राहिली तर ते भगवत्-चिंतन. मी हा भाव नाहीसा झाला तर तेच भगवत् चिंतन. भगवंताचे अद्‌भुत दर्शन. विश्लेषण करून समोर वस्तु ठेवून पाहणे वेगळे. 'मी' नाहीसा होऊन अनुभव घेणे वेगळे. विश्लेषण करून पाहतांना वस्तु आपणास प्रत्यक्ष. पाहणारा मी, मन-करण (इंद्रिये) व त्या वस्तु, दृश्य विषय असे तीन वेगवेगळे भाव आहेत. पण प्रत्यक्षांत असलेला भेद-अन्यता भाव काढून टाकल्यास त्या वस्तूचा साक्षात्कार होतो. तेथे पाहणारा मी. मन, पाहणारे साधन व वस्तु-दृश्य हा भेद नाही.

गाढ निद्रेंत प्रवेश केला की आनंदानुभूति ! आनंद निमग्नता ! आनंदाचे साक्षात् दर्शन ! मीच तो आनंद ! तो आनंद म्हणजेच मी ! म्हणण्याइतकी एकात्मता.

स्वप्नावस्थेत तसे होत नाही. तेथे भेद आहे. अनेक वस्तु आपण स्वप्नांत पाहतो. त्या दृश्य वस्तुहून भिन्न होऊन वेगळा होऊन भगवद्

ध्यानाच्या प्रथम पायरींत म्हणजे संप्रज्ञात अवस्थेत आपण, देव आणि शुध्द ध्यान वृत्ति या भिन्न-भिन्न असतात. ध्याता-ध्यान-ध्येय ही त्रिपुटी. तेथे देव दर्शन घडते-प्रत्यक्ष. ध्यान दृढ होऊन असंप्रज्ञान समाधी होते. तेव्हा ध्यातृ भाव आणि ध्यान-भाव ध्येय वस्तूमध्ये समालीन होतात. तेव्हा असते ते केवळ ध्येय ! पण त्याला ध्येय म्हणतां येत नाही. तो ध्येय साक्षात्कार अथवा देव साक्षात्कार होय. ध्यान-ध्यातृ ही विकल्पवृत्ति नसलेली ध्येय सिध्दि ! तीच निर्विकल्प स्थिति !

निर्विकल्प स्थिति एका दिवसांत संपादन करता येत नाही. त्यासाठी नियमितपणे साधना केली पाहिजे. सवितर्क... निर्वितर्क... सविचार... निर्विचार... सानंद... सास्मिता... अशा पायऱ्या चढून वरच्या स्थितीला पोहोचायचे आहे.

तेनसिंगने एवरेस्ट शिखरावर पदार्पण केले. पण ही एका दिवसाची साधना नव्हे. बाळपणापासून गिर्यारोहणाचे बाळकडू त्याला पाजले होते. आयुष्यभर तो गिर्यारोहण करीत राहिला. रात्रंदिवस त्याला एकच ध्यास. एवरेस्ट शिखर काबीज करण्याचा ! त्याच्या सतत प्रयत्नांची परिणति म्हणजेच त्याला मिळालेला विजय ! हिमालयांतील सर्वोन्नत गिरिशिखरावर चढून जाण्याचा पहिला मान ! मनुकुलाच्या इतिहासांत त्या सर्वोच्च शिखरावर पदार्पण करणारा प्रथम मानव म्हणून सुवार्णाक्षरांनी त्याचे नांव नोंदले गेले !

एक भौतिक पर्वतारोहण करायला येवढी सांधना करावी लागते तर मग प्रज्ञा-शिखरावर चढून जाण्यास किती साधना करावी लागेल याची कल्पनाच केलेली बरी ! भौतिक विषयां विषयी राग लोभ यांच्या त्यागाने आरंभ करून ‘अहं’ चा त्याग साधला पाहिजे. ध्येयातिरिक्त अन्यविचार

त्यागाने संप्रज्ञात समाधि ! त्याग हीच साधना. त्याग हाच विराग ! त्याग हाच परम पवित्र देव मार्ग.

विराग : वस्तु-विषय यांचा त्याग करणें हाच विराग. हा सुलभ आहे. मनांतील सर्व भावना झटकून 'अहं' चा त्याग करून निराभारी होणे, हाच परम विराग होय ! हे कष्टसाध्य !

मी वेदांत ग्रंथाची रचना करतो, असे समजा. जगन्मिथ्या, हे सर्व जग म्हणजे स्वप्न, माया, भ्रम असे तर्कबध्दतेने मी प्रतिपादन करतो असे समजा. पण सर्व कांही भ्रमात्मक आहे असे प्रतिपादन करणारा माझा ग्रंथच सत्य आहे; हा भाव माझ्या डोक्यांत दृढ झालेला असतो. मन अत्यंत भारून जाते. बंधनांत सांपडते. नको त्या वस्तु आणि विचारांत मन गुंतते. तो मनाचा स्वभावच !

सामान्य विराग प्रथम आचरणांत आणला पाहिजे. सोडतां येतील तितके विषय सोडावेत. मग सोडलेल्या वस्तूंची आठवण, 'सोडले' त्याग केला हा भाव; सोडण्याची क्रिया-कल्पना सगळ्या टाकून द्याव्यात. तो परम विराग. विशेष-विराग !

एकदां एक वाटसरू दूरच्या प्रवासाला निघाला. उन्हाचा ताप. तहान-भूक यांनी व्याकूळ झाला होता. जवळच एक नारळाचे उंचच उंच झाड. शेंड्यावर नारळांचे गुच्छ त्याला खुणावून बोलावूं लागले. तो झाडावर चढला. भरपूर नारळ तोडून जमीनीवर टाकले. हळूहळू उतरू लागला. पांच-सहा फूट खाली उतरला असेल-नसेल तितक्यांत नारळाच्या शेंड्यावर अडकलेला पतंग त्याला दिसला. वाऱ्याच्या झुळकी बरोबर अडकलेला हेलकावे खाणारा

रंगीबेरंगी सुंदर पतंग. जरा हात पुढे केले की पुरे ! तो हाती आलाच म्हणून समजा ! त्याला वाटले तो पतंग धरावा ! एका हाताने झाडाचे खोड पकडून दुसऱ्या हाताने तो पतंग धरायला गेला. पतंग त्याच्या डोळ्यांत भरून राहिला होता. त्याच्या मनांत भरला होता. आपण कोठे आहोत ? काय करतोय ? सगळे-सगळे विसरला. पतंग पकडण्याच्या आतुरतेने तो वेडा झाला. पतंगाचा मोह त्याच्या डोक्यांत भिनला होता. आणखी थोडे, आणखी थोडे तो पुढे पुढे हात लांबवू लागला. झाडाची पकड ढिली झाली. पाय निसरले. झाडावरून जमीनीवर आपटला. डोके फुटले. प्राण पक्षी उडून गेला ! पतंग मात्र वाऱ्यावर डुलत-हसत होता. उडत होता. अजुनही पतंग उडतोच आहे. मनं आकर्षित होतात. पकडायचा प्रयत्न करतात, तो विषयरूपी पतंग वाऱ्यावर डोलत असतो. पकडण्याचा प्रयत्न करणारे मात्र घसरून पडतात. प्राणाला मुकतात. पाणीही तेथेच नि पतंग ही तेथेच ! पण त्याने माणसाला पाडले नव्हते. त्याच्या मोहाने त्याला पाडले होते. पुनः उठतां न येण्यासारखे. माणसाला नारळाचे गोड पाणी हवे ! त्यासाठी नारळाच्या झाडाच्या शेंड्यावर चढायला हवे. पतंगरूपी विषयाचा मोह त्याने टाळला पाहिजे. पण तसे होत नाही. सुखाची इच्छा करणारा माणूस सामान्यपणे विषय-व्यामोहाला बळी पडतो.

अधिकाराचा नारळ मिळावा म्हणून गल्लीपासून प्रारंभ करून दिल्लीपर्यंत माणूस चढत जातो. पण तेथे गेल्यानंतर नारळाने संतुष्ट न होतां पतंगरूपी विषय-व्यामोहात गुरफटतो. वरून खाली पडल्यावर नारळही नाही-पतंगही नाही. सगळे गमावून वेडा होतो. माणूस जीवनवृक्षावर चढतो. सुखाचे पाणी पिऊन आनंद मिळवायच्या आंत त्याला वेड लागते.

सरकारी अधिकार पदावरून माणूस सेवानिवृत्त होतो. सर्वांनाच

सेवानिवृत्त व्हावे लागते. पण माणसाचे मन अत्यंत विचित्र. रिटायर व्हायचे म्हणजे जेवढ्या उच्चपदावर माणूस पोहोचतो तेथून तो खाली उतरतो. पण खाली उतरायच्या आधीच अन्य अभिलाषांचा पतंग त्याला भुरळ पाडतो. सेवानिवृत्त झाल्यानंतर विश्रांति घेण्याचे त्याचे स्वप्न स्वप्नच राहते. अनेक आमिषांना बळी पडून माणूस मोहित होतो. जीवनाचा हात सुटतो. पाय घसरतो. अतृप्तीच्या धबधब्यातून कडेलोट होतो. आपल्या सर्वांच्या जीवनाची कथा ! ही शोकांतिका समजली तरच त्याला **विराग** विमोहावस्था प्राप्त होते. विषयासक्ति दूर होते. विषयासक्तीवर विजय मिळविण्याचे सामर्थ्य प्राप्त होते. तेच **वैराग्य** ! तीच संपत्ति ! तेच अभय ! त्याची बरोबरी करणारी श्री नाही. सोडणे हा विराग कां ? नव्हे. न धरल्याप्रमाणे राहणे हाच विराग ! घरदार, शेती-वाडी, पैसा-अडका सर्व कांही असावे, पण त्यांचा व्यामोह रक्तांत, हाडामांसांत रूतूं नये. सत्कर्मे करावीत. जन हिताचे कार्य करावे. पण मी केले हा अहंभाव टाकावा. 'मी' पण विसरावे.

***माडिदेनेंबुदु मनदल्लि होळेदरे***
***एडिसि काडित्तु शिवन डंगुर !***
***माडिदेनेन्नदिरा लिंगक्के***
***माडिदेनेन्नदिरा जंगमक्के***
***माडिदेनेंबुदु मनदल्लिल्लदिद्दरे,***
***बेडिद्दनीव कूडल संगमदेव । – म. बसवेश्वर***

**भावार्थ :** मी सत्कृत्य केले हा भाव मनांत क्षणभर चमकून गेला तरी, आपण देवाच्या अवकृपेला पात्र होतो. आपण शिवलिंगाची सेवा केली हा भाव मनांत आणूं नका. मी जंगमाची सेवा केली हा भाव मनांत आणूं नका ! मी सत्कर्म करातो हा अहंकार मनांत नसेल तर कूडलसंगमदेव आपल्या सर्व

मनोकामना पुरवितो.

निष्काम कर्म करावे. या ठिकाणी झाडलोट करून, पाणी शिंपून, जागा स्वच्छ केली आहे. स्वच्छ बैठक घातली आहे. उदबत्तीचा सुगंध दरवळतो आहे. प्रकाशाची उत्तम सोय आहे. आपण आनंदात बसून भगवत् चिंतनाचा स्वर्गीय अनुभव घेतो आहोत. या ठिकाणी बैठकीची व्यवस्था करणारे येथेच बसले आहेत. मागील बाजूस. तथापि ते कोण ? सभिकांना माहित नाही. त्यांच्या मनांत आपण सेवा केली हा भाव नाही. हा खरा विराग ! देव सुध्दां तसाच. त्याने आकाशाची रचना केली. थंडगार वाऱ्याची झुळुक निर्माण केली. सूर्य, चंद्र निर्मिले. मेघ निर्मिले, पाऊस पाडला. समुद्र भरविले. नद्या भरून वाहतील अशी व्यवस्था केली. पर्वतांची रचना केली. वनराई निर्मिली. येवढे करूनही तो कोणालाही आपले अस्तित्व जाणवूं न देतां मौन राहिला. त्याच्या ठिकाणी 'मी केले' हा अहंकार नाही. केलेल्या उपकाराच्या परतफेडीची अपेक्षा नाही. घोटभर पाणी अन् घासभर अन्नदान करणारे महाभाग आपल्या उदार (?) देणगीचा केवढा डांगोरा पिटवितात. कोणाचे पाणी ? कोणाचे अन्न ?

तो मात्र नाम निराळा ! भरलेली घागर जशी शांत, डचमळत नाही तसा तो. करून केले नाही. देऊनही दिले नाही. सदा सर्वदा निःशब्द ! हेच विराग तत्व !

मानवामध्ये राग म्हणजे अनुराग अधिक ! वस्तुवरील मोह अधिक. जी संपत्ति आपली नव्हे. त्याच्यावरही डोळा ठेवतो. अशिक्षित माणूसही त्यांतून सुटला नाही. सुशिक्षित माणूस सुध्दां सुटला नाही. वर दक्षिणा, वधु दक्षिणा, देणगी, प्रेझेंटस् साठी वेडा होतो. परधना विषयी येवढी आसक्ति बाळगणारा माणूस स्वकष्टार्जित संपत्तीचा त्याग कसा बरे करूं शकेल ? राग... रोमारोमांत

भिनून राहिला आहे. राग नसेल तरच 'विराग'. तोच देव. निराभारित्व ! या विरागाचे चिंतन करावे. त्याचा अंगिकार करावा !

**यतोवा इमानि भूतानि**
**जायंते येन जातानि जीवंति ।**
**यत् प्रयंत्याभिसंविशंति**
**तद् विजिज्ञासस्व । तद् ब्रह्मेति ।।**

या जगांतील जी जी वस्तु-प्राणि ते सर्व त्याच्यापासून निर्माण झाले. त्याच्या आश्रयांतच जगतात. शेवटी त्याच्या ठायीं प्रवेश करून, त्याच्यामध्येच लीन होतात. तो आदि-मूळ. मध्याधार ! अंत्यमूळ !

येवढे सर्व करून सवरून तो नि:शब्द राहतो ! अशी ही विराग-स्थिती. या विश्वाला पाहून विश्वनाथाचे विराग रूप अनुभवावे.

जेथे जेथे परम विराग आहे. तेथे तेथे देव आहे. जेथे जेथे वैराग्याचे दर्शन घडते. तेच देवाचे दर्शन ! मातेच्या ठिकाणी विराग असेल तर माता देव. पित्याच्या हृदयी असा विराग भाव असेल तर पिता देव ! अतिथि-आचार्य यांच्या ठिकाणी विराग असेल तर अतिथि देव ! आचार्य देव ! तुमच्या हृदयीं हा भाव असेल तर तुम्ही सुध्दां देवच ! अशा विराग दर्शनाने मन स्वस्थ होते. समाधान लाभते. हे भगवत् चिंतनाचे फलित होय !

सत्कर्म करून विसरणे हा दैवी-गुण. कर्म करून त्याची जाणीव ठेवणे हा व्यवहार ! कर्म न करतां ही केल्याची बढाई मारणे हा अपराध !

सत्कर्म करूनही मौन राहणे हा दैवी गुण ! सत्कर्म केल्याचे बोलून दाखविणारा दांभिकं ! गांधीजीनी सत्कर्म केले. स्वातंत्र्य आणून दिले. केवढी

अद्‌भुत शक्ति ! गांधीजी बोलू लागले तर चाळीस कोटी जन सर्वांगाचे कान करून देहभान हरपून ऐकत रहात. स्वातंत्र्य मिळाले. ब्रिटिश गेले. रिकाम्या राजसिंहासनाकडे कोणीतरी दुसरे-तिसरेच धांवत सुटले. हाडांची काडे करून रात्रंदिवस स्वातंत्र्यासाठी झगडणारे गांधीजी कोठे तरी मौन प्रार्थना करीत होते. देश-हितासाठी. अखेरचा श्वास सोडला राम... राम... म्हणत.

आम्ही मात्र भाषणबाजी करीत होतो. की ''आम्ही स्वातंत्र्य लढ्यांत प्राणांची बाजी लावून लढलो. त्यामुळे राज-सिंहासनावर आमचाच हक्क आहे !'' स्वातंत्र्यसंग्रामाच्या दशकांमध्ये आपल्यापैकी बरेच जण जन्माला सुध्दां आलो नव्हतो. तरी पण भाषणबाजीत आपण कोणालाही हार जाणारे नव्हे. ही तर विरागाची अवहेलना. रागा-लोभाचा थयथयाट !

महात्मा बसवेश्वर म्हणजे लाखो शिवशरणांचे पूज्य दैवत. त्यांचे प्राण चेतन. पंच-परीस असा तो पुरुष. क्रिया-सिध्दि. त्याने भव्य अशा अनुभाव-सिंहासनाची रचना केली. पण त्या सिंहासनावर स्वत: आरूढ व्हायचे मनांत सुध्दां आणले नाही. अल्लम-प्रभूच्या आगमनाची आतुरतेने वाट पहात राहिला. अल्लम प्रभु आले. अनुभाव-सिंहासनारूढ झाले. कांही दिवसांनी सिंहासनावरून उतरले. हे माझे सिंहासन असे कधी अल्लमप्रभु म्हणाले नाहीत. आपल्यामागे त्या सिंहासनावर कोणी आरूढ व्हावे ते सांगितले नाही. निराभारी होऊन निघून गेले. बारा वर्षे देशभर संचार केला. त्या सिंहासनाची आठवणसुध्दां झाली नाही. अगाध विराग ! एक घटकाभर घर सोडून आपण येतो. पण सदा घरची आठवण ! ही राग-स्थिती ! अल्लमप्रभूंची सहज विराग स्थिती. म्हणून तो महापुरुष ! वैराग्याचा मूर्तिमंत अवतार ! सदगुरू. तोच देव ! वाऱ्याच्या झुळकीसारखा त्याचा सहज संचार !

निराभारी-निरपेक्ष ज्ञानी जन केवळ गतकालामध्येच होते असे नव्हे. आजसुध्दा सर्व देशामध्ये आहेत. जगांतील सर्व देशांमध्ये आहेत. त्यांचे निरपेक्ष जीवन समजून घेणे हेच चिंतन. त्यांचे अनुकरण करणे अभिचिंतन.

आपल्या सभोवती असे अनेक आढळतात. दूर कशाला ? तुम्ही आपल्या घरी आपल्या पत्नीकडे थोडेसे लक्ष द्या. तुमची धर्मपत्नी तुमच्यासाठी तुमच्या मुलाबाळांसाठी किती बरे कष्ट उपसते.रात्रं-दिवस. जरा सुध्दां आळस नाहीं की कंटाळा नाहीं. तुम्हाला जशा आठवड्याच्या एक-दोन सुट्या... वर्षातल्या दोनशे सुट्या. तशा त्यांना नसतात. तुमचे हित तेच आपले हित मानून जीवन कंठतात. त्यांची सुध्दा विरक्तीच. त्यांच्यामध्ये सुध्दां देवत्व पाहणे हेच चिंतन !

जगांत विरागी व्यक्ति अनेक असतात. सगळीकडे असतात. आपण नीट डोळे उघडून पाहिले तर सर्वत्र भगवंताचे विराग-रूप दर्शन घडल्याविना राहात नाही. कचऱ्यावर उगवलेल्या वेलीमध्ये... पणतीमध्ये तेवणाऱ्या ज्योतीमध्ये-गोड फळांनी बहरलेल्या वृक्षांमध्ये विराग रूप भरले आहे. मात्र हे ओळखायला आपण शिकले पाहिजे.





जगामध्ये भगवंताला आणि भगवंताच्या अधिष्ठानामध्ये जगाला पाहणे हा सर्व संतांना आवडता विषय. जग अत्यंत विशाल. अनंत असे आकाश एकीकडे आणि कालातीत, देशातीत, परिपूर्ण सत्य... दुसरीकडे. तोच भगवंत. दोहोंना वेगळे करायचे असेल तर दोहोंना परिमित केले पाहिजे. एक असेल तेथे दुसरे नसले तर दोहोंना वेगळे करतां येईल. येथे एक वस्तु अनंत आहे. दुसरी वस्तु अनंत वाटण्याइतकी विस्तृत आहे. त्यामुळे त्या दोन्ही वस्तु वेगळ्या करून पाहतां येत नाहीत.

सागरामध्ये कांहीही घडले तरी ते सागराहून भिन्न नव्हे. तरंग सागराहून भिन्न नव्हेत. सागरांतील जीवजंतू सागराहून भिन्न नव्हेत. त्यांच्यामध्ये सागरच भरून राहिला आहे. सागराचा अंश ग्रहण करून स्वतंत्र वाटण्याइतकी एक सुंदर वस्तु सिध्द झाली आणि ती सागराहून संपूर्ण वेगळी दिसली तरी ती वस्तु सागराहून पूर्णपणे भिन्न नव्हे. बीजा पेक्षा वृक्ष फार भिन्न नसला तरी भिन्न होऊन दिसतो. कारण ? आपला दृष्टिकोण !

सीमा रहित भगवंत हाच परम आधार. परम अधिष्ठान. हे प्राकृतिक जग अत्यंत विशाल. दोहोंना वेगळे करून पाहतां येत नाही. भगवंताला पहायचे असेल तर जगाला वगळून पहावे असेही नाही. एका दृष्टीने पाहिले तर ते

अशक्य होय ! कारण जोपर्यंत दिसण्याची क्रिया आहे तो पर्यंत मनाचा व्यापार आहेच. हे मन प्राकृतिक. मन हे जगापासून वेगळे असे तत्व नव्हे. जोपर्यंत मी पाहतो... मी अनुभवतो... तोपर्यंत जग आहे आणि असलेच पाहिजे.

मन म्हणजे विचारांचा स्रोत ! भावनांचा प्रवाह ! ते क्रियाशील, गुणशील, विकासशील. ते प्राकृतिक विस्तारात विहरते. इंद्रियाद्वारे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध अनुभवते. सुख-दुःखांचा अनुभव घेते. सूक्ष्म वैचारिक विश्वामध्ये स्वच्छंदपणे विहरते. पण जेथे शब्दादि गुण नाहीत, सुख-दुःखादि भाव नाहीत, जेथे विचार नाहींत तेथे मनाचा प्रवेश होत नाही. मनाचा प्रवेश व्हायला हवा असेल तर ते अमनस्क झाले पाहिजे.

इंद्रियसंन्निकर्षाने देवसत्य पाहण्याची आशा आपली. 'इंद्रियांनी जे जे दिसते ते ते देव नव्हे.' हा भ्रम आपणांत दृढमूल झाला आहे. म्हणून इंद्रियसंन्निकर्षाने आपणास, देव दिसत नाही. हे खरे समजंले तरी हरकत नाही. परंतु जे जे प्रत्यक्ष डोळ्यांनी दिसते ते नाही असे समजून; भ्रम किंवा माया समजून; जे दिसत नाही ते पाहण्याचा हव्यास आपला. त्यामुळे आपली साधना अस्तव्यस्त झाली आहे. मनात असमाधान. असाध्य ते साध्य करण्याचा अट्टाहास. सहज साध्य जे आहे, त्याची उपेक्षा ! तर मग भगवत्-साक्षात्कार कसा होईल ? कानांनीच निःशब्दता ऐकण्याचा आग्रह धरला, डोळ्यांनीच निराकार वस्तु पाहण्याचा प्रयत्न केला, स्पर्शातीत वस्तूला हातांनी धरू गेले तर ते कसे साध्य ? तसेंच या मनाद्वारे भगवंताला पाहूं जातां ते साध्य होईल काय ? ज्ञानी जनांनी भगवंताला पाहिले. कोणत्या उपायाने ? दिसणाऱ्या वस्तूंमध्ये ! दृश्य वस्तूंच्या रूपानेच भगवंताला पाहिले. दिसणारे ते पाहून न दिसणारे जाणून घेतले.

**''कंडुद कंडु काणढुद काणबहुदु नोडा !''**

दृश्य वस्तु पाहूनच अदृश्य जाणतां येते.

जे जे दिसते... ते त्या अदृश्य वस्तूचे अभिव्यक्त रूप असेच त्यांनी जाणिले. अभिव्यक्त जगाला पाहून अनभिव्यक्त भगवत् दर्शनाचा आनंद त्यांना झाला. हीच देवदर्शनाची रीत होय !

एक होता बौध्द धर्माचा मठ. तेथे एक ज्ञानी गुरू. एक विद्वान तेथे गेला. जिज्ञासु. त्याची साधना गणनीय अशी. पण त्याला सिध्दि लाभली नव्हती. त्या झेन गुरुपाशी जाऊन नमस्कार करून त्याने प्रार्थना केली.

''गुरु महाराज, मला साधना करण्याचा सुलभ मार्ग दाखवा ! निर्वाणाची अनुभूति व्हावी अशी साधना !''

''सुलभ साधना ? अवश्य सांगतो. ही साधना केली तर निर्वाणानुभूति ! त्याची साधना करून पहा !'' गुरु म्हणाले.

विद्वान माणसाला आश्चर्य वाटले. त्याने अनेक विध साधना अनेक वर्षे आचरणांत आणल्या होत्या पण त्याला निर्वाणाची अनुभूति झाली नव्हती. निर्वाणाची अनुभूति होणे सोपे नव्हे. साधना करतां येतील. शास्त्र मुखोद्गत करतां येतील. सांगता येईल, ऐकतां येईल, पण अनुभूति होणे कठिण. अनुभूति होण्यांत अडचणी निर्माण होतात. त्या ऐकीव व सांगितलेल्या गोष्टींमुळेंच. आचरणांत आणलेल्या कठिण क्रमामुळेच आमचे ग्रंथ, आमची साधना पध्दति अनेक वेळां बाधक ठरतात.

त्या विद्वानाने अनेक साधना केल्या होत्या पण त्याला सिध्दि लाभली नव्हती. सिध्दि मिळविण्यास तो आतुर झाला होता. उतावळा झाला होता.

"गुरु महाराज सांगा ! ती साधना मी निश्चित आचरेन !"

गुरुनी दोन्ही हातांनी टाळी वाजविली, "आतां मी दोन्ही हातांनी टाळी वाजविली. तूं एकाच हाताने टाळी वाजव अथवा आणखी कांही कर ! एका हाताने ज्याक्षणी शब्द करतां येईल, त्याचक्षणी मुक्ति !"

विद्वानाने एक हात वीणेकडे नेला. झंकार झाला. नगारीवर आपटला. मोठा ध्वनी झाला. पण तो शब्द केवळ एका हाताने झाला नव्हता. तेथे दुसरी वस्तु होती. त्याने एक हात अधांतरी धरिला. कसलाच शब्द झाला नाही. तो विचारांत मग्न झाला. काळ हळुहळु सरकू लागला. महिने गेले. वर्ष गेले. तो विचार करीतच होता. एके दिवशी त्याला सत्य ज्ञान झाले. हात मौन. महामौनच त्याला शब्द होऊन ऐकू आला ! एक हस्त अनाहत नाद तो. सर्व काही मौन झाल्यावर ऐकू येणारा रव तो !

तो संतोषाने गुरुपाशी आला. गुरु ध्यानस्थ बसले होते. शिष्याच्या आगमनाची चाहूल लागतांच त्याने डोळे उघडले. विद्वानाच्या मुखावर प्रसन्नता होती. निर्विकल्प निर्वाणाचा मनोभाव त्याच्या मुखावर अभिव्यक्त झाला होता. गुरुने विचारले.

"तूं एका हाताने टाळी वाजवूं शकतोस का ?"

तो विद्वान म्हणाला, "गुरु महाराज, मी टाळी वाजवितो आहे, आपणांस ऐकू आली नाही कां ?"

गुरु म्हणाले, "तूं धन्य झालास ! तूं आतां निर्वाणाचा पथिक झालास !"

''निर्वाणाचा पथिक कोण ?'' शिष्याने विचारले.

''कोणी नाही !'' गुरु हसले. शिष्य ही हसला. साक्षात्काराचा हा मार्ग ! अशा सूत्रांचा आधार घेऊन सत्य जाणणे हेच चिंतन ! दृश्य वस्तु पाहून अदृश्य पाहणे. जाणण्याजोगे जे आहे ते जाणून; जे जाणतां येत नाही, ते जाणणे, ही एक कला आहे. त्यासाठीच चिंतन !

सर्व काळी सर्व वस्तूंमध्ये क्रिया आहे. ती व्यक्त असो अथवा अव्यक्त, अणूंमध्ये, आकाशामध्ये, मनामध्ये, मनाबाहेर, वर-खाली, सगळीकडे क्रिया आहे. देवशक्तीने प्रारंभिलेली क्रिया ती ! ती अद्‌भुत क्रिया ! ती अणुरूपक्रिया ती विश्वरूप क्रिया असेपर्यंत वस्तू आहेत. क्रिया नसेल तर वस्तू नाहीत. क्रिया अथवा क्रिया प्रवाह म्हणजेच वस्तू. मग ती लहान असो वा मोठी असो. भूमि सामान्य ! आकाश घन (विशाल) ! येथे तैलदीप तेवतो आहे. तो सामान्य दीप. तेथे सूर्य दीप तो घन, विशाल !

अल्लमप्रभू म्हणतात.

*भूमियाकाश ओंदु जीवनदुदर;*
*अल्लिं घनवेनु घनवेन्नदवंगे ?*
*अल्लिं किरिदेनु किरिदेन्नदवंगे ?*
*आ घनवुमनक्के गमिसिदरे*
*इन्नु सरियुंटे गुहेश्वरा ?*

**भावार्थ :** भूमि असो वा आकाश एकाच जीवनाचे उदर होय ! वस्तु घन न मानणाऱ्याला तेथे मोठे अथवा घन कसे ? वस्तु लहान न मानणाऱ्याला तेथे लहानपण ते कसले ? ती घन वस्तु मनांत प्रवेश करतां तेथे लहान थोर-घन

असा भेद नाही गुहेश्वरा.

''ही भूमि. ही जड वस्तु. वर आकाश. ती घन वस्तू ! भगवंत ! भूमि· भगवंत नव्हे. ती सामान्य जड वस्तु. इथे चालणारे प्रत्येक कार्य जड-सामान्य. तेथे वर आकाशांत चालते ते भगवंताचे कार्य. ते दिव्य.'' असे समजणे अल्पज्ञान होय ! भूमि असो वा आकाश एका जीवनाचे उदर ते ! एक देह, दोन मुख ! एक देह, दोन अंग ! भूमि वेगळी, आकाश वेगळे; असे नाही ती एकच महान वस्तु. मूळ वस्तु देव. एकाच वस्तुचे दोन अंग ! निराकार व साकार ही दोन्ही सत्याची अंगे. एका दृष्टीने पाहिले की साकार. दुसऱ्या दृष्टीने पाहिले की निराकार.

तेथे घन ते काय घन न म्हणणाऱ्यांना. येथे लहान न म्हणणाऱ्यांना लहान ते काय ? कोणते लहान येथे ? कोणते घन तेथे ? जाणून घेतले तर ते घन-महान वाटत नाही. हे लहांन वाटत नाही. येथे भूमंडल पाहून, तेथे भगवंताला पाहून हे सर्व भगवंताचेच रूप असे ज्ञानी मानतो.

ते महान तत्व-ईश्वरतत्व या मनाला गम्य होते, मनात प्रवेश करते-स्पर्श करते तेव्हां हे मन जिकडे जिकडे पसरते, तिकडे तिकडे भगवंतमय होऊन दिसते. हे लहान नव्हे. ते घन-महान नव्हे. अंतिरिक्षाचे कार्य फार महान नव्हे. या जगाचे कार्य लहान नव्हे. सर्व कार्ये भगवंताची. महान. घन ! अमोघ !!

भगवंताच्या सानिध्यांत रुपित झालेली सर्व कांही दिव्यकृति होय ! चाललेली सर्व दिव्य घटना होय ! त्यांच्यामध्ये एखादी लहान नव्हे, एखादी महान नव्हे.-प्रत्येक वस्तु प्रत्येक क्रिया, प्रत्येक घटना तितकीच अमूल्य. हे

जाणून घ्यावे. फुलवेलीमध्ये कोणती श्रेष्ठ ? कोणती कनिष्ठ ? मुळाचे कार्य कनिष्ठ आणि फुलाचे कार्य श्रेष्ठ आहे काय ? दोन्ही समानच त्या फुलालाही भगवंतच मूळ स्रोत आणि त्या वेलीलाही भगवंतच मूळ स्रोत.

मूळ आणि फूल यांच्यामध्ये 'मी श्रेष्ठ', 'तूं श्रेष्ठ' असा वाद चालला. फूल म्हणाले.

''अरे मुळा, तूं किती कुरूप ! मातींत पुरलेला तूं ! क्षुद्र ! अल्प. तुझा आदर सत्कार करणारे कोणीही नाहीत. मी देवांना प्रिय. मानवाचा लाडका. भ्रमरांचा प्रिय-पात्र. माझ्यामुळेच तुला महत्व.''

''अरे फुला, तुला तुझ्या सौंदर्याचा गर्व चढला काय ? पण तुझ्या सौंदर्याला मकरंदाला मीच कारण. माझ्यामुळेच तुझे अस्तित्व ! उगाच गर्व करू नको.'' मूळ म्हणाले.

फूल हसूं लागले. ''अरे वा ! तुझ्यामुळे माझे अस्तित्व काय ? तू कोण ? तू मातीत सदैव पुरलेला. तुला सौंदर्य नाही. सुगंध नाही. जगाला पाहणारे डोळे नाहीत. तुझा उपकार मला कसला आलाय ? संबंध जगाला आपल्याकडे आकर्षित करून घेण्याची शक्ति असलेला मी कुठे ? आणि कोणालाही नजरेला न पडणारा तूं कोठे ?

मूळ हंसू लागले अन्न रस वाहून नेणाऱ्या नलिकेला अन्नद्रवाचा पुरवठा बंद करून टाकतांक्षणीच फुलाने मान टाकली. आपला जीवनरस कोठून येतो आहे ? याची कल्पना फुलाला नव्हती. जेवढे महत्व फुलाला... तेवढेच महत्व मूळालाही आहे. दोन्ही श्रेष्ठच !

लहान सहान कार्यांमध्ये सुध्दां भगवंताचे कला कौशल्य दिसते. महान कार्यामध्यें तो जसा व्यक्त होतो, तसाच लहान कार्यामध्यें सुध्दा व्यक्त होतो.

सॉक्रेटिस महाज्ञानी ! एकदां तत्वचर्चा चालली असता सॉक्रेटिसचा शिष्य म्हणाला, ''सॉक्रेटिस महाराज ! केवढे ज्ञानी आपण ! पण तुमची पत्नी अशिक्षित कर्कशा ! तुमच्या सारख्या ज्ञानी माणसाला समजून न घेणाऱ्या पत्नीशी लग्न करून, तुम्ही केवढी मोठी चूक केली बरे ?''

सॉक्रेटिस म्हणाला, ''मित्रा तुला माहित नाही, मी तत्ववेत्ता झालो तो तिच्यामुळे. तूं म्हणतोस तशा प्रकारची माझी पत्नी असती, तर मी तत्ववेत्ता कसा झालो असतो ?''

भगवंताचे कार्य सगळीकडे चालू आहे. माझ्या मध्येंही त्याचेच कार्य, तुमच्यामध्यें सुध्दा त्याचेच कार्य चालू आहे. आपल्या कार्यामध्ये थोडासा फरक असेल. एखादे कार्य लहान असेल. एखादे महान असेल. पण दोन्ही कार्ये पवित्रच. देव कार्य ते. भगवंताच्या दृष्टीने कोणतेही कार्य लहान नाही. कोणतेही कार्य महान नाही. सगळे सारखेच. म्हणून एखादे कार्य सामान्य वाटले, तरी ते अमोघ; देव कार्यच होय. त्याला ओळखायला शिकले पाहिजे. अल्प वस्तु पाहून, अल्प क्रिया पाहून महत् ब्रह्माची कल्पना करतां आली पाहिजे.

वाल्मिकी अजून वाल्या कोळ्याच्या रूपांत होता. तेव्हां त्याला सर्वजण घाबरून जात. नारद प्रसन्न वदनाने त्याला समोर गेला. नारदाच्या त्या प्रसन्नतेने वाल्मिकीला वेड लावले. त्या प्रसन्नतेचा अनुभव घेत तो

झाडाखाली बसला होता. तीच वाल्मिकीची तपस्या. तेव्हां व्याधाच्या बाणाने घायाळ होऊन एक पक्षी आकाशांतून खाली कोसळला. त्याची जोडिदारीण पक्षिणी दु:खाने विलाप करूं लागली. त्या दु:खाची अनुभूति वाल्मिकीला झाली आपोआप एक श्लोक त्याच्या मुखांतून बाहेर पडला.

*मा निषाद प्रतिष्ठां त्वं अगम: शाश्वति: सम:!*
*यत् क्रौंचमिथुनादेकमवधि: काम मोहितम् ।।*

या बीजरूपी श्लोकांतूनच रामायणासारख्या महाकाव्याची निर्मिती झाली. सहजपणें हृदयाच्या गाभ्यांतून बाहेर पडलेला एक लहानसा उद्‌गार! पण महाकाव्याची वस्तु ठरला तो. कोणत्या रूपांत कसले महान तत्व दडले आहे ते सहजासहजी समजण्यासारखे नाही म्हणून क्षुद्र समजून कशाची ही उपेक्षा करूं नये.

***"He is there where the tiller is tilling the hard ground, where Path-maker is breaking the stones; He is with them in sun and shower."***

रवीद्रनाथ टागोरांचे हे उद्‌गार ऐका ! डोळे उघडून पहा ! देव कोठे आहे ? उन्हा-पावसांत राबणाऱ्या शेतकऱ्यांत, रस्त्यावरी खडी फोडणाऱ्या श्रमिकांमध्ये आहे. भगवंताला पहायचे असेल तर उन्हा-पावसांत राबणाऱ्या शेतकऱ्यांकडे जा. खडी फोडणाऱ्या श्रमिकांकडे जा. खरं तर शेतीची कामे करणारा शेतकरी आणि खडी फोडणारा श्रमिक यांना आपण हीन समजतो. परंतु भगवंत व्यक्त होतो तेथेच. सर्व कार्य-व्यापार भगवंताचेच.

एकदां एका माणसाने महापूजा करविली. लक्षदीपार्चना. रात्री तो झोपी

गेला. भगवंत त्याच्या भेटीला आला. भक्ताने विचारले,

"देवा मी लक्ष दीपाराधना केली. कशी काय वाटली तुला ती पूजा ?"

देव म्हणाला, "मला सवड नव्हती. दुसरी खूप कामे करायची होती. पाऊस पाडायचा होता. फुले उमलवायची होती. तुला दीपाराधना प्रिय असेल पण मला लहान-सहान कामे सुध्दां तितकीच प्रिय."

कार्यामध्ये भगवत् दर्शन ! भगवान कसा आहे ? अमोघ. त्याचे एक कार्यसुध्दा व्यर्थ नव्हे एक वस्तु सुध्दा व्यर्थ नव्हे. अशा अर्थपूर्ण जगाच्या प्रत्येक कार्यामध्ये भगवत्-शक्ति-सामर्थ्य अभिव्यक्त होते. अरे मानवा त्याचा अनुभव घे ! हे अमोघ कार्य भगवंताचे ! महात्मा बसवेश्वरांनी या जगाविषयी म्हटले इदु ***'कर्तारन कम्मट'*** कर्त्याचे कार्यागार हे ! येथे कोणतेही कमी नव्हे. कोणतेही अधिक नव्हे. कॉम्प्युटरमध्ये हजारो लहान लहान रेखा असतात. त्यापैकी एखादी रेखा जरी बिघडली, तरी संपूर्ण कॉम्प्यूटर बिघडून जातो. तसेच जगांतील सर्व बारीक मोठी कार्ये महत्वाची. एखादे कार्य लहान म्हणून उपेक्षा केली तर सगळ्या जगाचा व्यापार थंडावतो. एखाद्या अणूमधील कार्य थांबले तर काय होईल ? अणूमध्यें कार्य काय चालते ? इलेक्ट्रॉन व प्रोटॉन यांना बांधून ठेवायचे ते कार्य थांबले तर सर्व जग नष्ट होईल.

या देहामध्ये डोळ्याचे काम श्रेष्ठ आणि पोटाचे काम कनिष्ठ नव्हे. हाताचे काम श्रेष्ठ आणि पायाचे कनिष्ठ नव्हे. सर्वांचे कार्य तितकेच श्रेष्ठ. डोळ्यांत ही भगवत् शक्ति आहे, पायांत ही भगवत् शक्ति आहे. अशा समदृष्टीने पहायला शिकले तर भगवत्-भाव-चिंतन होय.

सत्यकाम बालक, ज्ञान पिपासु. विद्या शिकायला गुरु-सानिध्यांत गेला

गुरुजीनी त्याला एकदम विद्या शिकवायला सुरूवात केली नाही. त्याला कांही गायी देऊन, रानांत गायी चारायला पाठविले. ''या गायी शंभर होईपर्यंत त्यांचे पालन कर. त्यानंतर आत्मज्ञानोपदेश.''

बालक गायी चारायला गेला. निश्चिंतपणे, निरामय, निर्मल अंतःकरणाने. उन्हाने अंग तापले सूर्योदयाच्या सौंदर्याचा त्याने आस्वाद घेतला मंद वाऱ्याच्या झुळकीसंगे सुखावला. चांदण्यांत मुक्तपणे गाऊं लागला. वाहत्या नद्यांच्या काळ्याशार पाण्यामध्ये मनसोक्त डूंबूं लागला पशुपक्षांच्या आवाजाच्या नकला केल्या. रानफुले रानफळे मनमुराद चाखली. मनोमन अंतराळांत विहरूं लागला. अशी जवळ जवळ दहा वर्षे उलटली गाईंची संख्याही शंभर झाली होती. उद्या गुरुर्जींपाशी जायचे.

तो नदीतीरावर विचारमग्न होऊन बसला. चांदण्यांत नदीचे पात्र किती मनमोहक दिसत होते ! प्रशांत ! पाण्यांत उठणारे तरंग त्याच्या ह्रदयांत भाव -तरंग निर्माण करीत होते. तो मंत्रमुग्ध होऊन पहात राहिला. त्या समाधी अवस्थेत नदी देवता येऊन म्हणाली.

''सत्यकाम, इकडे पहा... माझ्याकडे. मी स्थिर नव्हे. सदा प्रवाही. एक क्षणही थांबत नाही. हे सगळे माझ्याप्रमाणेच प्रवाही. कांहीही स्थिर नाही. हेच विश्व सत्य. स्थिर आहे केवळ तुझा नि माझा आत्मा. हेच तुला आज घडलेले सत्यदर्शन.''

सत्यकाम दार्शनिक झाला. गुरे चारायचे हलके काम करूनच तो ऋषि झाला. जो डोळस असतो, जो प्रत्येक कार्यात मनापासून स्वतःला झोकून देतो, त्याला सामान्य कार्यांमध्ये सुध्दा साक्षात्कार होतो. म्हणूनच विश्वाचे प्रत्येक कार्य अमोघ होय. अर्थपूर्ण होयं. पाहूं जातां तेथेच देवाचा साक्षात्कार.

भगवंताला या जगाच्या रूपाने पहावे भगवद्रूप दिव्य प्रज्ञेवर या जगाची भावना करावी. कोणतेही लहान-मोठे हा भेद न करतां कोणतेही काम करतां करतां त्या कामामध्येच साक्षात्कार करून घेण्याचे सूत्र हेच भगवत् चिंतन.

एक माणूस भिंत बांधत होता. ते एका श्रीमंताचे घर. संगमरवरी दगडाच्या भिंती. तो श्रीमंत माणूस भिंत बांधयाचे काम लक्ष देऊन पहात होता. मोठ्या मोठ्या दगडांच्यामध्ये लहान लहान चिपा भरीत होता गवंडी. श्रीमंत म्हणाला.

''माझ्या घरांत लहान चिपा खापांचा उपयोग नका करू. फक्त वेचीव मोठे मोठे दगड घेऊन बांधा. बारीक चिपा कशाला ?''

गवंडी म्हणला, ''मालक, हे मोठे-मोठे दगड आपल्या जागी घट्ट रहायचे असतील तर त्यांना आधार द्यायला या लहान चिपा अत्यंत आवश्यक.''

मोठे लोक मोठेच रहायचे असतील तर त्यांना लहानांचा आधार हवा. विशाल प्रासाद बांधायचा असेल तर डोळ्यांना न दिसणाऱ्या चिपा पाहिजेतच. मोठ्यांना जेवढे महत्व तेवढेच लहानांना. हा दृष्टीकोन. भगवंताचा लीला विलास हा. जसे डोळ्याला-हाताला पायाला सारखेच महत्व. तसेच सर्वांनाही सारखेच महत्व. ही भगवत् कृति. हे सामान्य जगत म्हणजे भगवत् कार्य होय. ज्याचे कार्य अर्थहीन नव्हे, तोच भगवंत या दृष्टीने पाहिले तर साक्षात्कार झालाच म्हणून समजावे. बसतां, उठता, चालतां, बोलतां चिंतन असेल तर तेथेच देवदर्शन.



६

विश्वामध्ये असंख्य वस्तु. त्यापैकी कांही वस्तूंवर आपण प्रेम करतो. जीवनभर ! त्या वस्तूवरील आपले प्रेम दृढ होते. त्या वस्तूच्या संपादनेने आपले जीवन कृतार्थ झाले असे वाटते. मानव एखाद्या वस्तूवर अत्यधिक प्रेम करतो. आयुष्यभर. त्या वस्तूसाठी स्वत:लाच समर्पित करतो. तो ज्या वस्तूवर प्रेम करतो; ती सामान्य असेल, पवित्र असेल, लौकिक असेल अथवा अलौकिक असेल. सामान्य वस्तूसाठी जगणारा तो सामान्य. पारमार्थिक वस्तूची उपासना करणारा तो साधक.

सामान्य असो, अथवा साधक असो. दोघांनाही एक प्रकारचा संतोष असतोच. ज्या वस्तूवर आपण प्रेम करतो, ती वस्तु आपणांस संतोष देते. वस्तु कोणतीही असो त्याला महत्व नाही. लहान वस्तूवर प्रेम केले अथवा मोठ्या अथवा बहुमोल वस्तूवर प्रेम केले तरी संतोषच. आइनस्टीन सारख्या वैज्ञानिकांनी विश्वचिंतनासाठी आपले सर्वस्व वाहिले. जीवनभर ! त्या कार्यातच त्यांना संतोष मिळाला. विश्व चिंतनामध्ये ते इतके मग्न झाले होते की त्या संतोषापुढे नोबेल पारितोषक, देशांच्या अध्यक्षांचे स्थान ही त्यांना क्षुल्लक वाटले. कळाहीन वाटले.

एखादा लहान मुलगा समुद्राच्या किनाऱ्यावर जाऊन शिंपले, सागरगोटे गोळा करतो. त्याला केवढा आनंद ! केवढा संतोष ! तो बाकीचे सर्व कांही

विसरून त्या शंख-शिंपल्यामध्ये मग्न होऊन जातो त्याच्या पित्याला त्या शंख-शिंपल्याचे कांहीच महत्व नाही. त्याला धन संपादन करण्यांत संतोष. मुलाचा संतोष शंख-शिंपल्यात, तर बापाचा संतोष पैसा कमावण्यात. त्या दोघांच्या संतोषाची-आनंदाची तुलना करतां येत नाही. दोघांच्या संतोषांत सुध्दा विशेषता आहे. आपण ज्या वस्तु मौल्यवान नाहीत असे समजतो, त्या शंख-शिंपल्यात त्या सागरगोट्यात बालकाला होणारा आनंद; राजा महाराजांना रत्ना-माणकांत होणाऱ्या आनंदाहून कमी नव्हे. त्या बालकाला ते सागरगोटे म्हणजेच सर्वस्व ! पित्याला पैसा हाच परमार्थ. इतरांचे ही तसेच. ज्यांच्या त्यांच्या आवडीचे पदार्थ ज्यांना-त्यांना परमार्थच !

**''ओलिद लौकिकरिगे स्त्री पुत्र धन कनकादिगळे ब्रह्म.''**

मोहित लौकिकांना स्त्री-पुत्र-धन-कनक हेच ब्रह्म. तारूण्यामध्ये लग्न. पत्नी-मुलेबाळे यांचा व्यामोह. म्हातारे झाले तरी अन्य विषयांकडे ध्यान नाही. इतके ते तन्मय होतात. सुरूवातीला प्रपंचांत तन्मयता. नंतर नातवंडांशी खेळण्यात तन्मयता. सामान्य वस्तूंमध्ये सुध्दां आमरण देहभान विसरून तन्मयता.

आतां तपकीर किंवा तंबाखू यांचे उदाहरण घ्या. किती क्षुल्लक वस्तु. एकदां कां आपल्या आयुष्यात प्रवेश झाला की संपले. बायको मुलं सोडतील. राज्य सोडतील. सर्वकांही सोडतील पण ही पुडी सुटणारी नव्हे. इतकी ती पुडी बंधनकारी. इतकी ती सुखकारी. संसार ही तसाच ! धन, सति, सुतादि संपादनारूप संसार ! तो बंधनकारी. मरेपर्यंत तो सुटत नाही. तो सुखकर वाटतो. त्यांतच माणूस निमग्न ! कष्टसाध्य असल्यामुळे तो तितकाच दुःख कारकही !

संसार धरतां ही येत नाही. सोडतां ही येत नाही. सोडता न येण्यायेवढे सुख व धरता न येण्यायेवढे दुःख यांत सामावले आहे. माणूस त्यांतच रमला आहे. त्यालाच समर्पित झाला आहे.

काहींजण विश्वाचे चिंतन करतात. त्यांतच मग्न होतात. ते विज्ञानी होत. प्रापंचिक बंधने त्यांना नाहीत.

आणखी कांही लोक संसारिक आणि वैश्विक चिंतनाच्या परीधी ओलांडलेले. ते या विश्वावर प्रेम करतात. विचार करतात. शोध लावतात. पण ते कशामध्येच बुडालेले नाहीत. मुक्त ते ! तेच संत ! निश्चिंत अनुभवी ! विषय विचाराचे बंधन त्यांना नाही. सहज सिध्द ते !

एकदां एक संगीतज्ञ अनेक देशांचा संचार करीत एका राजाच्या दरबारांत आला. राज सभेंत रसिकांना तोटा नव्हता संगिताची मैफल रंगू लागली. रात्र जसजशी चढेल तस तसा रंग भरूं लागला. काळ सरकूं लागला. गातां गातां तो संगीतज्ञ देहभान विसरून गेला. हजारो रसिक श्रोते मंत्रमुग्ध होऊन ऐकत होते. महाराज तर गान समाधीत मग्न ! भैरवीच्या अखरेच्या आलापानंतर गायक भानावर आला. सारे सभिक, महाराज काही वेळानंतर भानावर आले. संगीताचा आनंद-अद्‌भुत आनंद. नाद-ब्रह्म ! सर्व सभिकांनी टाळ्यांचा कडकडाट करून आपला आनंद व्यक्त केला. सर्वांनी मुक्त कंठाने वाहवा केली. महाराजांनी दुसऱ्या दिवशी त्या गायकाचा जाहीर सत्कार करण्याचा आपला मनोदय व्यक्त केला.

दुसऱ्या दिवशी दरबार भरला. सगळे अधिकारी, विद्वान, गुणीजन सभेत हजर झाले. महाराजांनी अमूल्य रत्नजडित हार त्या गायकासाठी बनवून

घेतला होता. सारेजण आले. पण गायकाचा पत्ता नव्हता. किती वेळ वाट पाहिली, तरी तो आला नाही. कोठे गेला तो ?

त्या दिवशी संध्याकाळी तो दूरवर फिरायला गेला होता. निळ्याशार स्वच्छ पाण्याने भरून वाहणाऱ्या नदीचा किनारा. मऊ मऊ वाळू. तो वाळूशी खेळ करीत बसला. चंद्रोदय झाला. त्याच्या शीतल किरणांनी सर्व वातावरण जादुमय झाले. झुळु झुळु वाहणारे पाणी. सगळीकडे हिरवेगार. वातावरण धुंद झालं होतं, वाऱ्याच्या मंद झुळकीबरोबर त्याच्या ह्रदयांतून गान लहरी उमटूं लागल्या. संगीताच्या स्वरलहरी... जललहरी... वायुलहरी... अद्‌भुत नाद ब्रह्म ! नदीच्या त्या जल लहरीवरून तरंगत नाद लहरी, वायु लहरीवर तरंगत साऱ्या रानावनांत पसरल्या. सगळे विश्व आनंदात डोलूं लागले. राज दरबारांतील सन्मानाची आठवण नाही. देह भान नाही. नाद ब्रह्मांत गाढ समाधी ! गायकाला शोधीत महाराज आणि दरबारी नदी तीरावर आले. तेही त्या आनंद लहरींत तरंगू लागले कुणीतरी गायकाला गान समाधीतून जागे केले. सगळे राज दरबारी महाराजांसमवेत त्याला शोधत आले होते. त्याचा सन्मान करायला.

तो म्हणाला, ''माझा सन्मान ? निसर्गाने माझा सन्मान केला आहे. मानवाच्या सन्मानांची मला काय गरज ?'' आणि तो जसा आला होता, तसाच निघूनही गेला.

त्याची स्थिती म्हणजे करूनही न केल्यासारखी, निर्लिप्त. आपणाला मात्र कार्योत्साहापेक्षा सन्मानोत्सव महत्वाचा. सामाजिक आणि राजकीय पदवी-प्रशस्ती यांमध्ये खूप आसक्ति. कार्य म्हणावे तर जेवढ्यास तेवढेच. आम्हाला मिळालेल्या या प्रशस्तीला खरे पाहिले तर काय महत्व आहे ? तरी

पण त्यांचे वेड आपणांस ! पद्मश्री... पद्मभूषण... भारतरत्न ! अशा पदव्या मिळाव्यात म्हणून केवढी धडपड ! लहान मोठी पदवी, मान-सन्मानही असेच. माणूस यांत गुरंफटतो. जे या बंधनात सांपडत नाहीत, ते खरे विमुक्त. चेतन. त्यांना आवडणारी परम गति म्हणजे देव.

***''विमुक्तानां परमा गतिः''***

अशा पवित्र ब्रह्म गतीची आस या वचनांत दिसते.

***एंदो, संसारद दंदुग हिंगुवदु ?***
***एंदो, मनदल्लि परिणामवहुदेनगेंदो एंदो ?***
***कुडलसंगम देवा,***
***इन्नेंदो परम संतोषदल्लिहुदेनगेंदो ?*** – ***बसवेश्वर***

**भावार्थ :** कधी बरे संसाराच्या जंजाळांतून सुटका होईल ? केव्हां बरे मनांत (दैवी) परिणाम होईल ? कूडलसंगदेवा, कधी बरे मला परमानंदाचा लाभ होईल ?

संसाराचे आकर्षण नाही. त्यातून बाहेर पडण्याची उत्कंठा ! कूडलसंगमदेवाच्या सुखामध्ये परिणत होण्याचे स्वप्न ! सर्वजण एक मुखाने जय जयकार करीत असताना सुध्दा बसवेश्वरांचे अंतरंग परमेश्वराकडे धाव घेत होते. लौकिक मान-सन्मान मोठेपणा यांचा स्पर्शही त्यांना झाला नाही.

***तनु सोंकि तनु नष्ट वायित्तु***
***मन सोंकि मन नष्ट वायित्तु***
***भाव सोंकि भाव नष्ट वायित्तु***

**इद्धु कारण कुडल चेन्न संगय्य लिंग सोंकि**
**शरणन संदु नष्ट वायित्तु** **– चन्नबसवेश्वर**

**भावार्थ :** देहावर इष्टलिंग धारण केल्याने देहांत समरस होऊन देह-तनु इष्ट लिंगाला समर्पित. तेव्हा ती लिंगतनु, प्राकृतिक तनु नष्ट झाली. जड तनुभाव नष्ट होऊन प्रसाद तनु झाली.

मन म्हणजे सूक्ष्मदेह. या मनांत मनोगत प्राणलिंगाचे स्मरण भरून राहिल्यावर ते मन लिंग-मन झाले मनाची प्राकृतिकता नष्ट होऊन ते मनः प्रसाद झाले. तेथे मन नष्ट झाले.

भाव म्हणजे जीव-भाव अंतरंगात अस्तिव मात्राने वास करणारे भावलिंग जीवभावांत भरून राहिल्यावर अज्ञान नष्ट झाले ! अनुभूति झाली. लिंग साक्षात्कार झाला ! जीव शरण झाला. साक्षी. भावानुभूति झाली.

त्या शरणांत नि:सीम महालिंग भरून राहिल्यावर 'मी शंरण' हे भिन्न ज्ञान नष्ट झाले.

अशाप्रकारे तनु-मन भाव तीन्ही नष्ट झाल्यावर 'शरण' ही बुध्दी नष्ट झाली. शरण अनंततेंत लीन झाला. त्या लीनतेंत राहिले ते निर्मल लिंग तत्व !

ही अवस्था ज्याने अनुभवली तो महानुभावच मुक्तात्मा होय ! तनु-मन-भाव या पासुन मुक्त झालेला चेतन पुरुष.

सामान्यपणे आपण सर्वजण स्थूल, सूक्ष्म आणि जीव भावाच्या वलयामध्यें गुंतलो आहोत. या तीन प्राकृतिक युति, या युतींच्या नाशासाठी,

विमुक्तीच्या अनुभवासाठी चिंतन !

बुध्द, महावीर, शंकर, अल्लम या सर्व महानुभवांनी त्या युति नसलेल्या सत्य पद-परमगतीची आस धरली. परमगति अनुभविली. आपले सर्व जीवन त्यांनी परम गतीसाठी अर्पण केले. देव झाले.

*''विमुक्तानां परमा गतिः''*

देवाला पारमार्थिकांची परमगति हे नांव आहे. संत या भूमीवर अवतरतांक्षणीच त्या 'परमगतीच्या' दिशेने आपली यात्रा आरंभ करतात. मेघांतून सुटलेला जल बिंदू त्या क्षणीच सागराच्या दिशेने वाट चालूं लागतो त्या जलबिंदूला सागराची वाट माहित नसते त्या जलबिंदूला येवढेच माहित आहे की उताराच्या दिशेने धावत जायचे. सागरांत विलीन होणे निश्चित.

आमच्या ठिकाणी अशी निश्चिल श्रध्दा क्वचितच आढळते. साधना क्रमामध्ये संदेह. ध्येयामध्ये संदेह. गम्य महा अस्तिवात संदेह. संदेहाच्या युतीमध्ये गुंतून जीव गतिहीन झाला. अन्य लौकिक आणि स्वर्गीय गतीमध्ये आसक्त झाला.

परमगतीचा विसर पाडणारे विषय असंख्य. वस्तु, सांसारिक पसारा, वैभव, मनोरंजन करणाऱ्या शब्द-रूपादि, विशाल राजप्रसाद, हिंदोळा, परिचारक वर्ग, नृत्य, संगीत, रस-पान अशा शेकडो विषयांच्या चिंतेमध्ये, मोहामध्ये देव चिंतनाचा विसर पडतो.

'भूतभृत् भूत भावनः' भगवद्गीतेंत परमगति-देवाचे वर्णन या शब्दांनी केले आहे भूते म्हणजे समस्त वस्तू त्या सर्व वस्तूंचे-भूतांचे रक्षण करतो, ते तत्व म्हणजे देव ! समस्त भूतांचे पोषण आणि रक्षण देव करतो असंख्य देह,

आकाश-काय, अणु पुंज, हा मंडप-तुम्ही आम्ही या सर्वांना धरून ठेवणारी बृहत शक्ति-बृहत् सामर्थ्यच देव होय ! तो परम गुरुत्वाकर्षण. अदृश्य महत्-शक्ति. सर्व भूतांचे मूळही तोच.

देवाने आपल्या भव्य विविध रूपांनी हे विश्व रचिले-धरिले. प्रकाश शक्ति, उष्णता शक्ति, स्नेह शक्ति, अणु शक्ति, प्रेम शक्ति, ज्ञान शक्ति अशी कितीतरी रूपें ! त्या शक्ति नसतील तर विनाश !

राम राज्याभिषेकाच्या वेळी अयोध्येत रामावर प्रेम करणाऱ्या असंख्य जनांना जणू स्वर्गच धरतीवर उतरल्याचा आनंद ! सगळीकडे आनंदी-आनंद पण मंथरेने त्यात मात्सर्याचा आंबटपणा मिसळला. कैकयीने त्याचे मंथन केले. प्रेम शक्ति दूर सरल्या. स्वर्गीय वाटणारी अयोध्या नरकप्राय झाली. दशरथ राजा मरण पावला. राम वनवासाला निघाला. राजगृहात दुःख. संपूर्ण अयोध्येंत दुःख ! सगळीकडे दुःखच दुःख !

देव म्हणजे परमगति भूत-भृत् आणि भूत भावन हे जाणून घ्यावे. त्यांचे चिंतन करावे. सभोवती पसरलेल्या भूत-वैभव आणि भूत-नाशांच्या क्षणी त्या सर्वांना मूळ असलेल्या देवाचे ध्यान करावे हेच चिंतन.





देव साक्षात्काराचे मार्ग चार. कर्म, भक्ति, योग आणि ज्ञान ! अनासक्त जीवन हेच कर्म ! हृदयांतील मधुरता हीच भक्ति ! मन निर्विकल्प झाले तर तो योग ! सत्य दर्शन झाले की ते ज्ञान !

कर्मशील माणसाला देव सर्वकर्ता. भक्ताला देव रससागर. योग्याला देव केवल. ज्ञानी माणसाला निःसीम चेतन. या चौघांमध्ये कोणी श्रेष्ठ नाही. कोणी कनिष्ठ नाही. वरील चार मार्गांपैकी कोणताही मार्ग श्रेष्ठ अथवा कनिष्ठ नाही. ज्यांना त्यांना आपापला मार्ग प्रिय. ज्यांचे त्यांचे दर्शन त्यांना पवित्र, मुक्तिदायी. कुंभाराने मातीला वेगवेगळे रूप आणि आकार दिला. वेगवेगळी नांवे दिली मात्र सगळी रूपे होय ही. आणि कोणतेच रूप नव्हे ही. तसेच आपल्या दृष्टीने देवाचे रूप वेगवेगळे वाटले तरी, तो मात्र म्हटले तर सर्व तोच, म्हटले तर कशांतही नाही.

ही विरोधाभासाची भाषा झाली. पारमार्थिक क्षेत्रांत ही भाषा सर्व सामान्य ! अनिवार्य ! माती म्हणजेच गाडगे आणि माती म्हणजे गाडगे नव्हे ! दोन्ही सत्यच. एकेका दृष्टीकोनाने, आकाराकडे लक्ष दिले तर ते गाडगे ! वस्तुकडे लक्ष दिले तर गाडगे नव्हे ! गाडगे असे वास्तविक कांही नाहीच.

ग्रीक तत्वज्ञानी डायोजिनिस श्रेष्ठ संत. एक माणूस त्यांच्यापाशी आला

त्याने विचारले,

''संत महाराज, सांगा पाहूं, मी कोण आहे ते !''

डायोजिनिस म्हणाला, ''तूं ? सर्वांना ठाऊक आहे; तू श्रीमंत !'' तो माणूस म्हणाला ''आपण मला श्रीमंत म्हणता आहात पण माझ्याजवळ धन संपत्ति नसेल तर मी कोण ?''

संत म्हणाले, ''तर मग तू कोण ? मला माहित नाही तुला सुध्दा माहित नसलेला, तोच तूं !''

संताच्या बोलण्यामध्ये विरोधाभास आहे. तरी पण ते सत्य ! आपणास कोणी विचारले, ''तुम्ही कोण ?'' तर आम्ही सांगू, ''मी शिक्षक'' ''मी कारकून'' ''मी अधिकारी'' ''मी शेतकरी'' खरे पाहता आपण शिक्षक नव्हे. कारकून नव्हे नि अधिकारी ही नव्हे. आपल्या जीवनांत कांही काळ आपण ती वृत्ति स्वीकारली होती इतकेच. सर्व वृत्ति सोडून दिल्या तर आपण शिक्षक नव्हे, उरलेला मी कोण ? कांही सांगता येत नाही ना ! म्हणूनच आपण निश्चितपणे काही सांगू शकत नाही.

''मी शिक्षक आहे.'' ''मी शिक्षक नाही.'' दोन्ही गोष्टी पूर्ण असत्य नव्हेत. आपणा स्वत:विषयीच इतकी संदिग्धता असताना मानवीय मती-बुध्दीच्या व्याप्तीच्या पलिकडे व्यापून असणाऱ्या देवा विषयी आमची भाषा किती बरे द्वंद्व युक्त असणार नाही ?

देव स्वतः पुरता पूर्ण. 'केवल' शब्दातीत. आपण वेगवेगळ्या दृष्टिकोनांतून वेगवेगळ्या मुखाने पाहून वेगवेगळ्या विविधतेने वर्णन करतो. आपण केलेले वर्णन परस्पर विरोधी असूं शकेल. पण ते पूर्ण असत्य नव्हे. तो

आपल्या भावनेत उमटलेला देव ! मी भक्त तर तो स्वामी ! मी योगी तर तो ध्येय ! मी ज्ञानी तर तो केवळ चेतन ! मी जसा, तसा तो !

भक्त, योगि, ज्ञानि, कोणी श्रेष्ठ नव्हे. कोणी कनिष्ठ नव्हे, त्यांच्यामध्ये तुलना करणेही योग्य नव्हे भक्त तो भक्तच. योगी तो योगीच. ज्ञानी तो ज्ञानीच. ज्या दृष्टीने पाहणे आम्हांला योग्य वाटेल. त्या दृष्टीने आपणं पाहतो. तेव्हा आपणास समाधान होते. भक्ताला साकार मूर्तीची पूजा करणे आवडते. योग्याला निर्विकल्प समाधि प्रिय. ज्ञानी माणसाला महाप्रज्ञारूप आवडते देवानेही त्यांना तसेच दिसायला हवे ना ? तसे दिसलेली ही देवाची विभिन्न रूपे. त्या सर्वविध रूपामध्ये चिंतन व्हावे. ज्यांच्या त्यांच्या इच्छेप्रमाणे.

सीता देवीला रामाने एका रीतीने पाहिले. लक्ष्मणाने एका रीतीने पाहिले. रावणाने एका वेगळ्याच रीतीने पाहिले. लक्ष्मणाला दिसलेली सीता रामाला दिसली नाही. रामाला दिसलेली सीता रावणाला दिसली नाही. ती सर्वांना वेगवेगळ्या रूपांत दिसली. इतकेच नव्हे तर तिला स्वत:ला सुध्दा ती वेगळीच दिसली. एकदा रामाची प्राणप्रिया होऊन दिसली. तर दुसऱ्यांदा परित्यक्ता.

एकच व्यक्ति विविध रूपांत दिसणे हेच जीवनाचे सौंदर्य ! जीवनाचे वैभव ! एकाच रूपाने, एकाच भावाने असणे, या जगात कधीच शक्य नाही.

देवाला आपण वेगवेगळ्या दृष्टीने पहावे. विविध रीतीने त्याचे वर्णन करावे विविध लक्षणयुक्त अशा देवाचे चिंतन करावे. आता जे चिंतन आहे... ''अव्यय-व्यय''.

प्रत्येक वस्तूचा व्यय होतो. क्षणा-क्षणाला उदा. दीप. तेल क्षणाक्षणाला कमी होते. वात जळून लहान होते. दीप जळतो म्हणजे तेल आणि वात यांचा

व्यय. हे सत्य जगांत सगळीकडे दिसते. यौवनांत आपला देह, सौंदर्य, शक्ति, बुध्दि या सर्वांनी भरलेला असतो. नंतर त्या सर्वांचा व्यय होऊन शेवटी नाश. 'व्यय होणे' हा वस्तूचा आंतरिक गुणधर्मच होय.

'व्यय होणे' शाश्वतपणे थांबवितां येत नाही. तुम्ही कसलेही दिव्य औषध घ्या ! घोर तपश्चर्या करा ! महाज्ञानी व्हा ! महात्मा व्हा !

कपाळी पिकले केस, गालावर सुरकुत्या, शरीराचा बांक, अंगं गलितं पलितं मुण्डम्... थांबविता येणार नाही. यापूर्वी कोणाला चुकवितां आले नाही आणि ज्यांनी चुकविले असे आपण म्हणतो त्यांपैकी कोण जिवंत आहे ?

बसवेश्वरांनी किती सुंदर कल्याण रचिले. जणू भूमीवरील स्वर्गच ! धर्म-नीती यांचे माहेरघर. भक्तीचे भांडार. कायकक्षेत्र. प्रेम-सौजन्याचे राज्य ! हजारो शिवशरण दासोही; वचनकार, अल्लमप्रभू सारखे निराभारी जंगमश्रेष्ठ ! ते कल्याण आज नाही. एखाद्या जलाशयांत एक तरंग उत्पन्न व्हावा आणि विलीन व्हावा तसे सर्व कांही लयाला गेले... ते धर्म वैभवही तसेच.

अडीच हजार वर्षापूर्वी बुध्द आला. तो जेथे जेथे गेला, जेथे जेथे थांबला तेथे तेथे वैराग्याचे संन्यासाचे वादळ झाले. राजा-महाराजांनी... राजपुत्रांनी सुध्दा चीवर स्वीकारला. हजारो लोक ''बुध्दं शरणं गच्छामि... संघं शरणं गच्छामि.'' या मंत्राचा जप करू लागले. संपूर्ण उत्तरावर्तांत हा मंत्र घुमू लागला. आशेवर विजय मिळविण्याची स्पर्धा... युध्द जणू पुकारले गेले. पुढे कांही शतकांतच ''संन्यास-वैभव'' लयाला गेले. सध्या त्या प्रदेशात आशेचे थैमान सुरू झाले आहे.

फार दूर कशाला जायचे ? येथेच पहा ना, या शहरांतच कितीतरी

विद्वान, सुसंस्कृत, कलाजीवि, अधिकारी आहेत. प्रत्येक महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत सर्वांच्या मुखावर प्रसन्नता. खिशांत धनलक्ष्मी. संपूर्ण शहर सुखांत डुंबत असते. महिना संपत येईल तसा खिसा रिकामा. मुखावरील कळा ? अवकळा ! महिन्यांतून एकदां सुखाची, पैशाची लाट येते.

विश्वांत सुध्दा तसेच. सूर्य-नक्षत्रे ही काळाने प्रज्वलित केलेली निरांजने. आतां जळताहेत. प्रत्येक क्षणी कोटी कोटी टन वायु जळून जातो. कांही कोटी वर्षानंतर हे आकाशदीप विझून जातील. प्रकाश नाहीसा होईल. सगळीकडे अंधार... घन अंधार पसरेल ! ते व्ययाचे अंतिम रूप !

हा व्यय सिध्दांत सगळीकडे आजमावून पहा ! आमचा धर्म. आमची कीर्ति-प्रतिष्ठा कांही काळानंतर विरघळून जातात. उन्हानं बर्फ वितळावं तसं. ते शाश्वत व्हावेत म्हणून आपण किती प्रयत्न करतो. किती धडपडतो प्रसंगी प्राण द्यायला अथवा घ्यायला मागे पुढे पहात नाही. आपण ज्याचा अभिमान धरतो, ते सर्वकाळी चिरंतन रहावे. हा आपल्या अल्प बुध्दीचा भ्रम !

व्यय होते ते जगत् ! या जगातच व्यय न होणारे एक महान तत्व आहे. ते अव्यय. तोच देव. तो ज्ञान सूर्य ! अपरिमित प्रकाश आंत-बाहेर सगळीकडे भरून राहिला आहे. बृहदारण्यकामध्ये त्याचे वर्णन.

**स वा एष महान् अज: आत्मा अजरो**
**अमरो अमृतोऽभयो ब्रह्म**
**भवति य एवं वेद (बृ. ४-४-२५)**

विश्वाचा अधिपति देव ! तो आत्म-पुरुष, अजर, अव्यय, अमृत, अभय. ‘‘जनक राजा, तुझे हे राज्य, तुझी अपार संपत्ति; अधिकार तुझा-क्षत्रिय-वीर





देह सर्व कांही मेघाप्रमाणे वाऱ्यावर उडून जाईल ! क्षणांतच ! कोणत्याही वादळाने उडून जाणार नाही अशी 'आत्म' वस्तू आहे. ती 'आत्म' वस्तूच तूं ! तुझ्या सभोवती व्ययशील जगत् ! व्ययशील विश्वामध्ये अव्यय तूंच ! तूं त्याचेच ध्यान कर ! त्याचेच चिंतन कर !'' याज्ञवल्क्य ऋषींचा उपदेश.

व्यय होणारे जग पहातच 'अव्यय' ओळखून त्याला जाणून घेणे हाच योग होय ! हाच ज्ञान मार्ग ! दीपा समोर बसून तेलाकडे लक्ष द्या. तेथे व्यय दर्शन. पाहणाऱ्या स्वत:कडे पाहिले तर तेथे आत्म दर्शन. अव्यय दर्शन. हा ज्ञान मार्ग ! ज्ञानयोग. विश्वच व्यय होऊन गेल्यावर जे राहते ते अव्यय ब्रह्म ! हा अव्यय... विश्व असतानाच जाणून घेणे ज्ञान साधन. देह असो, प्रपंच असो, बंधु-बांधव असो. ते सर्व व्ययशील अशी खात्री असूं द्या. त्यामुळे निश्चिंतता, निराभारित्व उत्पन्न होते.

जीवनाच्या व्यय क्षणांचे निरिक्षण अद्भुत असते. गुडघ्यांवर दुडुदुडु धावणारे बालक हा प्रथम अंक ! खांद्यावर पुस्तकांची बॅग घेऊन शाळेला जाणारा शाळकरी बालक, हा दुसरा अंक ! महाविद्यालयाचा स्नातक, हा तिसरा अंक ! चौथ्या अंकात विवाह मंडप-सपत्नीक ! पाचव्या अंकात चार पांच मुलं-बाळं ! आजच्या काळात चार पांच नव्हे एक अथवा दोन पुरेत. सहाव्या अंकांत वृध्दाप्य ! दृष्टि मंद ! पाऊल अडखळते ! पाहणारे हसतात. शेवटच्या अंकात स्मशान ! सर्व अग्नीमध्ये जळून जाते अथवा मातींत मिसळते. शेक्सपियरने या जीवन नाटकाचे सुंदर वर्णन केले आहे.

हे नाटक पाहणारा आत्मा. त्याला अवस्था नाहीत. सदा एकरूप. हे नाटक पहात असतानाच आपले ज्ञान आपणांस झाल्यास ते अव्यय चिंतन. ज्ञान-दर्शन.





हे भगवत्-चिंतन. देवाविषयी दार्शनिकांनी, अनुभावी पुरूषांनी अनेक गोष्टी सांगितल्या आहेत. त्यांच्या बोलण्यांत भगवंताचे भावचित्र उमटले आहे. देवाला रंगाने रंगविता येत नाही. दगडामध्ये कोरतां येत नाही. शब्दांच्या माध्यमानेच त्याला जाणले पाहिजे. एखादा चित्रकार कितीही समर्थ असो... मायकेल एंजेलो सारखा... तरी पण सर्व कांही रंगांनी चितारतां येत नाही. मुख रेखाटतां येईल. डोळ्यांत कोणताही भाव अभिव्यक्त करतां येईल. अंग सौष्ठव... सौंदर्य रंगविता येईल. पण मन आणि मनांतील भावना चित्रांत व्यक्त करता येत नाहीत. का तर विचार-भावना आकार रहित, वर्ण रहित.

भगवंत नित्य निराकार. मनाला सुध्दा अगम्य तत्व. त्याला रंगात रंगविता येत नाही. दगडात कोरता येत नाही. ती सर्व अत्यंत परिमित माध्यमं. मनुष्याला लभ्य अशा साधनांपैकी अत्यंत प्रबळ साधन म्हणजे भाषा. म्हणूनच ऋषीनी, शरणांनी भाषेचा आश्रय घेतला. त्या निःशब्द ब्रह्माला शब्दामध्ये व्यक्त करण्याचे साहस केले. त्यांचे शब्द समर्थ. त्यांचे मनन करून अर्थ-ध्यान करणे हेच चिंतन. तेच ब्रह्म साक्षात्काराचे सुलभ साधन !

''*प्राणौ वै परमं ब्रह्म*'' ब्रह्म वस्तु निस्सीम ! अमृत. तो विश्वंभर आणि विश्वातील 'प्राण'. त्याचे अनुसंधान करावे.

प्राण म्हणजे शक्ति. अचिंत्य शक्ति. तो अणूमध्ये आहे. आकाशामध्ये

आहे. तीच कालमूळ ! ती कालातीत. देहामध्यें जसे मन, तसे मनांत प्राण भरले आहे. विश्वाच्या आदि-अंतामध्ये आत-बाहेर व्यापून राहिले आहे. त्या प्राण रूपी शक्तीची विविध रूपे म्हणजे वस्तु. उदा. अणु. त्यांत काय आहे ? वैज्ञानिकांच्या मते तो एक शक्ति गोलक. त्यांत पोकळी. इलेक्ट्रॉन, प्रोटॉन, न्यूट्रॉन... त्या शक्तीचा बिंदू ! अणु म्हणजे घनीभूत शक्ति. एक ग्राम अणुराशींचा ऊर्जेसाठी उपयोग केला तर कितीतरी शहरे विद्युद्दीपांनी शृंगारतां येतील. शेकडो कारखाने चालविता येतील. अणूमध्ये इतकी शक्ति, तर मग विश्वाच्या अपार द्रव्यामध्यें किती शक्ति असेल ? ती विराट शक्ति विश्वप्राण ! ती नसेल तर विश्व असणार नाही. म्हणून ती विश्वप्राण. काल-देश-द्रव्यराशी सर्व कांही त्या विश्व-प्राणांतून उत्पन्न झाले. तो मूल-प्राण अत्यंत सूक्ष्म. देश-काल यांच्या व्याप्ती बाहेरील महा-बिंदू ! महा-लिंग ! तो हिरण्यगर्भ ! जगत उत्पन्न होण्याआधीची स्थिती. तेव्हां अजून देश-काल उमटले नव्हते. द्रव्य उत्पन्न झाले नव्हते. कार्य-कारण भाव नव्हता. तेव्हा असलेली सत्य वस्तू म्हणजे विश्व-प्राण !

''*वायुरनिलममृतमथेदं भस्मांतं शरीरं*'' असे ईशोपनिषदाने वर्णन केले आहे. मृत्यू झाला की देह अग्नीला अर्पण. देहांतील व्यष्टिप्राण (वायु) विश्वप्राणाशी (अनिल) एक होतो. तो विश्वप्राण अमृत, अविनाशी. त्या विश्वप्राणांचे मूल रूप अथवा अस्तित्व म्हणजेच 'देव' प्राण मूल प्राणाधिष्ठान.

दैहिक, मानसिक बौध्दिक शक्ति ही प्राणांची तीन रूपे. प्राणाधार तो निर्मलात्मा. तसेंच विश्वगत असंख्य शक्ति विश्वप्राणाची रूपे होत. विश्वप्राणाचा आधार तो परमात्मा. निर्मलात्मा, परमात्मा यांमध्ये सांदर्भिक नामभेद मात्र आहे. वास्तविक पाहतां त्यांच्यामध्ये भेद नाही. ती परवस्तु. त्या परवस्तूंत असणारी शक्ति, हे प्राण ! हे प्राण आपल्या भावनेला गम्य. ती

परवस्तु अवेद्य ! अगम्य ! या प्राणामार्फतच ती परवस्तु जाणली पाहिजे. या प्राणाला जाणून त्या आधारे प्राणाधाराला जाणावयाचे. त्याचा अनुभव घ्यायचा. तो प्राणाधारच देव ! तो 'अनिकेत'.

आपण देऊळ बांधतो. त्यांत प्रतिमेची स्थापना करतो. पण देवळांत भगवंताला बांधून ठेवणे कसे शक्य आहे ? घागरीमध्यें सागर भरणे कसे शक्य ? एक मोठा महाल बांधून त्यांत सूर्याला बंदिस्त करून ठेवणे कसे शक्य आहे ? तसेंच या छोट्याशा मतीमध्ये भगवंताला बांधून ठेवणे कसे शक्य आहे ? तो 'अनिकेत'; आपण देऊळ बांधू शकतो. प्रतिमेची स्थापना करू शकतो पण ती मूर्ती म्हणजेच भगवंत असे समजणें समंजस नव्हे. लोक फारच विचित्र कल्पना करतात. ''देव चर्चमध्ये आहे. मंदिरांत नाही !'' असे कांहीजण समजतात. ''तो चर्च मध्यें नाही, मंदिरांत नाही. तो मशीदीत आहे.'' असे कांहीजण समजतात. ''तो चर्च-मशीदींत नाही. तो मंदिरांत आहे.'' असे कांही जणांचे म्हणणे.

*जगदगल, मुगिलगल, मिगेयगल, निम्मगल*
*पाताळदिंदत्तत्त निम्म श्रीचरण*
*ब्रह्माण्डदिंदत्तत्त निम्म श्री मुकुट*
*अगम्य अगोचर अप्रतिम लिंगवे*
*कूडलसंगमदेवय्या,*
*एन्न कर स्थलक्के बंदु चुलुकादिरय्या !* — *महात्मा बसवेश्वर*

**भावार्थ :** देवा तुझा विस्तार जगायेवढा ! आकाश येवढा, त्याहूनी अधिक, तुमच्या येवढा ! पाताळाहून पलीकडे तुमचे श्रीचरण. ब्रह्मांडाहून पलीकडे तुमचा श्रीमुकुट. कूडल संगमदेवा. अगम्य अगोचर लिंग देवा, माझ्या

करस्थळीं येऊन सानुले रूप धरिले ना ?

लिंग सीमारहित. करस्थळांत त्याचे इवलेसे रूप. तो निलय. अनिकेताकडे नेणारे साधन. हे इवलेसे रूप पहावे डोळ्यांनी. भाव मात्र निस्सीम लिंगाला पहावे. इष्टलिंगाद्वारे महालिंगाची अनुभूति घ्यावी. हाच शरणांचा संदेश.

एकदां एका राजाने एक भव्य मंदिर बांधले. अनेक शिल्पी कित्येक वर्षे काम करीत होते. मंदिर पाहून राजाला हर्ष झाला. शुभ मुहूर्त पाहून मंदिरांत विधियुक्त मूर्तीची प्राण प्रतिष्ठापना केली. हा सोहळा पाहून लाखो लोक धन्य झाले. शेकडो पंडितांनी मनःपूर्वक स्तुति केली. राजाला अभिमान, आनंद. भगवंताला एक सुंदर मंदिर अर्पिल्याचा उन्मेष !

राजाला स्वप्न पडले. त्याने स्वप्नांत भगवंताला पाहिले. राजाने नमस्कार केला. ''देवा, तुझ्यासाठी एक मंदिर बांधले. कसलीही चूक न करतां विधियुक्त तुझी प्रतिष्ठापना केली. तुला हे मंदिर आवडले ना ?''

भगवंत म्हणाला, ''राजा, तूं बांधविलेले मंदिर मी पाहिलेच नाही. एका भक्ताने माझ्यासाठी सीमा रहित असे विशाल मंदिर बनविले आहे. मला त्या मंदिरांतून बाहेर पडायची इच्छा झालीच नाही.''

राजाने कुतुहलाने विचारले, ''देवा, तसे मंदिर मी कोठेच पाहिले नाही. कोठे आहे ते ? कोणी बांधले ?''

देव म्हणाला, ''राजा, ते मंदिर माझ्या भक्ताच्या पवित्र हृदयांत आहे. निर्मल प्रेमरूपी चुनेगच्चीचे आहे ते. भिंती नसलेले देऊळ. तेथे 'अहं' 'मम' भाव नाही. आशा-आकांक्षा नाहीत. मी कित्येक शतमानांपासून तसले मंदिर

शोधत होतो. कालच एका गरिबाच्या झोपडींत मला ते महामंदिर आढळले. मी तेथेच रमलो. तुझ्या मंदिराकडे यायला मला सवड झाली नाही.''

ही कथा सांकेतिक आहे. देव अनिकेत आहे. त्याला कोठेतरी निकेत नसलेल्या निकेताची कल्पना करायची असेल तर ते भक्ताच्या हृदयांत. समस्त जगाला आश्रय देणाऱ्या देवाला आश्रय भक्तिरूपी देऊळ.

एका गावांत एक गरीब कुटुंब रहात होते. पती-पत्नी आणि एक लहान मूल. चार पांच वर्षाचे. त्या मुलाचा पिता आकस्मिकपणें निधन पावला. आईही आजारी. तिनेही लौकरच इहलोकीची यात्रा संपविली. रिकामे घर. लहान मूल रडत होते. घर सोडून निघाले. गावांतील सगळी घरे पालथी घातली. कुणी सुध्दां त्याचा स्वीकार केला नाही. कुणी त्याला अन्नपाणी दिले नाही. कोणी त्याला आश्रय दिला नाही. निराशेने दुःखाने गांव सोडून निघाले.

अरण्य ! तेथे एक विशाल आम्रवृक्ष. आंब्यांनी लगडलेला. झाडाखाली दाट सावली. जवळच झुळुझुळु वाहणारा ओढा. झाडावर खूपच पक्षी होते. त्या मुलाला पाहून झाडाने विचारले.

''बाळा कोठे निघालास ?''

''मला नाही माहीत.'' मूल म्हणाले, ''मला नाही आई. ना बाप ! कोणी मला आश्रय दिला नाही. कोणी मला जेवूं घातले नाही.''

झाड म्हणाले, ''तूं कशाची काळजी करतोस ? तो पहा समोर ओढा वाहतोय ना, तेथे हात-पाय धू. पाणी पी. माझ्या सावलींत आरामांत रहा. ही घे गोड फळे खा. ज्यांना ज्यांना आश्रयाची गरज असेल त्या सर्वांना आश्रय

देतो. भुकेल्यांना गोड फळे देतो.''

त्या मुलाला खूप आनंद झाला. त्याने ओढ्याच्या गार पाण्यांत हातपाय धुतले. गोड फळे खाल्ली. पाणी प्यायला. झाडाखाली सावलींत आराम केला.

रात्र झाली. पिठुर चांदणे पसरले. देव तेथे आला. झाडाखाली बसला. मुलाने विचारले, ''देव बाप्पा, तूं इकडे कसा आलास ?''

देव म्हणाला, ''सर्वांना जो प्रेमाने आश्रय देतो, तेथेच मीही असतो. हे झाड प्रेमळ आहे. निराश्रितांना आश्रय देते. अनिमित्त मित्र. गावांतील ज्या लोकांनी तुला आश्रय देण्याचे नाकारले. त्यांनी मला सुध्दां टाकून दिले. तुला ज्या झाडाने आश्रय दिला आहे, तोच माझा आश्रय.''

आश्रयाची आशा धरून आलेल्या सर्वांना आश्रय देण्याचा उदार भाव ज्याच्या ठिकाणी आहे, त्याला गरज नाही; भगवंताला आमंत्रण देण्याची. भगवंतच त्याला शोधत येतो. रवींद्रनाथ टागोर म्हणतात,

''देवा, मी माझे घर झाडून सारवून स्वच्छ केले आहे. धूप घातला आहे. आंत दिवा तेवतो आहे. घरांत स्वच्छ वातावरण आहे. मी उंबरठ्यावर बसून तुझी वाट पाहतो आहे. तूं केव्हांही ये. चिंतेचे कांहीच कारण नाही.''

देवाला शोधत जाण्याची गरज नाही. आपले मन-घर निर्मळ असावे. वाट पहावी. तो आपण होऊन येतो. घराचे दार उघडे असूं द्या ! कसलाही अभिनिवेश नको. माझे असे कांही नाहीं असा निर्लिप्त भाव असूं द्या ! तेव्हां तो अनिकेत देव आपण होऊन तुमच्या दारी येतो. तुम्हांला शोधत. तुमच्या हृदय-मंदिरात. तुमच्या मनोनिलयांत. कारण ? त्याला सीमा नाही. ते निलय.

ते अनिकेतन. म्हणून ते देवाला प्रिय. भक्ति निलयच देव निलय ! हे अनिकेत चिंतन होय !

मनुष्याने एकदां कां असे सहज ह्रदय-सह्रदय प्राप्त करून घेतले तर भगवंताला बोलावण्याची गरज नाही. प्रार्थना करण्याची गरज नाही. चिंता करण्याचे कारण नाही. तो आपण होऊन येतो. पाश्चात्य देशांतील एक भक्त म्हणतो,

***"हे मानवा, प्रकाशासाठी येवढी प्रार्थना कां बरे करतोस ? खिडकी उघड. दरवाजा उघड. वाट पहात रहा. सूर्य आपोआप येईल. प्रकाश पसरवीत येईल."***

दारे खिडक्या बंद करून. भगवंताची कृपा व्हावी म्हणून कां बरे तपस्या करतोस ? दारे उघड. वाट पहात घरांतच बसून रहा. तात्काळ सूर्याच्या प्रथम किरणांचा प्रवेश आपोआप होईल. मानवा आपले मन स्वच्छ ठेव. त्याचक्षणीं भगवंताचा उदय; स्वच्छ मनांत आपोआप होतो. हा अनिकेत दृष्टिकोन होय !

जिकडे पहावे, तिकडे असलेल्या शक्ति कार्यांना पाहून तेथे असलेल्या विश्व-प्राणाला ओळखणे; विश्व-प्राणाचा महदाधार अशा वस्तूचे चिंतन करणे हे विश्व-प्राण चिंतन. विशाल अशा विश्व-प्राणाची मूळ आधार ती वस्तु. ते तत्व. ते सत्य. तो भगवंत. त्याचे निश्चित असे घर नाही. 'अनिकेत' तो. त्याला कसल्याही दगडी इमारतींत बांधून ठेवणें साध्य नाही. तो अभिव्यक्त होतो पवित्र ह्रदयांत. सुंदर ह्रदयांत. असे सुंदर-पवित्र ह्रदय प्राप्त करून घेणे, त्या ह्रदयांत अनिकेत भगवंताची अभिव्यक्ति होण्याची वाट पाहणे; हेच अनिकेत चिंतन ! हीच भक्ति-साधना. हाच मधुर मार्ग !



ତ୍ତ १ ତ୍ତ

तीन महान संपत्ती. देह, मन आणि मति. निसर्गाने आपणांस या तीन वस्तु दिल्या आहेत. अत्यंत अमूल्य आणि शक्तिमान अशा या निसर्गाच्या देणग्या. या तीहींच्या योगे आपण जगाचा अनुभव घेतो. या जगापासून आपणांला सुख हवे असल्यास, जीवनांत सार्थकता आणि विमल शांति लाभायची असेल तर, या तीन्हींचा उपयोग मोठ्या चातुर्याने केला पाहिजे. या तीन वस्तूंपैकी देह शाश्वत नव्हे. दैहिक सामर्थ्य सुध्दां जिवंत असेपर्यंत व्यवस्थित असेल असे सांगतां येत नाही. परंतु जगण्यासाठी, मग ते जगणे लौकिक असो वा पारलौकिक असो... देह अत्यंत आवश्यक. सुख अनुभवायला सुध्दां देह असायला पाहिजे; दुःख अनुभवायला सुध्दां देह हवा. संपादना असो, जय असो, श्रेयस् असो कांही असले तरी देह हवाच.

या देहाची रचना अद्‌भुत आहे. मातीपासून बनलेला असला तरी देह मातीसारखा नाही. माती जडवस्तु. निष्क्रिय. देह सक्रिय. प्राणयुक्त. या देहांतील एकेक अवयव, इंद्रिय कसे अगाध आहेत. डोळे, कान, नाक, हृदय, फुफ्फुस कसे अद्‌भुत कार्य करतात !

या देहांतच मन आहे. फारच सूक्ष्म ! मनावर संपूर्ण ताबा मिळवितां येत नाही. त्याच्या क्रिया आपणांस दिसतात. पण त्या मनाचे चित्रण करतां येत नाही.

मनाचे सूक्ष्म रूप म्हणजे मति ! वस्तूंचा अनुभव घेणे, विश्वाला जाणणे, यासाठी समर्थ साधन म्हणजे मति ! सर्व सिध्दांत, संशोधनें या मतीच्याच देणग्या !

देह-मन-मति या साधनांचा उपयोग सत्यदर्शनासाठी, शांति सिध्दिसाठी करणे हाच योग ! दैहिक क्रिया प्रधान असेल तर कर्मयोग ! मनोगत भाव प्रधान असेल तर भक्ति योग ! मानसिक वृत्ति निरोध प्रधान असेल तर ध्यान योग ! मति प्रधान असेल तर ज्ञान योग ! आपण आतां ध्यान योगाद्वारे भगवत् चिंतन केले पाहिजे.

सर्व जाती-धर्मांच्या लोकांना ध्यान साधना इष्ट आहे. कोणत्या ना कोणत्या रूपांत त्याचा उपयोग करतात. ध्यान म्हणजे एका वस्तूमध्यें एका क्षणाहून अधिक काळ मग्नता !

सामान्यपणे सर्वांना ध्यान माहित आहे. शब्द ऐकतांना, रूप पाहताना, रससेवन करताना जन मग्न होतात. बहुशः ध्यान न करणारे कोणी नसावेत. जगणेसुध्दा ध्यानाशिवाय अशक्य ! प्राणी सुध्दां याला अपवाद नाहीत. पक्षी सुध्दां गाताना, घरटे बांधताना किती मग्न असतात !

लौकिक वस्तूंमध्ये मग्नता असेल तर ते लौकिक ध्यान. टी. व्ही. पाहताना घर धनीण मग्न असते. आंत दूध उतूं गेले तरी त्याची जाणीव तिला नाही. मूल खेळताना मग्न होते. कोणी त्याचे पाकीट मारले तरी त्याला भान नसते. एक गरीब दिवा स्वप्नांत मग्न झालेला असतो. डोक्यावरील दुधाच्या घागरीचे भान त्याला नसते. ती घागर खाली पडून फुटल्यावर त्याला जाग येते. संसारामध्ये मग्न झालेला वृध्द; शंभर वर्षे कशी कंठली याची जाणीवच नसते त्याला. ही सर्व ध्यानाचीच उदाहरणे.

ध्यान कितीही गाढ असले तरी त्याचा शेवट हा असतोच. स्वभावत: चंचल चित्त किती काळ निश्चल राहील ? निश्चलता जीवनाला उपयुक्त नव्हे. मन संपूर्ण निश्चल झाले; क्रिया शून्य झाले तर ऐकणे, पाहणे इत्यादी ऐंद्रियिक दैहिक व्यवहार कसे बरे चालतील ? ते नसेल तर जीवनाची इतिश्री झालीच असे समजावे. देवाने उद्देशपूर्वक मनाला पाण्याप्रमाणे, वाऱ्याप्रमाणे चंचल बनविले आहे. हे मनाचे चलनच जीवन शक्ति; सौंदर्य ! मन जसे चलनशील तसेच ते एकाग्र होऊं शकते. तरी हे दोन्ही गुण शाश्वत नव्हेत. आपण जीवनोपाय म्हणून चलनशील गुण व योग साधनेला एकाग्र होण्याचा गुण यांचा उपयोग करून घ्यावा; योग्यवेळी योग्य रीतीने !

मन एका वस्तूवर स्थिर करणें हे ध्यान. ध्येय वस्तु शब्द असेल तर तो शब्द ध्यान योग ! रूप असेल तर रूपध्यान योग ! ज्योति असेल तर ज्योतिर्ध्यान योग. योग अनेक आहेत. पण सर्व योगांचे मूळरूप एकच. मन ध्येय वस्तूमध्ये अधिक काळ स्थिर करणे.

सकल विद्यासंपन्न नारद महर्षि सनत्कुमार ऋषीपाशी गेला. त्यांना वंदन करून म्हणाला,

"हे महर्षी ! मी अनेक विद्या संपादन केल्या पण समाधान नाही. संतृप्ति नाही. सत्यसाक्षात्कार नाही. मी आपल्या चरणीं ऋजु झालो आहे. आपला शिष्य समजून मला मार्गदर्शन करा !"

सनत्कुमार म्हणाले, "त्या सगळ्या नाम मात्र विद्या ! त्यांना विसर. आतां ध्यानाची उपासना कर ! ध्यान उपास्व !"

नारद म्हणाले, "म्हणजे ?"

सनत्कुमारांनी त्याना सभोवती पसरलेले पर्वत, अंतरिक्ष, आकाश दाखवून म्हटले, ''यांना निश्चलपणे पहात राहा !''

**''ध्यायतीव पृथ्वि ! ध्यायतीव अंतरिक्षं !**

**ध्यायतीव द्यौ...''**

''ही पृथ्वी, अंतरिक्ष, आकाश हे सर्व ध्यानमग्न आहेत. तसे ते तुला दिसत नाहीत काय ? तूं ही त्यांच्याप्रमाणे निश्चिंत, निर्लिप्त-निमग्न हो !''

पृथ्वीवर सगळीकडे हिरवळ पसरली आहे. हजारो पर्वत, सरोवरे, नद्या-सागर, गाणारे पक्षी ! त्या सर्वांना पाहते ही भूमि ! मौन राहून. या भूमीचे मौन, मौन राहून अनुभवणे हा **भू-ध्यान योग** !

भूमीवर अंतरिक्ष. या अंतरिक्षांत मेघमाला, पर्जन्य, वाहता वारा, मेघ गर्जना, विजा, नवनव रंगवितान. त्या सर्वांमध्ये 'पश्यतीव' मौन वीक्षक होऊन राहिले आहे. त्याचा अनुभव घेणे हा **अंतरिक्ष-ध्यानयोग** !

आतां आकाश. या आकाशांत सदा प्रकाशमान सूर्य, त्याच्या भोवती प्रदक्षिणा घालणारे ग्रह, दूरवर पसरलेले कोट्यावधी तारे, अदृश्य चुंबक वारे, प्रचंड वेगाने चलन पावणारे प्रकाश किरण, त्या सर्वांच्या मध्ये बाह्यांतराकाश ध्यानस्थ ! त्याचा अनुभव घेणे **द्यौ-ध्यानयोग** !

भूमि, अंतरिक्ष, आकाश, पर्वतशिखरे, नद्या-सागर, सूर्य-चंद्र-नक्षत्रे हे सर्व ध्यानस्थ आहेत. त्यांना पाहात राहणे हेच ध्यान. हे ध्यान एका क्षणाचे नव्हे. सदैव ध्यान क्रियेच्या मध्येच ध्यान. डोळ्याने पहात असावे, कानाने ऐकत असावे. जिभेने बोलत असावे. मनाने सहज पहावे. मौन राहून. तोच

ध्यान-योग. बोलण्याची क्रिया चालत असूं द्या, ऐकण्याची क्रिया चालू असतांना त्यामध्येंच ध्यान-योग ! हाताने कार्य करीत असतानांच ध्यान-योग. हे आपण निसर्गाकडून शिकावे. त्याचा अंगिकार करावा. हा क्रिया सहित अद्‌भुत ध्यान योग होय.

आतां मी बसलो आहे. हा देह. या देहांत घाम गळतो आहे; देहांत अवयव प्रतिक्षण आपापले कार्य करीत आहेत. देहामध्ये अनेक कार्ये चालत असूनही देह निश्चल ! देह निश्चल असावा याचा अर्थ देहाचे सर्व व्यापार बंद व्हावेत असा नव्हे. देहाचे सर्व व्यापार थांबले की देह नष्ट झालाच. हृदयाचे स्पंदन थांबविता येत नाही. हृदयाचे स्पंदन होत रहावे. डोळे उघडे असावेत कान ऐकत असावेत. सर्व व्यापार चालतच रहावेत. पण सर्वांमध्ये एकतानता असावी. तेच ध्यान, सनत्कुमार महर्षींनी महर्षी नारदांना सांगितलेला नैसर्गिक, सुंदर **ध्यान योग** !

पंच महाभूतांपैकी पहिले चार नाशवंत. साकार, प्रथम मनाने अत्यंत स्थूल अशा पृथ्वीतत्वाचे ध्यान करावे. नंतर त्याहून सूक्ष्म असे आप-जलतत्व, तेज-अग्नितत्व, वायु तत्व यांचे ध्यान करावे. म्हणजे मनाने प्रथम पृथ्वि-आकार, जल-आकार, अग्नि-आकार व शेवटी वायु-आकार धारण करावे. त्याच्या दर्शनांत मग्न असावे. हे साकार-ध्यान. हाच साकार योग. हा साकार योग साधला म्हणजे आकार रहित. रूप रहित अशा अनंत आकाशाचा आकार धारण करावा. आकार नसलेल्या अवकाशाचा आकार मनाला प्राप्त व्हावा. म्हणजे मनाने निस्सीम-अवकाश व्हावे. हा **भौत निराकार ध्यान** योग होय !

हा अवकाशध्यान घन होईल तसा भूमि, जल, अग्नि, वायु इत्यादि कल्पना नाहींशा होतात. चार महाभूत नाहीसे झाले म्हणजे त्यांहून वेगळे

असे आकाश शिल्लक राहात नाही. आकाशापलीकडील अनंततेला मन स्पर्श करते. तोच **अतीत ध्यान-योग होय !**

वैज्ञानिकांच्या मते द्रव्य, देश-काल हे वेगळे नव्हेत. ते एकमेकांत गुंफलेले आहेत. म्हणून द्रव्य काढून टाकले तर देश ही राहत नाही व काल ही राहात नाही. या सिध्दांताला अनुसरूनच ध्यान झाले पाहिजे भूमि-जलादि भाव पायऱ्या चढत आकाशाच्या अवकाशाच्या-पोकळीला पोहोचले पाहिजे. भूम्यादि द्रव्य भाव नाहीसे झाल्यामुळे आकाश-काल या कल्पना सुध्दां विलीन होतात. शेवटीं राहते ते आत्म-अवकाश ! तेथे मन थांबले की तो 'निरूध्द योग' होय. तोच **असंप्रज्ञात योग !**

हे सभा भवन. येथे शेकडो पीठोपकरण, श्रोते ! हे भवन पूर्ण भरले आहे. येथील सर्व वस्तु काढून टाकल्या, सर्व जण निघून गेले की येथे शिल्लक राहते ते मौन होय ! तीच पोकळी, अवकाश, शून्य ! वस्तु असतांना सुध्दा येथे पोकळी आहे. ती आपल्या गमनास येत नाही. वस्तु काढून टाकल्या की शून्य-मौन यांची जाणीव. मौन-अनुभव घेण्याची ही एक पध्दत. वस्तु-जन असतांना सुध्दां शून्य-मौन अनुभवणे ही दुसरी पध्दत. पहिली **निर्वितर्क संप्रज्ञात समाधि**. दुसरी **सवितर्क संप्रज्ञात समाधि !**

मनांतील सर्व वृत्ति काढून टाकून, आत्मा-देव यांचा अनुभव घेणे ही निर्वितर्क-निर्विचार संप्रज्ञता समाधि. सर्व वृत्ति असतांना सुध्दां आत्म्याचे भान अनुभवणे सवितर्क, सविचार संप्रज्ञात समाधी. वितर्क-विचार ठेवणे काढून टाकणे या वाटेला न जातां मन अमन झाले, परम शांत झालें तर आत्मानुभूती उत्पन्न होते. ही असंप्रज्ञात समाधि. ध्यानाची पराकाष्ठा.

आणखी एका पध्दतीने ध्यान आंचरण करतां येते. लिंग हे देवाचे

चिन्ह. हे तीन प्रकारचे. नेत्राला दृश्य चिन्ह असेल तर ते इष्ट-लिंग. मनोदृश्य वृत्यात्मक चिन्ह असेल तर ते प्राणलिंग. केवळ भावगोचर असेल तर ते भाव लिंग. वृत्यात्मक रूप नसलेला केवळ अस्तित्व भाव. इष्टलिंगांत दृष्टि स्थिर झाली तर... मन मग्न झाले तर ती **वितर्क संप्रज्ञात समाधि** (ज्ञान). प्राणलिंगांत मन मग्न झाले तर ती विचार संप्रज्ञात समाधि (ज्ञान). भाव लिंगांत मन लीन झाल्यास **वृत्ति विरहित** असंप्रज्ञान समाधि. व्यष्टी प्रज्ञा संपूर्ण नाहीशी होऊन जाणणारे मन महा मौन होऊन; ध्यातृकल्पना सुध्दां विरघळून गेल्यास महालिंगामध्ये सहज समाधि होय.

**एक दृष्टांत :** पाळण्यामध्ये मूल खेळत आहे. आई झोके देत देत गाते आहे. काळ सरकतो...! आईचे गीत ऐकत मूल झोपी जाते. मौन होते. आनंदात असते. झोके देतां-देतां, गाता-गाता... स्वतःला नकळत आई सुध्दां निःशब्द निद्रेत प्रवेश करते. तेव्हा आई नाही. मूल नाही. पाळणा नाही. झोके नाहीत. येवढेच नव्हे तर ज्यांची त्यांची व्यक्ति-प्रज्ञा सुध्दां लोप पावली. आनंद घनानुभूतीमध्ये समरस झाली आहे. हीच असंप्रज्ञात समाधि स्थिती होय.

समग्र जीवनच ध्यान योग झाल्याशिवाय राहात नाही. परवस्तूच्या अनंत अस्तित्वाच्या जाणिवेने कंठले जाणारे पवित्र जीवन ध्यान योगाहून वेगळे नव्हे. शरणांचे असे पवित्र जीवन. रात्रंदिवस त्यांचे देव ध्यान. दिवसभर सत्य शुध्द कायक, प्रसादोपभोग ! सत्संग-अनुभव-संग वेगळ्या आशा-आकांक्षा नाहीत. आमिषें नाहीत. अहं-मम नाहीत.

आइन्स्टीन सारखे विज्ञानी, एडीसन सारखे संशोधक, रवींद्रनाथ टागोरांसारखे महाकवि, गांधीजी सारखे अनासक्त कर्मयोगी आपले संपूर्ण जीवन सत्याच्या आराधनेंत समर्पण करून तन्मय झाले. त्यांचा सहज-ध्यान-

योग !

संत, ज्ञानी यांचे जीवन इतरांहून वेगळेच असते. त्यांचे अंतरंग ध्यान-पूर्ण असते. बहिरंग कार्यात गुंतलेले. अल्लमप्रभुनी देशां-देशांत संचार केला. हजारो जनांना उपदेश केला. लोकांच्या चुका दुरूस्त केल्या. साधकांना योग्य ते मार्गदर्शन केले. बाह्य जगतांत येवढे कार्यतत्पर असूनही त्यांचे मन मात्र आकाशाप्रमाणे शून्य. त्यांच्या अंतरंगात पोकळी-अवकाश-महाशून्य !

झेन गुरू ! त्याच्या जवळ एक विद्वान आला. म्हणाला, ''गुरु महाराज, मला सत्यदर्शन व्हायला हवे. निर्वाणाचा अनुभव पाहिजे. त्यासाठी साधना काय करायची ते सांगा !''

गुरूजी म्हणाले, ''या पर्वताच्या शिखरावर बसून रहा. जे कांही दिसेल ते तदेक चित्ताने पाहात रहा.''

साधक सूर्याला पाहात बसला. कांही वेळाने सूर्य अस्ताला गेला. चंद्रोदय झाला. साधक चंद्राला पाहूं लागला. चंद्राचे ध्यान करूं लागला. कांही तासांत चंद्र बुडाला. आकाशात मेघ दाटले. सगळीकडे काळोख झाला घनदाट काळोख !

''गुरु महाराज मला कांहींच दिसत नाही. कशाचे ध्यान करूं ?'' साधकाने विचारले.

गुरूजी म्हणाले, ''तुला कांहीच दिसत नाही ? तर मग कांहींही न दिसणाऱ्या या शून्याचे ध्यान कर !''

तो साधक शून्याचे ध्यान करू लागला. डोळे उघडे. मन शून्य. निस्तरंग ! परम प्रशांत निर्वाणाचा अंनुभव. तेथे 'मी' नाही. अन्य कांही नाही.

दिसणारा-न दिसणारा हा भाव नाही. सर्व निर्वाण झाले. केवळ प्रज्ञा !

जे दिसते ते पहावे. करस्थळीं लिंगाला पाहतांना लिंग न दिसतां तेथे एका बालकाचे मुख दिसले तर तेच पहावे. कसे ? लिंग या भावनेने. राग-द्वेषादि द्वंद्व रहित होऊन. मी... आणि माझे... या उभय कल्पना नसाव्यात. त्या क्षणी बालकाचे मुख जाऊन पत्नीचे मुख आले असे समजा. तेव्हांही तसेच. निरामय होऊन पहा ! लिंगदृष्टीने पहा. राग नसावा. द्वेष नसावा. अशाप्रकारे कोणतेही चित्र मनांत दिसले तरी त्याचे काय ? सर्व कांही पवित्र ध्यान-दृष्टीने पाहा. कांहींही बाधक होत नाही. ध्यानवृत्ति विच्छिन्न होत नाही. समाधि सहज सिध्द !

*अंगद मेले लिंगवरतु.*
*लिंगद मेले अंगवरतु*
*भावतुंबि परिणाम वरतु:*
*नाम विल्लद देवरिगे नेम वेल्लियदो गुहेश्वरा !*

अल्लमप्रभूंच्या वचनात एक ध्यान पध्दति सांगितली आहे. ती म्हणजे प्राणलिंग ध्यान. एकदां लिंगाला पाहावे. एकदां स्वतःला जाणावे. लिंगाला पाहतांना त्यांत आपण दिसतो, आपणास जाणतांना लिंग दिसावे. आपणांमध्ये लिंग, लिंगामध्ये आपण !अशी तीव्र साधना चालली तर आपण व लिंग एक होऊन दिसते. हीच प्राणलिंगानुभूति ! अशा अनेक ध्यान पध्दति आहेत.

थोडक्यात सांगायचे झाल्यास, प्रथम पृथ्वीतत्व पहावे. त्या पलीकडील जलतत्व पहावे. या पलीकडील अग्नीतत्व पहावे. त्याच्याही पलीकडील वायुतत्व पहावे. त्याच्या पलीकडील आकाशतत्व पहावे. त्या आकाशाहून पलीकडे कांल, रागादि भावना विलीन होतात. सर्व विलीन झाल्यावर जे कांही

अनुभवाला येते, तीच परम आत्मानुभूति ! हा पृथ्वी पासून आत्म्यापर्यंतचा चढता क्रम ! हेच उध्दरण ! हे ध्यान. हे अंगस्थलारोहण. ही आत्मानुभूति प्राप्त करून क्रमाक्रमाने चढलेल्या मार्गानेच उतरणे हे अवतरण ! लिंगस्थल साधन ! भक्त स्थलापासून ऐक्य स्थलापर्यंत चढत गेलेला सामरस्य योगी ! तेथून उतरून खाली आलेला तो शिवयोगी. तो लोकसंग्रह करतो. तोच गुरु.

या ध्यानयोगांतील चिंतन इतके. पृथ्वि, जल, अग्नि, वायु आणि आकाशाहून पलीकडे जी वस्तु आहे, तोच भगवंत ! जेथें गेले असतां काल थांबतो, तो देव ! जेथे गेले असतां द्वेष नाहीसा होतो, तो देव. जेथे गेले असतां वस्तु दिसत नाहीं, तो देव ! तो निष्कल देव ! या निष्कल देवामुळेंच हे जगत उत्पन्न झाले. त्यामुळे हे भगवंताचे रूप ! ही दृष्टि लाभली तर या जगांतच भव्य भगवत् जीवन जगतां येते. हे भगवत् जीवनच ध्यान जीवन होय !



# ๑ १० ๑

सत्य वस्तूच्या ज्ञानाच्या साधनेने, एकाग्रतारूप ध्यान साधनेने, हृदयाच्या माधुर्यरूप भक्तिसाधनेने भगवत् चिंतन करतां येते हे आपण आतापर्यंत जाणिले आहे. भगवंताला निर्मल मतीने, निश्चल मनाने व मधुर हृदयांत शोधणे हेच चिंतन.

ज्ञान-ध्यान व भक्ति यांशिवाय आणखी एक बहुमोल साधन आहे ते म्हणजे कर्म ! मन-बुध्दि यांच्या बलाने केले जाते ते दैहिक कार्य ! कर्म हा जीवनाचा प्रधान अंश ! योगी असो वा रागी ! कर्मा शिवाय जगणे अशक्य !

*''न हि कश्चित क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्''* – **गीता**

कोणतेही कर्म न करता कोणीही एक क्षणभर सुध्दा जगणे अशक्य ! पशु-पक्षी येवढेच नव्हे तर देवसुध्दा कर्मरत.

*''न मे पार्थास्ति त्रिषु लोकेषु किंचन*
*नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एवच कर्मणि ।।''*

''अर्जुना, मला कसले कर्तव्य आहे सांग बरे ? त्रैलोक्यांत मी मिळवावे अथवा मला न मिळणारी वस्तु नाही. मी कशाचीही आशा करीत नाही. सर्व कांही मी आणि माझेच असल्यामुळे कशाची आशा करावी ? मी नित्य पूर्ण !

भरलेला सागर! असे असूनही मी कर्म करतो.'' असे भगवंताने गीतेत म्हटले आहे.

खरे पाहू जातां देवाच्या ठायी आशा नसतात. कधीही. पण आश्चर्य असे की आपण देवावर सुध्दा इच्छांचा आरोप करतो.

देव आपले अन्न, वस्त्र, अलंकार वैभव सर्व कांही मागतो. आपण त्याला अर्पण केले तर संतुष्ट राहतो. अर्पण न केल्यास संकट आणतो. अशी आपण कल्पना करतो. पंचगव्यांचे स्नान करवून, वस्त्र लेववून, फुले वाहून, दिवा ओवाळतो. हे सर्व केवळ आपल्या आनंदासाठी करतो.

सूर्य-चंद्र, नक्षत्रे म्हणजे त्या देवाने लावलेले नंदादीप. पळीभर तेल घालून मिणमिणते दीप आपले. या दीपाची त्याला काय आवश्यकता ? तो असलेल्या ठिकाणी अंधार असेल तरच ना, तो तर **'सूर्य कोटिसमप्रभ !'**

आता नैवेद्य ! आहार. आहार कोणाला द्यायचा ? ज्याला भूक लागेल त्याला. तर मग देवाला सुध्दा भूक लागते का ? तो तर पूर्णकाम ! त्यालाच भूक लागली तर ती भूक शमविणार कोण ? एखाद्या झाडाची वाफ वाळली तर त्याला पाणी देतां येईल. सागरालाच तहान लागली तर ?

देवाला काहींही नको. असे असतां कर्तव्यरूपी कर्म त्याला कसे बरे असूं शकेल ? असे असतां देव कां बरे कर्मामध्ये रत असतो ?

**''उत्सीदेय: इमे लोका:न कुर्यां कर्मचेदहम् ।''**

**भावार्थ :** त्याने कर्म केले नाही तर सगळे लोक नष्ट होतील भूम्यादि पंच भूतात्मक समस्त विश्वच नाहीसे होईल.

तरंगाचे अस्तित्व सागरामुळे ! सागरच नसेल तर तरंग कोठून येतील ? विश्वाचे अस्तिव-प्रकटीकरण देवाच्या संकल्प कर्मावर अवलंबून आहे देवाच्या ज्ञान तपस्येवर अवलंबून आहे. हे संकल्प कर्म-ही ज्ञानतपस्या प्रतिक्षणी अव्याहतपणे सुरू असते. असे असतां कोणालाही 'अकर्मकृत्' राहतां येत नाही. आपण कर्माला कमी लेखून त्याचा तिरस्कार करून ज्ञानाचा कितीही पुरस्कार केला तरी, कर्म नसेल तर जीवन अशक्य ! कोणाचे कर्म सूक्ष्म असेल; कोणाचे कर्म स्थूल असेल ! कांही असो, कर्म हे देह असे पर्यंत केलेच पाहिजे. देह नाश पावून, मन नाहीसे झाले तर मी माझ्यामध्ये म्हणजे आत्मामध्ये समरसता पावतो. ते कैवल्य ! तेव्हां मात्र कर्म नाही ! केवळ चेतनास्तित्व !

कैवल्य प्राप्त करून घेणाऱ्यांना कर्म अत्याज्य. सोडून देतां येत नाही. कर्मे सगळी सारखी नव्हेत. त्यांचे दोन प्रकार ! वाईट कर्म (अकर्म) चांगले कर्म (कर्म).

*''किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः''*

कोणते कर्म; कोणते अकर्म यांचा निर्णय करणें शहाण्यांना सुध्दा कष्टकर ! एक सामान्य लक्षण सांगतां येईल परिणामांत समाधान देणारे ते कर्म ! असमाधान देणारे अकर्म ! सत्य-शुध्द असेल ते कर्म ! तसे नसेल ते अकर्म ! स्व-पर हित करणारे कर्म ! न करणारे अकर्म !

कर्माचा परिणाम वाईट होणे शक्य आहे. उद्देश ही तितकाच महत्वाचा. उद्देश चांगला असून परिणाम वाईट होणे शक्य आहे. उद्देश वाईट असूनही परिणाम चांगला-होण्याची शक्यताही आहे. उदा. धन संपादन. आपण धन

संपादनेसाठी प्रामाणिकपणे राबतो पण धन संपादन हेच परमार्थ होऊन राहिले तर आपले संपूर्ण जीवन नष्ट होते.

भिक्षुकाच्या डोक्याचा नेम धरून जोराने फेकलेले रूपयाचे नाणे तो भिक्षुक शिताफीने उचलून घेतो. रूपया दिल्याबद्दल धन्यवाद देऊन संतोषाने निघून जातो.

पहिल्या दृष्टांतात उद्देश चांगला असतो पण परिणाम वाईट. दुसऱ्या दृष्टांतात उद्देश वाईट पण परिणाम चांगला.

कर्माचा उद्देश चांगला असला पाहिजे. परिणामही चांगला व्हावा. कर्मसुध्दा सत्य-शुध्द असावे. तसे नसेल तर ते अकर्म होय. सत्य शुध्द असेल तर ते करणीय कर्म ! अकर्म वर्ज्य ! कर्म करणीय !

***माडि माडि केड्डरू मन विल्लदे***
***नीडि नीडि केड्डरू निजविल्लदे !***
***माडुव नीडुव निजगुण वुळ्ळरे***
***कूडिकोंब नम्म कूडल संगम देव ! – म. बसवेश्वर.***

**भावार्थ :** कर्म करण्याचा अन्नदान करण्याचा शुध्द सात्विक भाव नसल्याने सर्व व्यर्थ ! कर्म करण्याचा अन्नदान करण्याचा सत्यभाव असेल तर कूडल संगमदेवाची प्रसन्नता लाभते.

आपण जीवनाद्यंत रात्रंदिवस राबतो. पण जीवनाच्या बंधनातून मुक्ति नाही. दान-धर्म करतो पण दानाचे पुण्य आपल्याला प्रापंचिक मोह बंधनांतून सोडवायला असमर्थ ! कां बरे ? आपले कर्म जीवन. कर्म-योग जीवन नव्हे 'कर्म' करण्याचा दान देण्याचा सत्य भाव आपणांत नाही.

महात्मा बसवेश्वर-सिध्दरामेश्वर हे सत्य-शुध्द कायक निष्ठ होते. लोक हितासाठी, धर्म-साधनेसाठी त्यांनी नाना कर्मे केली. कितीतरी विविध कर्मे. विहीरी, तळी बांधविल्या. महा-दासोह (अन्न संतर्पण) केले. धार्मिक व सामाजिक प्रज्ञा जागृत केली तात्विक दृष्टी दिली. अनुभाव-गोष्ठीचे आयोजन केले. सर्वत्र आत्मज्ञानाची ज्योत तेवत ठेवली. पण आश्चर्य असे की त्या कर्मांमध्ये ते क्षणमात्रही बांधले गेले नाहीत. निर्लिप्त मनोभाव. फलाकांक्षा रहित्व. देवाला समर्पित मनोभाव. हे सर्व त्यांच्या ठिकाणी विकसित झाले होते.

शंकराचार्यानी देशभर संचार केला. अनेक कष्ट सहन केले. देशाच्या चार दिशांना चार धाम स्थापिले. अद्वैत ज्ञानाचा प्रसार केला. ज्ञानेश्वरांनी कोवळ्या वयांतच 'ज्ञानेश्वरी' हे अमर काव्य रचिले. हजारो जनांना अध्यात्माचे रसपान करविले यांची कर्मे अबाधक, विमोचक, तारक. त्यांचे कर्मयोग जीवन !

आपणही खूप राबतो. कष्ट-मेहनत करतो. पण आपले राबणे, सांसारिक विषयांसाठी. धन-कनकादिसाठी. त्यामुळे आपले राबणे आपणांस बंधनकारी होय ! आपण कर्म केले पाहिजे. राबले पाहिजे. राबल्याशिवाय चालत नाही. पण आपले राबणे त्या देवासाठी, ज्ञानासाठी. जगांत जीवनांत सत्यम्-शिवम्-सुंदरम् ची अभिव्यक्ति व्हावी यासाठी राबले पाहिजे. करण्याचा-देण्याचा निज-गुण असेल तर परमात्म्याचा अनुग्रह लाभतो.

राबण्यामुळे प्रसन्नता-प्रसाद लाभला तर तोच कर्म-योग. दुःख बंधन निर्माण झाले तर ते राबणे 'अ-कर्म'. बाधक-कर्म, अयोग्य-कर्म होय. माणसाने प्रामाणिकपणाने सद्भावनेने राबावे. तोच कायक ! कर्माचे प्रत्येक फळ,

कायकाचे प्रत्येक फळ देवाला, देवासारख्या व्यक्तीनां व जीवजंतूना अर्पण करावे. ते अर्पण. देवाला अर्पण करून त्याचा अंश आपण स्वीकारावा. तो प्रसाद होय. आपल्या कर्माचा केंद्रबिंदू देव व्हावा. त्याचे स्मरण करीत राबावे. त्यालाच सर्व कांही अर्पावे व त्याचाच प्रसाद समजून स्वीकार करावा. देवाला कर्मफळ अर्पण करून स्वीकारलेला प्रसाद आपले जीवन आंतरबाह्य निर्मळ करण्यास सहायक होतो. आपल्या जीवनांत प्रसन्नता येते. हीच देवाची कृपा ! हीच भगवत्सिध्दि ! हाच सत्यानुभव !

ही प्रसादीकरणाची साधना कशी करायची ? हे एक सुंदर फूल आहे. आपण हे फूल आपल्या इष्ट दैवाला-इष्टलिंगाला अर्पण करतो. ते रूप-ते सौंदर्य देवाला अर्पण करतो. आतां ते फूल देवाचे. ते सौंदर्य देवाला अर्पित. आपले नव्हे. त्या भावनेनेच आपण त्या फुलाचे सौंदर्य पाहतो. सौंदर्याने डोळे भरून घेतो. त्याचा अनुभव घेतो. आनंदित होतो. तो प्रसाद आणि तीच प्रसन्नता.

रूप हा सुध्दा विषयच. ते रूप लिंगार्पित-देवार्पित झाल्यानंतर मी तो देवाचा प्रसाद म्हणून स्वीकारतो. त्याचा आस्वाद घेतो. तो रूप प्रसाद. नंतर पवित्र आनंद लाभतो. त्याचा अनुभव 'अनुभाव प्रसाद'. तृप्ति-प्रसाद ! देवाला दूध अर्पण केले तर त्याचा प्रसाद म्हणून आपण त्याचा स्वीकार केला तर तो रूचि प्रसाद. त्यामुळे लाभणारी तृष्टि तृप्तिप्रसाद. रूप प्रसाद हा शुध्द प्रसाद ! रूचि प्रसाद हा सिध्द प्रसाद. तृप्ति प्रसाद हाच प्रसिध्द प्रसाद होय !

आपण आचरलेली सर्व कर्मे व त्या कर्मांचे फळ देवाला अर्पण करणे हाच शुध्द प्रसाद. ती अर्पित कर्म फले देवाची दया-कृपा-करूणा या भावनेने त्यांचा अनुभव घेणे, हा सिध्द प्रसाद. त्यापासून निर्माण होणारी तृप्ति ही

'भगवंताची कृपा' असा अनुभव घेणे हा प्रसिध्द प्रसाद होय. रूप प्रसादाने देह-इंद्रियांची शुध्दि, रूचि प्रसादाने भाव शुध्दि आणि तृप्ति प्रसादाने अनुभाव !

शुध्द-प्रसादाने देह-इंद्रियांची प्रसन्नता ! सिध्द-प्रसादाने मनाची प्रसन्नता; प्रसिध्द-प्रसादाने भाव-प्रसन्नता लाभते; देह राबल्याने देहाला प्रसन्नता, मनाच्या राबण्याने मनाला प्रसन्नता. बुध्दीच्या मेहनतीने मतीला प्रसन्नता. ही सर्वांग प्रसन्नता होय ! सर्वांग प्रसन्नता लाभलेला जीव (अंग) स्वतःलाच देवाला समर्पण करून देवामध्येंच समालीन झाला तर तो स्वतःच प्रसाद होतो. देवाशी अभिन्न अशी ही अनुभूति ! हाच अनुभव. हाच एक-प्रसाद 'मी प्रसाद स्वीकारणारा' हा भाव नाही. प्रसाद स्वीकारण्याची क्रिया नाही. सर्व थांबते आणि उरतो तो फक्त प्रसाद. तोच एक-प्रसाद होय. या स्थितिप्रत नेणाऱ्या क्रियेला कर्मयोग अथवा कायकयोग असे नाव.

आपण कोणत्याही कार्यक्षेत्रांत असलो तरी, तेथे मनःपूर्वक राबावे. चोरी, हिंसा, खोटी आत्मस्तुति, निंदा, द्वेष मोहादींचा त्याग करून बाह्यांतर शुध्द भावाने परिश्रम करावे. लाभलेले कर्मफळ देव-भावना समर्पण करून अनुभवावे. त्याने जीवन प्रसादमय होते.

श्रमाचे फारच महत्व आहे. माणूस कितीही वर्षे जगला तरी शेवटपर्यंत परिश्रम करीत असावा अत्यंत प्रेमाने. देवावरील श्रध्देने.

आपण इच्छा करो वा ना करों श्रमाला प्रतिफळ हे असतेच. ते प्रतिफळ भगवद्वस्तू मानून त्याचा एक अंश देवाचा अनुग्रह मानून स्वीकार करावा. तोच प्रसाद शब्द, स्पर्श, रूप, गंध, सुख-दुःख हे सर्व अर्पित प्रसाद व्हावेत.

समर्पणासाठीच कर्म व कर्मफळ ! प्रसाद भाव हेच जीवन ! त्यामुळे आपले जीवन सार्थक ! दिव्य !! पवित्र !!





विश्वाची मूळ वस्तु प्रकृति. ती गुण-क्रिया युक्त. स्थूल, सूक्ष्म जग त्या प्रकृतीचा विस्तार. विकास ! ती अव्यक्त. तिच्यापासून निर्माण झालेले हे जग मात्र व्यक्त. ती बुध्द-भाव गम्य ! हे जगत् बुध्दि-भाव बाह्यकरण गम्य ! गम्य जे आहे ते 'निर्देश्य' ! ते बोटाने, शब्दांनी, गणित सूत्रांनी दाखविता येते उदा. फूल बोटांनी 'निर्देश्य' ! भावना शब्दांनी निर्देश्य ! अणुमध्ये दडलेली शक्ति गणित सूत्रांनी निर्देश्य !

देव अप्राकृत सत्य ! प्रकृतीचे गुण क्रिया त्याच्या ठिकाणी नाहीत. काल-देश मिति सुध्दा त्याच्या ठिकाणी नाहीत. त्यामुळे तो सामान्यपणे अनिर्देश्य होय. थेटपणें त्याचा निर्देश करणे शक्य नसले तरी सांकेतिक, सूच्य, ध्वन्यात्मक शब्दांद्वारे भाव-अनुभाव गम्य करण्याचे प्रयत्न ज्ञानिजनांनी केले आहेत. उदा. देव अवर्णनीय ! त्याचे वर्णन करतां येत नाही; असे म्हणणे सुध्दां त्याचे वर्णनच होय. पण हे वर्णन गुण-क्रिया सांदर्भिक नव्हे. वर्णन नसलेले ते वर्णन. वर्णनाचे शब्द मौन झाले तरच देव. मौन-महामौन, तोच देव !

व्यास महर्षींनी अत्यंत मार्मिकपणे, युक्तीने 'शास्त्रयोनि' असे वर्णन केले आहे. शब्दरूप शास्त्र जेथून उत्पन्न झाले, तोच देव.

'नि:शब्दं ब्रह्म' शास्त्रामुळे झालेले ज्ञान जेथे थांबते, मौन होते तेच

ब्रह्म !

वाचल्याने, ऐकल्याने अर्थ समजतो तो शब्दबोध. ते शब्द ज्याचा निर्देश करतात, तिकडे मन वाहात जाऊन अमन व्हावे, तेव्हां तत्वबोध. ते न होतां केवळ शब्दबोध होऊन आम्ही ज्ञाते झालो, असे समजणे भ्रम होय. अध्यात्मिक क्षेत्रात हा भ्रम नसावा. शब्द नाहीसा व्हावा त्या शब्दांच्या आंत आणि सूक्ष्म निर्देशनाचा मार्ग धरून मन लुप्त व्हावे. तेव्हां अनिर्देश्य वपुचे ज्ञान होते. तोच मौन अनुभव !

'मी जगाला पाहतो.' 'मी जग दाखवितो.' या म्हणण्याला अर्थ आहे. पण 'मी देवाला पाहतो.' 'मी देव दाखवितो.' या म्हणण्याला अर्थ नाही. पाहण्याच्या व दाखविण्याच्या कार्याला अनेक साधने हवीत, इंद्रिय-करण हवेत. भगवत्क्षेत्रांत प्रवेश करतांच शब्द, करण (इंद्रिय) लोप पावतात. म्हणजे बाह्यांतर स्पंदने निरूध्द होतातं. मन अमन होते. भौत व भावात्मक भेद नाहीसे होतात ! पूर्व-पश्चिम भेद नाहीसा झाला तर खरे 'आकाश' भान. तसेच बाह्य-आंतर, स्थूल-सूक्ष्म, कार्य-कारण वगैरे भेद नाहीसे झाले तर देव-भान ! निरपेक्ष सत्य-ज्ञान. म्हणूनच देवज्ञान देणारा गुरु सुध्दा शेवटी 'मौन' !

***गुरोऽस्तु मौनं व्याख्यानं***
***शिष्या: तु छिन्न संशया: !***

मौन हेच अंतिम व्याख्यान ! त्यानेच शिष्याचे सर्व संशय शांत !

निर्देश्य ते सर्व 'हे'. निर्देश्य नसलेला तो देव 'ते' 'तत्'.

***घन गंभीर महाघनदोळगिन घनक्के घनवागिद्देनय्या***

**कुडल संगम देवय्यनेंब**
**महाबेळगिन बेळगिनोळगिद्देनेंब**
**शब्द मुग्धवाढुदेनेंबेनय्या ?**

शब्दांच्या पलीकडील अनुभव महात्मा बसवेश्वरांनी या वचनांत सांगितला आहे.

जग हे गंभीर-घन ! भव्य ! विशाल. अनंत विस्तार. त्याचे मूल कारण देवात्म शक्ति ! ती शक्ति त्या घन गंभीर घनाला घन अशा परमशक्तीहून 'घन' ! त्याला शिवशरणांनी नि:शब्द सत्य म्हटले. हे नि:शब्दं ब्रह्म घनाहून घन 'अनिर्देश्य वपु' या शब्दाने त्याचे वर्णन करतात. त्याचे ध्यान हेच 'भगवच्चिंतन' !

इष्ट-लिंग हे दृष्टिगोचर. प्राण-लिंग हे मनोगोचर, भाव-लिंग हे ज्ञानगोचर. महालिंग हे भावगोचर. मनाने इष्टलिंग धरून त्या महालिंगाप्रत जाऊन त्या पलिकडे गेल्यास 'निर्वाण' प्राप्ति ! तेव्हां जो अनुभव होतो, तोच 'भगवंत' !

साधनेला कोणतीही दृश्यवस्तु, देव संकेत अथवा मूर्ति घ्या. त्यांतील निर्देश्यांश बाजूला सारून अनुभव घेतला तर तोच खरा देव ! तसे पाहणें शिकलो तर सर्वही देवच. भेद दृष्टि ठेवून शोधूं जातां कोणतेही 'देव' नव्हे.

खऱ्या देवाला कोणतेही रूप द्या. नांव द्या. महात्मा बसवेश्वरांनी त्याला 'कूडलसंगमदेव' म्हटले. अल्लमप्रभूने त्याला गुहेश्वर म्हटले. निजगुण शिवयोगीनी त्याला 'शंभुलिंग' म्हटले. हा केवळ शब्द-भेद ! रूप-भेद ! हे जाणले तर सर्व शांति ! जाणले नाही तर धर्मा-धर्मामध्ये युध्द ! व्यक्ति-

व्यक्तिमध्ये संघर्ष ! साधनें-साधनेंत संघर्ष !

जाणले तर सर्व एकच ! सागराकडे धांव घेतलेल्या नद्या सगळ्या एकच. बांध घातले तर मात्र सर्व वेगळे. ज्ञानी संतांना अद्वयानंद ! अज्ञानी जनांना धर्म, देव, साधना य सर्व विषयांतसुध्दां असमाधान !

अशा भगवचिंतनाने जीवन दिव्य होते. जीवनांत फार मोठा बदल होतो. ,याचा अर्थ देह बदलतो असे नव्हे. विश्वाकडे, जीवनाकडे पाहण्याची दृष्टि बदलते. तुम्हांला बसल्याठिकाणी लॉटरी लागून तुम्ही कोट्याधीश झालांत तर तुमचा देह बदलत नाही. मात्र तुमचा भाव बदलतो.

संत-दार्शनिक यांचे जीवन यथापूर्व चाललेले असले तरी भाव मात्र पूर्णपणे वेगळा. शेकडो कामे करून सुध्दां त्या कार्य-साधनेंत ते गुंतत नाहीत.

भारतीय अध्यात्मिक क्षेत्रांत हा अद्‌भुत अनुभव होय ! पॉल ब्रंटन भारत देशाला आला. फारच मोठा माणूस तो. संतांच्या शोधांत हिंडत-हिंडत तो रमण महर्षीकडे आला. रमण महर्षींचे दर्शन घेऊन तेथे कांही अनुभूति मिळविल्या. परत आपल्या देशाला जातांना आपल्या मित्राला म्हणाला,

''इकडे येतांना केवढे कुतुहल ! तळमळ. आतां ते नाही. येतांना मी पॉल ब्रंटन. आता पॉल नव्हे. मी मात्र आहे !'' हाच आध्यात्मिक चमत्कार !



## ꧁ १२ ꧂

चिंतन मनाला मोद-आनंद देते. वस्तु आपणांस जेवढी प्रिय तितकी तिची भावना, आठवण, ध्यान अधिक सुखकर. म्हणूनच मानवाला 'चिंतन' आवडते. वस्तूंचे चिंतन व सुखानुभव त्याचे सर्व जीवन व्यापून टाकते. विषयांचे ध्यान त्याला सुटत नाही. केवळ अस्तित्वांत असलेल्या वस्तु व व्यक्ति तेवढ्याच नव्हेत तर दृष्टि आड, सृष्टि आड झालेल्या व्यक्ति आणि वस्तूंची आठवण सुध्दां त्याला दुःखदायक होते. अशा प्रकारे चिंतनांत रमणे हेच जीवन. हाच संसार. या मानवाला इहलोकाचे चिंतन करायला शिकवावे लागत नाही. त्याला त्याचे बाळकडू पाजलेले असते. जन्मतःच ! मरेपर्यंत ते सुटत नाही.

विषय आपल्या भोवती पसरले आहेत. पुनः पुनः ते पहायला ऐकायला, स्पर्श घ्यायला मिळतात. त्यांची आठवण दृढ होते. संततपणे ते सुरू असते. अनायास. त्यामुळे हे चिंतन शिकवावे लागत नाही. त्यासाठी प्रोत्साहन देण्याची गरज नाही. अलौकिक अथवा पारमार्थिक चिंतनाचे तसे नाही. पारमार्थिक चिंतनाने आपणास अद्‌भुत शांति लाभते. तरी पण आपण तिकडे उदासीन असतो. त्यासाठींच तर आतां भगवत् चिंतन !

संत तुकाराम सदा देव चिंतनशील; त्यांना काही चिंतन करणे,

शिकवायची गरज नव्हती. बसतां 'विठ्ठल', उठतां 'विठ्ठल'. ध्यानी, मनी, जागृति, स्वप्नी 'विठ्ठल विठ्ठल'.

एकदां एक मोठा पंडित तुकारामांकडे आला. म्हणाला, ''तुकाराम महाराज, आपण फार मोठे संत आहांत. मी मुद्दाम आपणांसाठी हा आध्यात्म ग्रंथ फार लांबून घेऊन आलो. तुम्हाला मी हा ग्रंथ अर्पण करतो. त्याचा स्वीकार व्हावा !''

तुकाराम महाराज म्हणाले, ''हे पहा ! मला हा ग्रंथ वाचायला सवड नाही. त्याचा स्वीकार करून काय करूं ? आपणच तो ठेवून घ्या !''

''इतका श्रेष्ठ आणि पवित्र ग्रंथ वाचायला आपणांस सवड कशी नाही ?'' पंडिताने विचारले.

''मित्रा, या माझ्या डोळ्यांत आणि माझ्या हृदयांत केवळ विठ्ठलच भरून राहिला आहे. दुसरी कोणतीही वस्तु न डोळ्यांत शिरते ना हृदयांत. इतका तो गाढपणें आंत-बाहेर भरून राहिला आहे. मी हा ग्रंथ वाचणे योग्य आहे, हे खरे ! पण काय करू ? आंत जागा नाही ना !''

तुकारामाप्रमाणेंच आपलीही स्थिती आहे. आपले डोळे, हृदय सगळे भरून गेले आहे. फरक येवढाच कीं तुकारामामध्ये विठ्ठल भरला होता. आमच्यामध्ये विषय भरला आहे. तसं पाहिलं तर आपण तुकारामाहून श्रेष्ठ भक्त. कशाचे ? प्रपंचाचे. सध्यां आपण पारमार्थिक अभिचिंतनास वाव दिला आहे. याची आवड-रस आपणांस आवडेल तर आपले जीवनच बदलून जाईल. चिंतनाचा अंमल चढला की चाल चालणूक वागणे बोलणे पाहणे सर्व बदलून जाईल.

"भगवच्चिंतन" ऐकणे म्हणजे चिंतन रसाचा आस्वाद घेणे होय. चिंतनाचा परिचय नसेल तर ते कठिण वाटते. अरूचि वाटते. म्हणूनच ते रूचकर केले पाहिजे. आत्मचिंतन, आत्मज्ञान अपरिचित असल्यामुळे कठिण वाटते. पण खरे पाहतां ते फारच सोपे. ते जीवनाचे दर्शन होय.

*संसार वेंबुदु गाळिय सोडरू*
*सिरियंबुदोंदु संतेय मंदि कंडय्या !*
*इदनेच्चि केडबेड सिरियेंबुद !*
*मरेयदे पूजिसु नम्म कूडलसंगमदेवन !*

*– महात्मा बसवेश्वर*

**भावार्थ :** संसार म्हणजे वादळांतील दिवा, श्रीमंती म्हणजे बाजारांत जमलेले लोक, यावर विसंबून बिघडूं नकोस. आमच्या कूडलसंगमदेवाची पूजा न विसरतां कर !

सर्वांना माहित असलेले चिरंतन सत्य हे ! जीवनदर्शन ! म. बसवेश्वरांनी अत्यंत सोप्या भाषेत सांगितलेले हे सत्य तर्कबध्द रीतीने-पांडित्यपूर्ण रीतीने प्रतिपादन केले तर तेच कठिण वाटणारे शास्त्र बनते.

परमार्थ क्षेत्रांत प्रवेश करायला, महानुभव घ्यायला, सत्य दर्शन होण्याला तर्क व्याकरण वगैरे शास्त्रांची अनिवार्य आवश्यकता अशी नाही, उघडे डोळे, उन्मीलित भाव, विकसित मन येवढे पुरेत.

महाज्ञानी जगद्‌गुरु शंकराचार्य एकदां वाटेने चालले होते. त्यांना एक वृध्द शेतकरी दिसला. त्यांनी सहजपणे त्याच्याशी गप्पागोष्टी सुरू केल्या. "तू जगद्‌गुरू शंकराचार्यांचे नाव ऐकलेस ना ?"

''होय महाराज. त्यांचे दर्शन घ्यावे; त्यांच्याशी एक-दोन गोष्टी बोलाव्यात अशी फार दिवसापासून माझी इच्छा आहे.'' शेतकरी म्हणाला.

''मीच शंकराचार्य. विचार तुला काय विचारायचे आहे ते!'' शंकराचार्य म्हणाले.

''आचार्य, आपले दर्शन घडले. धन्य झालो मी. लाखो लोक तुमची स्तुती करतात. आपले अद्वैत वेदांत फारच प्रसिध्दी पावले आहे. अनेक मोठ मोठ्या विद्वानांना आपण वाद विवादांत जिंकले आहे. आपल्या महाज्ञानाचा एक कण मला मिळावा अशी माझी गाढ इच्छा आहे. पण ते महाज्ञान ऐकायला मला वेळ नाही. फक्त एक-दोन वाक्यांत सांगाल काय ?''

आचार्य म्हणाले, ''तुला समजेल अशा एक-दोन वाक्यांत सांगतो ऐक. जग, जीवन मिथ्या. देव तेवढाच सत्य. हे जाणून घेतल्यावर मुक्ति.''

''असं काय ?'' तो शेतकरी म्हणाला, ''तुमच्यापाशी अद्‌भुत ज्ञान असेल असे मला वाटले होते. हे जग खोटे. जीवन म्हणजे स्वप्न. या गोष्टी कोणाला माहित नाहीत ? सर्वांना माहित असलेले हे सत्य जाणून घ्यायला येवढे श्रम कशाला केलेत ? जग खोटे असतांना तुम्ही वाद विवादांत मिळविलेला विजय सत्य कसा ? त्याच्यासाठी येवढा खटाटोप कां केलात ? येवढी जिद्द कां ?''

त्या शेतकऱ्याच्या सवालाने आचार्य खडबडून जागे झाले. म्हणाले, ''आजोबा, माझ्या बालपणी तुम्ही मला भेटला असता तर मी हा शास्त्रीय प्रवास केला नसता.''

शेतकरी म्हणाला, ''आचार्य, इतरे जनांसाठी शास्त्र, तर्क, वाद सगळे

हवेत. त्या दृष्टीने पाहिले तर तुमचा प्रयास व्यर्थ म्हणतां येणार नाही. पण लक्षांत ठेवा, लोकरंजनासाठी शास्त्रार्थ हवेत. तुमच्यासाठी त्यांची गरज नाही. आजूबाजूला डोळे उघडून पाहिले तर सहजपणे सत्य-दर्शन घडते. बुडत असलेला सूर्य, विझत असलेला दिवा पाहिला की जगाच्या नश्वरतेचे दर्शन आपोआप घडते ना ?''

सगळे कांही कालांतराने नाश पावते. हे जाणून घेतले तर तो मुक्तच. आपण सर्वजण हे जाणतो. आपणही मुक्तच आहोत. बांधलेले, रचलेले सर्व पडून जाते. लावलेले दीप विझते. जगणारे सर्व मरते. असे असूनही आपण बांधले गेले पाहिजे. रचिले पाहिजे. लाविले पाहिजे. जगले पाहिजे. यालाच मुक्त जीवन म्हणतात. निश्चिंत जीवन ते हेच ! तसे पाहिले तर परमार्थ ज्ञान सुलभ. पण लौकिक ज्ञान कठिण. उदा. पैसा मिळविणे. कितीही बुध्दीमान असला तरी त्याला पैसा मिळवितां येत नाही. ती एक कला आहे. फारच थोड्या लोकांना ती साधते. रिकाम्या हाताने बाजाराला गेले तरी भरल्या हाताने घरी परतात.

संत तुकारामाला ही पैसे मिळवायची कला नव्हती. त्याच्या नातेवाईकाने त्याला सांगितले, ''तुकाराम, राबल्याशिवाय फळ मिळत नाही. मी तुम्हाला एक दुकान उघडून देतो. तुम्ही ते दुकान चालवा.''

तुकाराम म्हणाले, ''जशी तुमची इच्छा. द्या दुकान उघडून.'' तुकाराम दुकानांत बसले भजन करीत. नंतर त्यांचा नातेवाईक आला. पाहतो तो दुकानांत माल कांही नाही. गल्ल्यात पैसा नाही. तो म्हणाला,

''हे काय ? माल कुठाय ? पैसा कुठाय ?''

तुकाराम म्हणाले, ''माल संपला. पैसा संपला. व्यापार संपला. आतां उरले ते केवळ भजन.''

तुकाराम दुकानांतून रिकाम्या हाताने बाहेर पडला. रिकाम्या हाताने प्रपंच चालणे कठिण. देवाला प्रसन्न करणे फार सोपे. प्रपंच मात्र फार कठिण. अध्यात्म सुलभ. प्रपंचा येवढे कष्ट येथे नाहीत. अध्यात्मांत फक्त एकच गोष्ट हवी, जगाकडे पाहण्याची दृष्टि बदलली की पुरे. तशी दृष्टि बदलावी म्हणून हे भगवच्चिंतन. ते दिवा, ज्ञानाचा दिवा पेटविते. अन सांसारिक ताप नष्ट होतात.

एकदां एका संताकडे एक आंधळा आला. तो म्हणाला, ''संत महाराज, मला एक कंदील द्या.''

संत महाराज म्हणले, ''बाबारे, तू तर आंधळा. तुला कशाला हवा कंदील ?''

आंधळा म्हणाला, ''लोक माझ्या अंगावर येऊन आदळतात. तसा मला या कंदीलाचा कांहीच उपयोग नाही हे खरे. पण निदान डोळे असणाऱ्यांना तरी ते दिसूं द्या ! म्हणजे माझ्या अंगावर पडणार नाहीत.''

संताने आंधळ्याला एक कंदील दिला. त्याला फारच संतोष झाला. कंदील फारच सुंदर होता. आंधळा हातांत कंदील घेऊन निघाला. चार पावले जातो न जातो तोंच एक जण त्याच्या अंगावर येऊन आदळला.

आंधळा म्हणाला, ''अरे बाबा, तुला दिसत नाही कां ? तुझ्या सारख्या लोकांसाठीच मी हा कंदील घेऊन निघालो. तरी तूं माझ्यावर आदळलास ?''

तो माणूस म्हणाला, ''तुझा कंदील तर चांगला दिसतो पण त्यांत

दिवा कोठे पेटलाय ?''

''असं काय ?'' तो आंधळा म्हणाला, ''तेवढा दिवा पेटवून दे बाबा.'' पेटता कंदील घेऊन आंधळा पुढे निघाला. चार पावले जातो न जातो, तेवढ्यात कोणीतरी त्याच्यावर पुन्हा आदळाच. आंधळ्याला आश्चर्य वाटले. त्याने विचारले. ''बाबारे, मी तर आंधळा-तुझ्या सारख्या डोळस माणसासाठी मी हातांत पेटता कंदील घेऊन निघालो आहे. तुला दिसत नाही कां ? की दिवा विझलाय ?''

तो माणूस म्हणाला, ''माझ्या डोळ्यांना दिसते. तुझा कंदील ही पेटलाय पण काय करायचे ? त्याक्षणी मी डोळे मिटले होते.''

काय विचित्र संसार आहे हा ! डोळे ज्यांना आहेत त्यांनी ते मिटून घेतलेत. ज्यांनी डोळे उ्घडे ठेवलेत त्यांचा दिवा विझलेला. या आंधळ्याकडे पेटलेला दिवा आहे पण डोळे नाहीत. दिवा पेटलेला असावा. डोळे उघडे असावेत. तर मग कोणी अंगावर येऊन पडणार नाहीत. सुरक्षितता असते.

आम्हालाही दिसत नसले तरी चिंता नाही. आपल्या हाती दिवा असावा. भगवत् चिंनतरूपी दिवा. तर मग निदान डोळे असलेले लोक तरी आपल्या अंगावर येऊन आदळणार नाहीत. संत देतो तो ज्ञानदीप. (ज्ञानग्रंथ) त्यामध्ये अनुभवाचा दीप पेटता करावा.

कांहीजण घाईने पुस्तकरूपी कंदील घेऊन जातात तरीही जीवनांत पतित होतात. त्या आंधळ्याला दिवा पेटवून घेऊन जाण्याऐवढी फुरसत नव्हती. तेवढे व्यवधान नव्हते. तसाच निघाला. कित्येक वेळां शास्त्र अध्ययन करण्यांच्या गडबडीत ज्ञानदीप पेटला किंवा नाही हे पाहणेच विसरून जाते.

शास्त्र, शास्त्र-वचन यांचे सावकाशपणें चिंतन करावे. त्याने कालांतराने प्रकाश उत्पन्न होतो.

भगवच्चिंतन सुध्दां सावकाशपणें चालले पाहिजे. त्याने मन निर्मुक्त होते. कितीही कष्ट-त्रास, संकटे आली तरी त्यांच्या प्रपातांत सांपडून मनाच्या चिंध्या-चिंध्या होत नाहीत. माणसाला ठेच लागत नाही. रस्त्यांतील दगड दिसला नाही. तर गृहस्थ असो वा संन्यासी, ठेच ही लागणारच. जीवनांत कष्ट-त्रास अनिवार्य. सर्वांनाच. पण भगवच्चिंतनाची दृष्टी उघडी असेल तर दुःख-कष्ट दुष्परिणाम करूं शकणांर नाहीत.

त्यासाठी चिंतन सर्वांनाच आवश्यक. ते रोज रोज चालले पाहिजे. पूजा-आराधना यांपेक्षा चिंतन महत्वाचे. शास्त्र अध्ययन-अध्यापनादींचा उद्देश चिंतन, सकल साधनांचा उद्देश चिंतन. चिंतन म्हणजे मत स्थापन नव्हे, मंडनही नव्हे.

या विश्वाला आपल्या मतीय चौकटीत बसविणे सोपे काम नव्हे. सत्याला शंभर मुखे, शंभर प्रकारचे सौंदर्य. सगळे पहावे, ऐकावे, आनंद घ्यावा यासाठी भगवच्चिंतन.



## १३

जगांत सर्वत्र एक गोष्ट प्रामुख्याने नजरेत भरते. ती म्हणजे ''आवर्तनशीलता''. प्रत्येक वस्तु 'आवर्तनशील' आहे. संपूर्ण जग हे 'आवर्तनांत' गुरफटले आहे. सागरांतून आकाशाला चढलेला जलबिंदु पुनः सागरालाच येऊन मिळतो. अत्यंत सूक्ष्म अणूपासून प्रारंभ होऊन देह वाढतो व शेवटी अणुरूप धारण करतो. मध्यंतरी फारच दूरवरचा प्रवास केल्याप्रमाणे वाटले तरी शेवटी जेथून प्रारंभ झाला, तेथेच त्याचे अवसान होते. मातीत जन्म व मातींतच लय. हे सुध्दां एक आवर्तनच.

एका बीजापासून वृक्षाचे आवर्तन सुरू होते. बीज अंकुरते. रोप वाढते. मोठा वृक्ष होतो. त्या वृक्षाचे पुनः बीज रूपांत पर्यवासन होते. हे जीवनचक्र. परिभ्रमण चक्र. हे थांबणारे चक्र नव्हे. विश्वाचा प्रारंभ जेव्हा झाला, तेव्हांच आवर्तनाला प्रारंभ झाला. हे आवर्तन बदलतां येत नाही.

देह आपल्या गतीमध्ये एकदां आवर्तनांत सांपडला तर कोणत्याही अवस्थेंत आवर्तनाचा क्रम थांबवितां येत नाही. बाल्य, यौवन, वार्धक्य त्यानंतर मृत्यू, पंच महाभूतांपासून विकसित झालेला देह पंच महाभूतांतच विलीन होतो. बाल्य, यौवन, वार्धक्य कशालाही थांबविता येत नाही. मृत्यू आणखी एका अवर्तनाचे कारण ठरतो. हा क्रम कोणतीही शक्ति थांबवू शकणार नाही.

तरंग उत्पन्न होतो. मोठा होतो. शेवटी नाहीसा होतो. सर्व वस्तु अशाच. माणूस या आवर्तनाला थांबविण्याचे अथवा बदलण्याचे स्वप्न पाहतो. ते जमले नाही तर दुःखी होतो. हे सकल विश्वच आवर्तन पावत असतां आपले आवर्तन कसे थांबविता येईल ? हजारो कोटी वर्षांपूर्वी सूर्य उत्पन्न झाला आणि त्याने आपले प्रकाश-किरण सर्वत्र पसरविण्यास सुरवात केली. त्याचे हे कार्य आतां मध्यावर आले आहे. त्यानंतर हळू-हळू त्याचा ऱ्हास होऊन तो थंडगार गोळा होईल. ते थांबविणे कोणाला शक्य आहे ? सर्व रोगांवर औषध असेल पण वार्धक्यावर-मरणावर औषध कोठे ?

कोणीही केवळ चढत्या अवस्थेत राहणे शक्य नाही. केवळ उतरत्या अवस्थेत राहणेही शक्य नाही. चढती अवस्था, उतरती अवस्था. या सतत सुरू असणाऱ्या प्रक्रिया. सतत वाहणारा प्रवाह. विश्वाच्या सर्व क्षेत्रांमध्ये अवस्थांमध्ये हे आवर्तनचक्र ओळखले पाहिजे. हेच तत्व-ज्ञान.

विजयनगर साम्राज्य उदयाला आले. शंभर वर्षे विकसित होत गेले. माणिक-मोत्यांच्या राशी रस्त्यांत पडून राहात. तेवढा व्यापार वाढला. रस्त्यांत झाडलोट करणाऱ्यांना सुध्दा केर कचऱ्यांत माणिक-मोती सापडून ते सुध्दां श्रीमंत झाले. चढती थांबली. उतरती कळा सुरू झाली. आज हंपी म्हणजे भग्न झालेले अवशेष. या जगांतील वस्तु शाश्वतपणें एकाच अवस्थेंत धरून ठेवतां येत नाही. आकाशांत वाऱ्यावर उडणारा पतंग स्थिरपणे एकाच ठिकाणी धरून ठेवतां येणार नाही. तो डोलतच राहणार. त्यांतच आनंद.

कालरूपी वारा वाहतो. जीवनरूपी पतंग आकाशांत उंच भरारी मारतो. क्षणा-क्षणाला तो डोलतच राहतो. आपण स्वप्न पाहतो. सर्व कांही स्थिर

असावे असे स्वप्न. आपण ज्या अधिकाराच्या खुर्चीवर बसलो आहोत ती खुर्ची स्थिर असावी. आपणाला त्या खुर्चीवरून उतरावे लागूं नये. म्हणून आपण खूप प्रयत्न करतो. पण खुर्ची वांचविणे कोणालाही शक्य होणार नाही. कारण ती खुर्ची आवर्तनात सांपडलेली आहे. खुर्ची सांगते,

''अरे मानवा, मी आवर्तनांत रूतले आहे. प्रवाहांत सांपडले आहे. या खुर्चीवर बसणारा प्रत्येकजण खाली उतरतोच. कारण तो आवर्तनाचा नियम आहे. कायमपणे एकालाच खुर्चीवर बसून राहणे शक्य नाही. आतां तूं बसला आहेस ना ? तर मग उतरायची तयारी करून ठेव.''

कालचक्र सतत फिरतच राहते. कृतयुग, त्रेतायुग, द्वापरयुग, कलियुग त्यानंतर पुनः कृतयुग, त्रेतायुग, द्वापारयुग, कलियुग अशी युगे फिरतच राहतात. शुध्द सत्याचा कालखंड म्हणजे कृतयुग. त्यांत थोडेसे असत्य मिसळले की त्रेतायुग. असत्याचे आणखी थोडे जादा मिश्रण केले की द्वापरयुग. सत्य कांही उरले नाही असे वाटण्याइतपत असत्य मिसळले तर ते कलियुग. परिस्थिती येवढी बिघडली की पुनः परिवर्तन. पुनः सत्य युग. ही विश्व-नियति असतां कोण काय करूं शकतो ?

**''यदा यदा ही धर्मस्य ग्लानिर्भवति भारत.''** भगवान श्रीकृष्ण जन्माला आले. काय करायला जन्मले ? धर्माची स्थापना करायला जन्माला आले. धर्माची प्रतिष्ठापना केली. प्रतिष्ठापना करून जातांना त्यांनी सांगितले,

''आतां कलियुग येत आहे. जागृत राहा !'' म्हणजे याचा अर्थ काय ? प्रत्यक्ष भगवंत अवतार घेऊन आला तरी, त्याने कितीही प्रयत्न केले तरी कालचक्र थांबविता येत नाही हेच खरे.

*मांधाता च महिपतिः कृतयुगालंकार भूतो गतः ।*
*सेतुर्येन महोदधौ विरचितौ क्वा सौ दशास्यांतकः ।*
*अन्येचाऽपि युधिष्ठिर प्रभृतयः याता दिवं भूपते ।*
*नैकेनापि समंगता वसुमती मुंजत्वया यास्यति ।।*

**भावार्थ :** कृत युगालंकार प्राय असा मंधात महाराज गेला. त्रेता युगांत महासागराला सेतु बांधून महाबली रावणावर विजय मिळविणारा तो महानुभाव राम कोठे आहे ? द्वापर युगांत या भूमिवर राज्य करणारे धर्म वगैरे महाराजे स्वर्गाला निघून गेले. आतां कलियुगांत राज्य करणाऱ्या मुंज राजा, तूं मात्र त्यांच्याप्रमाणे हे भूमंडळ येथेच सोडून जाणार नाहीस ना ?

राज महालाप्रमाणे नवीन घर बांधणारा यजमान सुखाचे स्वप्न पाहात असतो. वैभवयुक्त शयनागार. विस्तृत असा दिवाणखाना, विश्रामाची सर्व साधने जुळवून वृध्दापकाळी सुखाने दिवस कंठण्याची स्वप्ने पाहतो. दिवसामागून दिवस जातात. मुले-नातवंडे यांची संख्या वाढते. घर भरून जाते. स्वतःच्याच घरांत त्याला बसायला, उठायला स्वतंत्र खोली राहात नाही. आसन शिल्लक राहात नाही. स्वतःच निर्माण केलेला राजमहाल सोडून देवळाकडे वाट चालायची पाळी त्याच्यावर येते. हेच ते 'आवर्तन'. बापानंतर मुले बापाचे स्थान बळकावतात. मुलांचे स्थान नातवंडे आक्रमतात. हीच जगाची रीत. कोणीही कोठेही शाश्वतपणे राहू शकत नाही. ही या जगाची नियति आहे. सर्व कांही आवर्तन नियमानुसार चालले आहे.

भगवंत सत्य व दिव्य तत्व. पविर्तनाचे नियम त्याला लागू होत नाहीत. त्याला आदि नाही म्हणूनच अंत ही नाही. तो 'अनावर्तनीय' ! आवर्तनशील अशा विश्वाच्या अंतरंगातच हा अविचल देव वास करतो. बदलणाऱ्या वस्तूंच्या

मध्ये त्या न बदलणाऱ्या देवाला ओळखणे हेच भगवच्चिंतन ! कौमार, यौवन, वार्धक्य, मरण या अवस्थांमधून सुध्दां असा आत्मा-देव ओळखायला येणे हीच 'जीवन्मुक्त' स्थिति !

आवर्तनाची जाणीव ठेवून जगणे हेच पवित्र जीवन. आध्यात्मिक जीवन. आवर्तनाची जाणीव न ठेवतां जगणे हेच सांसारिक जीवन.

पूर्वी युरोपांत एक प्रभावी माणूस होता. त्याने अनेक सुधारणा घडवून आणल्या. लोकांनी त्याची खूप स्तुति केली. त्याचे भव्य स्मारक उभे करण्याच्या उद्देशाने संगमरवरी दगडामध्ये एक मोठी मूर्ति कोरण्यांत आली. अद्भुत-सुंदर मूर्ति. ती मूर्ति स्थापन करण्याचा दिवस आला. त्याला फारच संतोष झाला. शहरांतील मध्यवर्ती ठिकाणी ही मूर्ति शाश्वतपणे उभी राहील. येणारा-जाणारा आपली हॅट काढून वंदन करून पुढे जाईल. या कल्पनेनेच तो रोमांचित झाला. रात्रीच्या प्रहरी सगळीकडे चांदणे पसरले होते. चांदण्यात एकदां ती मूर्ति डोळे भरून पहावी असे त्याला वाटले. तो मूर्तीपाशी आला. भव्य अशी मूर्ती चांदण्याच्या स्निग्ध प्रकाशांत फारच खुलून दिसत होती. एकेक पायरी चढत तो मूर्तीच्या पायथ्याशी आला. त्या सौंदर्याने तो मुग्ध झाला. तेथील चौथऱ्यावर तो बसला. खालच्या पायरीवर त्याने पाय टेकले. प्रकाश आणि सावल्यांच्या खेळांत कोठूनतरी ध्वनी आला. हसण्याचा ध्वनी. त्याने इकडे तिकडे कोणी दिसतय काय ते पाहिले. तेथे कोणीच नव्हते. आपल्या पायाखालूनच हसण्याचा आवाज येतो आहे असे त्याला वाटले.

"कोण आहे ?" त्याने विचारले, "कोठून हंसतो आहेस ?"

"मी हंसतो आहे तुझ्या पायाखाली. पूर्वी मी सुध्दां तुझ्यासारखाच होतो. याच स्थानी माझी मूर्ती उभी होती. आतां मूर्तीचे उच्चाटन होऊन

पायरीचे स्थान मला प्राप्त झाले आहे. माझ्याहून खालच्या पायरीवर माझ्या आधी होऊन गेलेल्या माणसाची मूर्ति आतां माझ्याखालील पायरीवर आहे. सर्वांच्यावर उभे राहायची आतां तुझी पाळी आहे. या आधी माझी पाळी होती. त्याआधी माझ्या खालील पायरीवर जो आहे ना ? तोच वरच्या जागेला होता.''

''मला हसूं आलं. कां ? माहित आहे ? आतां तू जसा येथे संतोषाने बसला आहेस, तसाच मी पण येथे येऊन बसलो होतो. त्यावेळी त्या खालच्या पायरीवर आहे ना; तो हसत होता. मी तिकडे लक्ष दिले नव्हते. पण आतां मला त्याच्या हसण्याचा अर्थ समजला. म्हणून मला हसूं आले. उद्या तुझी अवस्था काय होईल ? याच्या अनुमानाने मला हसूं आले.''

ही कथा केवळ त्या युरोपांतील मूर्तीची नव्हे. तर ती सर्वांची. आवर्तनशील जगामध्ये कशाचेही दु:ख करू नये. हेच आपले जीवनसूत्र.

माझे जीवनसुध्दा तुमच्याहून फारसे वेगळे नव्हे. आतां या बसलेल्या स्थानावरून मला उतरावेच लागेल. आणि मी उतरायला कां कूं केले तर लोक उतरविल्याशिवाय सोडतील काय ? मला उतरावे लागेल. त्या स्थळी दुसरा येऊन बसेल. कालांतराने त्यालाही उतरावे लागेल. आतां बसतांना पूर्ण विचार करूनच ब़सलेले बरे. मला या स्थानावरून उतरावे लागेल ही जाणीव ठेवून बसणे हाच परमार्थ. याचा अर्थ असा नव्हे की अधिकार स्थानावर मुळींच बसू नये ! अधिकार स्थानावर अवश्य आरूढ व्हावे. पण आपल्याला एक दिवस हा अधिकार सोडावा लागेल याचे भान ठेवूनच अधिकार स्वीकार करावा. रेल्वे प्रवास करतांना फर्स्ट क्लास अथवा ए.सी. क्लास असेल तर फारच सुखाचे आसन असते. पण आपण किती काळ त्या आसनावर आरूढ

होतो ? आपले उतरण्याचे स्टेशन येईपर्यंत. आमच्यासारखे हजारो प्रवासी त्या पीठावर बसले असतील. सुखाने झोपले असतील. पण शाश्वतपणें तेथे कोणीही बसूं शकणार नाही. सगळी तिकिटे कालमिति पुरतीच असतात.

एकदां एक संन्याशी राजवाड्यांत गेला आणि एक निवांत स्थान पाहून आरामात झोपला. राजा आला. त्याने पाहिले. राग आला. राजा म्हणाला,

''अरे ऊठ, ही काय धर्मशाळा आहे ?''

''तर काय ?'' संन्याशाने विचारले. ''पूर्वी येथे तुझा आजोबा राहात असे. तो गेला. मग आला तुझा बाप. तो कांही काळ येथे राहिला. तोही गेला. कधीही परत न येण्यासाठी. आतां तुझी पाळी. तुलाही एकदां हे सर्व सोडून गेले पाहिजे ना ? तर मग ही धर्मशाळा नव्हे तर काय आहे ?''

आपण सर्वांनी ही कथा ऐकली आहे. वाचली आहे. पण कथेचे इंगित आपल्याला कळले नाही. प्रसंग आला तरी ते आपणांस आठवणार नाही. शाश्वततेच्या भ्रमांत वावरल्यानेच माणसाला येवढे दुःख होते.

बसवण्णा दहा वीस वर्षे बिज्जळाचे मंत्रीपद भूषवीत होता. कल्याण नगरांत अनभिषिक्त सम्राटाच्या इतमानाने तो राहत होता. त्याने धर्म साम्राज्याची स्थापना केली होती. पण कल्याण सोडून जाण्याचा प्रसंग येतांच एक क्षणभरही विचलित न होतां मंत्रिपदाचा मुकूट उतरवून वस्त्रे उतरवून मागे सुध्दा वळून न पाहतां कल्याण सोडून निघून गेला. अंगावर पडलेली एखादी गवताची काडी झटकून टाकल्याच्या सहजतेने किरीट उतरवून कूडलसंगमदेवाकडे निघून गेला. तो किती बरे निर्लिप्त असेल ? त्याला माहित

होते, ''हे जग परिवर्तनशील आहे. या खुर्चीवर बसलोय. माझ्या आधी कोणीतरी बसलेला होता. आतां अपण बसलोय. माझ्या आधी बसलेल्याने जसा खुर्चीचा त्याग केला तसाच मला पण एक दिवस त्याग करावा लागेल.'' हे तो जाणूनच होता. त्यामुळे अधिकार सोडतांना त्याला मुळीच दुःख झाले नाही. आपण बसवण्णाचा महिमां कां बरे गातो ? तो त्यागमूर्ति होता म्हणून. कोणत्याही क्षणी त्याग करण्याची त्याच्या मनाची तयारी होती. आमच्यावर तशी पाळी आली असती तर केवढा कोलाहल माजला असता. केवढा गदारोळ उठला असता ! मंत्री, एम्.पी., एम.एल.ए. त्या स्थानावरून उतरले तरी आपण अधिकारांत असताना आक्रमित सरकारी बंगले सोडायला तयार होत नाहीत. अधिकार जाऊन किती महिने झाले ? किती वर्षे लोटली ? पण ते भव्य बंगले सोडायला त्याचे मन अजून तयार नाही. मोह कसा सुटेल बरे ?

तत्वज्ञानी व्हायचे असेल तर माणसाने हे तत्व जाणले पाहिजे. ''जग हे आवर्तनशील आहे.'' हेच ते तत्व. फारच सुलभ सूत्र. हे आवर्तन सूत्र. चार दिवस सासूचे चार दिवस सुनेचे. कोणाचेही स्थिर नव्हे. हे जग निर्माण झाले तेव्हांपासून सासू-सुनेचे हे आवर्तन सुरू आहे.

घड्याळाच्या कांट्याप्रमाणे हे जीवनचक्र फिरतेच आहे. घड्याळाचे कांटे थांबविता येतील. कोणत्याही क्षणी. पण जीवनाचे घड्याळ थांबविता येत नाही. म्हणून तर हे जग सुंदर आहे. सर्वांना कालचक्र थांबवितां आले असते तर सगळे अस्ताव्यस्त झाले असते. एखाद्याने सूर्याला थांबविले असते. दुसऱ्याने चंद्राला. एखाद्याने वारा-पाऊस थांबविला असता. परिणाम काय झाला असता ? पावसाळा, हिंवाळा, उन्हाळा या ऋतूंवर कोणाचे नियंत्रण

नाही. तरी पण मानवाला आवर्तन चक्रावर मात करण्याचा भ्रम. चिरंजीव होण्याचा हव्यास.

पूर्वी सेवानिवृत्तीचे वय अठ्ठावन्न होते. ते पंचावन्न झाले. आता पुनः ते अठ्ठावन्न झाले. आणखी दोन वर्षे वाढली तर साठ होईल. वय कितीही वाढले तरी रिटायर व्हायची इच्छा कोणाला आहे ? राजकारण्यांना तेही बंधन नाही. मरेपर्यंत अधिकार सोडायची इच्छा नाही परंतु आवर्तन चक्रांतून सुटका करून घेणे कुणाला शक्य आहे ?

आपण कोणत्याही क्षणी त्याग करायला सिध्द असले पाहिजे. घरातून बाहेर पडताना आपण परत घरी येऊं; हा भावसुध्दा मनांत न आणतां जावे. निश्चिंतपणे ! जेथे असूं तेथेच निश्चिंत ! असे जो वागतो, तोच संत तसे न वागणारा संसारी. संन्यासी म्हणजे ज्याने लग्न केले नाही तो, आणि संसारी म्हणजे लग्न झालेला; हे मानणे चूक आहे. जो निश्चिंतपणे जगतो, स्वच्छंदांत राहतो तोच संत. जो कल्पनेच्या जंजाळांत सांपडला, तो संसारी. आवर्तनेचा प्रपंच जाल. या जालांतून जो बाहेर आला, तोच मुक्त ! या जालामध्यें जो अडकला, तोच प्रापंचिक ! हे सर्व जाणून निराभारी राहून जगावे.

आपल्या घरी एखादा थोर माणूस आला की आपण आपले सुखासन सोडून त्या थोर व्यक्तीला त्या आसनावर बसवितो. कां बरे ? कांही वेळानंतर ते सुखासन सोडून आपल्या घरांतून बाहेर निघून जातील याची आपणांस खात्री असते म्हणून. घरी आलेला तो महानुभाव शाश्वतपणें ठाण मांडून आपल्या घरीच राहणार आहे. असे समजले तर त्यांचे स्वागत कोण बरे करतील ? आपण सर्वजण अतिथि आहोत. मी तुम्हांला अतिथि. तुम्ही माझे

अतिथि. तुम्ही माझा गौरव करावा; मी तुमचा गौरव करावा. परस्परांचा गौरव करीत जगावे. यांतच उभयतांचे श्रेयस. या श्रेयासाठीच भगवच्चिंतन.

"मी आरूढ होत नाहीं व उतरत नाही." आरूढ होणे उतरणे ही भौतिक क्रिया, सामाजिक परिकल्पना. पण अंतरंगांत वास करणारा आत्मा कशावर आरूढ होत नाही किंवा उतरत ही नाही. येवढे निर्लिप्तपणे एखाद्या अतिथिप्रमाणे रहायला शिकले तर तेच भगवच्चिंतन ! तेच पवित्र जीवन. ते जीवन दिव्य होय. असे दिव्य जीवन कंठणारा सुखाने जगतो. पण तसे राहतां येत नाही. आपल्याहून मोठ्या माणसाला पाहून मनाला ताप ! आपणही तसाच मोठा व्हावे ही आशा. तसे होतां येत नाही याचे दुःख ! त्यासाठी वाम-मार्गाने धन संपादन करण्याची दुराशा. अति आशा जीवनांतील सुख शांति नष्ट करते.

आपण नेहमी भ्रमण चक्र लक्षांत ठेवावे. जत्रेमध्ये एका मोठ्या चाकाला पाळणे जोडलेले असतात. माणसे या पाळण्यांत बसतात. चाक फिरूं लागते. खालील पाळणा वर जातो. वरील पाळणा खाली येतो. आपण त्यांत बसा. पहा किती मौज ! किती आनंद !! खालील पाळणा वर वर आणखी वर जातांना केवढा आनंद होतो. सर्वांत वरच्या पातळीवर आला की जगातील सर्वोच्च स्थानी पोहोचल्याचा आनंद. वाटतं पाळणा उतरू नये. पण चाक फिरतच असते. खालचा पाळणा वर यायचा असतो. त्यासाठी वर पोहोचलेला पाळणा खाली आलाच पाहिजे. आपला पाळणा सतत वरच राहावा. तो खाली येऊ नये असा आग्रह नसावा. चाक फिरतच असते. पाळणा वर गेला तरी आनंद. पाळणा खाली आला तरी आनंद. जीवनांतील चढ उतार याच भावनेने अनुभवावेत.

अक्षता पडल्यानंतर वरात. शृंगारलेल्या रथांत वाद्यवृंदाच्या

जल्लोशांत. वधुवर पुष्पमाळांनी आणि बाशिंगाने शृंगार करून रथारूढ झालेले असतात. वाजंत्री वाजत असतात. कोणी गात असतो, कोणी नाचत असतो. हे वैभव पाहून वधुवरांना वाटत असते की ही मिरवणूक कधी संपू नये. जमीनीवर चालणाऱ्यांना वाटत असते, केंव्हा ही मिरवणूक संपेल आणि केंव्हा आपल्या घरी जाऊन विश्रांति घेऊं असं ! रथांत बसलेल्यांना वाटतं कधी संपू नये. खाली चालणाऱ्यांना वाटतं लौकर संपावं. हीच या जगाची रीत. आपणांस ही जगाची रीत समजली तर जीवन फारच सुखमय.

विद्या, शक्ति ही सर्व गवताला लागलेल्या आगीप्रमाणे क्षणिक. किती काळ जळेल ? दगडी कोळशाची आग लवकर विझत नसते. पण गवताचे तसे नाही. पेटायला वेळ लागत नाही आणि राख व्हायलाही. आपले जीवन-आपली विद्या-आपली शक्ति हे सर्व गवताच्या आगीप्रमाणे क्षणिक आहेत; हे जाणून माणसाने सुखाने जगायला शिकले पाहिजे.

आपल्या समोरून एखादी मारूती कार फुर्रर दिशी गेली की आपण हे समजून चालावे की ती कार कितीही वेगाने-डौलाने पळो. ती थांबलीच पाहिजे. कारची गोष्ट सोडा, आपण रॅकिटमध्ये बसून उड्डाण केले तरी एक दिवस उतरले पाहिजे ना ! जीवन म्हणजे पळणे नि थांबणे. वर जाणे अन खाली येणे. हे जाणले तर वर जाण्यांत ही कांही विशेष नाही अन खाली उतरण्यांतही कांही विशेष नाही. प्रसंगावधान राखून असावे. हे निरामय जीवन. हे ज्ञानियांचे जीवन तसे जीवन लाभावे यासाठीच हे भगवच्चिंतन !

भगवंताच्या अनावर्तनाच्या चिंतनानंतर आवर्तन जगात जगणे ही एक साधना. हे आर्वतन सूत्र आपल्या जीवनांत आचरावे. सर्वत्र आवर्तन सूत्राचा अवलंब करून जगांत वागावे. त्याने संतोष वाटतो. हे आजचे चिंतन. आवर्तन

हेच जीवन. आवर्तन हेच आत्मचेतन. आवर्तन जीवन कठंतानाच अनावर्तन चेतनाचे चिंतन करावे. अनावर्तन चेतनाच्या चिंतनाचे आवर्तनशील जीवन कंठावे हीच मुक्तावस्था. हीच जीवन्मुक्तावस्था !

●●●

## १४

आपण वस्तु मिळविण्याची इच्छा करतो. समृध्द जीवनासाठी वस्तूंची इच्छा अनिवार्य ! आपण ज्यांची इच्छा करतो त्यांमध्ये कांही स्थूल, कांही सूक्ष्म. कांही वस्तु सहज प्राप्त होतात तर कांही वस्तु परिश्रम साध्य. अशारीतीने प्राप्त झालेल्या वस्तूंच्या अवलंबनाने आपले जीवन आकार घेते. अन्न-पाणी, घर-दार यांमध्ये कमतरता भासली तर जीवन गरीब-दरिद्री वाटते. यांचा संग्रह वाढला तर जीवन समृध्द वाटते. या वस्तूच जीवनाची गति.

या गति दोन प्रकारच्या. सामान्य आणि विशेष. रोजच्या जीवनांत आपण ज्यांची अपेक्षा करतो त्या सामान्य-गति. त्या प्रासंगिक. संपूर्ण जीवन व्यापून राहणाऱ्या गति विशेष गति ! अथवा अंतिम गति. कित्येक वस्तूंची आपण कामना करतो. त्यापैकी कांही वस्तूंची आपणांस प्राप्ति होते. त्या गति तेथे थांबतात. आपण घरांतून निघतो. या मंदिराला येऊन पोहोचण्याच्या उद्देशाने. येथे येऊन पोहोचलो. ती गति संपली. तेथे उद्देश संपला. आपणास तेवढ्यानेच समाधान वाटते. अशा अनेक गति जीवनांत उत्पन्न होतात. क्षणा-क्षणाला या गति बदलतात. कांही गति मात्र जीवनभर राहतात. त्या जीवनासाठी गति !

लहान-सहान गतीविषयी विचार करण्याची आवश्यकता नाही. ज्या-

त्यावेळी आपण ज्यांची-त्यांची पूर्तता करून घेतो. आपणास भूक लागली की आपण अन्न खातो. तहान लागली तर पाणी पितो. माणसामध्ये आणि प्राण्यांमध्ये हा समान गुण. आपणांस या गतीचा त्याग करतां येत नाही.

आपण अंतिम गतीविषयी विचार करूं या ! ज्या गतीसाठी आपण आपले संपूर्ण जीवन वेचतो-राखून ठेवतो अशी एक गति प्रत्येक माणसाने स्वीकार केलेली असते. ती त्याला परमगति; परमार्थ ! सर्वजण एकाच गतीचा स्वीकार करीत नाहीत. आपण ज्याला परमगति मानतो. ती लाभली तर आपले जीवन सफल झाले; असे तो समजतो. ती गति प्राप्त झाली नाही तर आपले जीवन निष्फळ झाले; असे तो समजतो.

कांही जणांनी आपली परमगति कामिनी, कांचन यांत मानली तर कांही जणांनी भूमि-राज्य आपली परमगति मानली. कांही जणांनी विद्या तर कांही जणांनी स्वर्ग आपली परमगति मानली.

*होन्निगागि सत्तुदोंकु कोटयनुकोटि*
*होण्णिगागि सत्तुदोंकु कोटयनुकोटी*
*माण्णिगागि सत्तुदोंकु कोटयनुकोटी*
*नी गुरियागि सत्तवरनारनु काणे गुहेश्वरा !*

**भावार्थ :** स्त्री प्राप्तीसाठी लढून कोट्यावधी लोक मरण पावले. धन संपादनासाठी लढून कोट्यावधी लोक मरण पावले. भूमि संपादनासाठी लढून कोट्यावधी लोक मेले. गुहेश्वरा, देवा तुझ्यासाठी मरणाऱ्या एकाला सुध्दा मी पाहिले नाही. - अल्लमप्रभु.

ज्याच्या प्राप्तीसाठी आपण मरण पत्करतो, ज्याच्या प्राप्तीसाठी घोर

कष्ट उपसायला तयार होतो. ती आपली परमगति असे आपण म्हणतो. ती प्राप्त झाली म्हणजे संतोष होतो. कदाचित जीवनभर कष्ट करून सुध्दा ती प्राप्त झाली नाही तर मनाला ताप. जीवनांत अतृप्ति.

अधिकार प्राप्तीसाठी हिटलरने केवढे परिश्रम केले ! संपूर्ण जगावर राज्य करावे. एकमेव सम्राट व्हावे; अशी आशा केली. साहस केले. त्याच्या जीवनाची ती परमगति ! आपल्या ध्येय सिध्दीसाठी काय वाटेल ते करायला तो सिध्द झाला. कोणतेही साधन वापरायला त्याने मागे पुढे पाहिले नाही. घोर युध्द केले. लाखो लोक प्राणांना मुकले. जग उध्वस्त झाले. फ्रान्सवर विजय मिळवितांच आनंदाने बेहोष होऊन तो नाचूं लागला. जगाच्या फार मोठ्या भागावर त्याने आपले वर्चस्व स्थापिले. पण तोच हिटलर मृत्यू समयी अत्यंत निराश झाला होता. पराभव-अपमान-असहनीय दुःखाने व्याकुळ झाला होता. अंत्यकाळी हिटलरसारखा दुःखी तोच.

आपले जीवनसुध्दा याहून वेगळे नाही. आपल्या अनेक आशा-आकांक्षा त्यांपैकी कांही आशा-आकांक्षाची कधी पूर्तता होत नाही. बरे आशा-आकांक्षाची पूर्ती झाली तरी संतृप्ति लाभेल याचा भरवसा नाही. महाभारत युध्दामध्ये पांडव विजयी झाले. सर्व कौरव मरून गेले. अठरा अक्षौहिणी सैन्याचा धुव्वा उडाला. पांडव सिंहासनावर आरूढ असताना एक वृध्दा धर्मराजाच्या दरबारात आली. धर्मराजाला उद्देशून म्हणाली,

“धर्मराजा, तू आतां कोणावर राज्य गाजवितो आहेस ? सर्व बंधू-बांधव मरण पावले. लाखो तरूण मेले. आता राहिल्या लाखो विधवा, लहान मुले, अत्यंत अशक्त असे वृध्द. तूं अशा प्रजेचा राजा. आई दुःखी पुत्रशोकाने. तरूणी दुःखी पति मरणाने. मुले अनाथ पितृ आधार तुटल्याने अशा प्रजेचा तूं

अधिपति.''

तिच्या बोलण्याने धर्मराजाचे हृदय पिळवटले. तो अश्रु ढाळुं लागला.

जे मिळविले असतां जीवन सार्थक होते असे आपण समजतो; त्याची प्राप्ति झालेली असते. पण समाधान लाभत नाही. म्हणून आपली गति कोणती असावी ? ते ठरविले पाहिजे. लौकिक वस्तूंची अपेक्षा करूं नये असा त्याचा अर्थ नव्हे. लौकिक वस्तु प्राप्त करून घेण्याची आशा-अपेक्षा जरूर असावी. पण तीच परमगति नसावी.

**परमगति कोणती असवी ?**

जी गति मिळविली असतां आपणांस परम तृप्ति होईल, ती आपली परमगति. आपली परमगति कोणती ? ज्या वस्तूंच्या प्राप्तीसाठी आजवर आपण झटलो त्या वस्तूंचा त्याग करून, जी वस्तु मिळविण्याचा प्रयत्न संतांनी केला, ती वस्तू प्राप्त झाली तर चिर शांति. ज्यापासून नित्य प्रसन्नता लाभते ती परमगति. तोच परमार्थ.

मोळगे मारय्या काश्मीरचा महाराजा. त्याला कसलीच कमतरता नव्हती. पण सर्वस्वाचा त्याग करून तो कल्याणला आला. राजमहालांत राहणारा पर्णकुटींत राहू लागला. लाकडाची मोळी विकून आपला उदरनिर्वाह करूं लागला. प्राप्त पैशांतून अन्नसंतर्पण करूं लागला. धर्मचिंतनांत भगवच्चिंतनांत वेळ घालवू लागला. त्याचे हृदय संतृप्तीने भरले होते. काश्मीर सोडून कल्याणला येऊन त्याने काय मिळविले होते ?

कोणतीही बाह्य वस्तु-संपत्ति त्याने मिळविली नव्हती. पण त्याने एक

मिळविले होते. ती वस्तू मिळविली असतां जीवन पवित्र होईल अशी अद्भुत वस्तु त्याने मिळविली होती. लोभ-मोह तुटला होता. मोळिगो मारय्या सारखेच भगवान बुध्दाचे जीवन. बुध्द ही पूर्वाश्रमांत राजा होता. महावीर ही राजा होता. त्यांनी राज्याचा त्याग केला. जीवन सार्थक करणारा परमार्थ त्यांनी मिळविला.

घर सोडून जाताना बुध्द फारच दुःखी कष्टी झाला होता. जीवनातील सर्व सुखांचा उपभोग त्याने घेतलेला होता. एका रात्री त्याने सर्वसंग परित्याग करायचा निर्धार केला. सुंदर पत्नी, चिमुकला मुलगा, तोही सुंदर. त्याचे प्रेम तोडायचे कसे ? परमार्थ साधनेसाठी बाहेर जाण्याचा निश्चय केलेला. मन सांगत होते, ''पहा पुनः एकदां प्रेमळ पत्नीचे सुंदर मुख पहा ! मुग्ध बालकाचे मुख पहा ! शेवटचे एकदां पहा !''

मानसिक आंदोलनांत बुध्द सांपडला होता. एकीकडे अत्यंत सुखमय, सुंदर वैवाहिक जीवन, दुसरीकडे अज्ञात साधक जीवनाची ओढ, शेवटी एकदां त्याने निर्धार केला. परमार्थ साधनेसाठी अल्पार्थाचा त्याग केला.

माणसाने अनिवार्यपणें कांही गोष्टींचा त्याग केला पाहिजे. महत्तर उद्देशासाठी लहान सहान उद्देश्यांचा त्याग केला पाहिजे. पण त्याग करणे सोपे नव्हे.

*जीववुळ्ळन्नक्कर क्रोधद मूल*
*कायवुळ्ळन्नक्कर कामद मूल*
*संसार व्याप्तिय मोहवुळ्ळन्नक्कर आशेय मूल;*
*इंतप्प आशेय केडिसि*

**मोक्षद लेस तोरि बढुकिसा**
**कपिलसिध्द मल्लिकार्जुनय्या !**

**भावार्थ :** जीव असे तो क्रोध येणारच. देह असेपर्यंत काम विकार असणारच. संसार व्याप्ति मोह असेपर्यंत आशा सुटलेली नाही. ही आशा तोडून मोक्ष मार्ग दाखवून माझे रक्षण करा कपिल सिध्द मल्लिकार्जुना.

'मी' हा जीव भाव. आर्थिक दृष्ट्या, सामाजिक दृष्ट्या त्याचे पोषण करणें हाच मनुष्याचा स्वभाव. 'मी' हा फार मोठा झाला पाहिजे अशी इच्छा असणाऱ्यांना 'क्रोध' असायचाच. 'अहं' अभिवृध्दीला अडथळे फार. 'काय' म्हणजे देह. देहाचा मोह, त्यामुळे आणखी एका देहाची आशा. तोच काम. संसार म्हणजे भोगवस्तूंचा पसारा. अधिकाअधिक वस्तूंचा संग्रह करण्याची अभिलाषा. ही अभिलाषा-ही रूचि असणाऱ्यांना संग्रह भाव चुकला नाही. तीच आशा. ती आशा नष्ट केली तरच मोक्ष. तेच जीवनाचे साफल्य !

ही परमगति. जीवभाव नाहीसा व्हावा. कायेचा मोह नाहीसा व्हावा. संसार व्याप्तीचा व्यामोह तुटावा. या तीन महत्वाच्या गोष्टी. प्राप्त परिस्थितींत संतृप्त राहण्याचा मनोभाव नसेल तर क्रोध, काम, लोभ, मोह हे सर्व उत्पन्न होतात. अनिवार्यपणे 'यदृच्छा मनस्थिति' साधली तर क्रोध काम नाहीसे होतात. बंधन नष्ट होते. अशी अवस्था हीच माणसाची परमगति ! निराभार अवस्था. अनंत तृप्तीने भरलेले जीवन !

'डायोजिनिस' नावाचा ग्रीस देशाचा महान तत्वज्ञानी होता. त्याच्या अंगावर अत्यल्प कपडे. हातात एक काठी आणि बाजूला एक कुत्रे. येवढे सोडले तर त्याच्याजवळ आणखी कांहीही नव्हते.-एकदां एक मोठा अधिकारी त्याला

भेटायला आला. त्यावेळी डायोजिनिस एका झाडाखाली बसला होता. तेच त्याचे घर. त्या अधिकाऱ्याने डायोजिनिसशी चर्चा केली.

त्या चर्चेने तो अधिकारी फारच प्रभावित झाला. त्याकाळी संपूर्ण अथेन्स शहरांत डायोजिनिसची फार मोठी ख्याति होती. तो अधिकारी म्हणाला,

''महाराज, आपण महान ज्ञानी आहांत. आपले बोलणे ऐकून हजारो लोकांना जीवनांत आनंद लाभला. आपल्या सारख्यांच्या पवित्र वाणीने मनाला खूप समाधान वाटते. आपल्या सेवेसाठी एक सुंदर महाल तयार केला आहे. तो महाल तुम्हांला अर्पण करतो आहे. आपण त्याचा स्विकार केलात तर मी धन्य होईल.''

डायोजिनिस म्हणाला, ''हे पहा मित्रा, मी या झाडाखाली बसूनच ज्ञानोदय प्राप्त करून घेतला. या झाडाची सावली मला फारच प्रिय आहे. त्यामुळे मला मोठी तृप्ति लाभते. ती तृप्ति-तो संतोष मला भव्य महालांत मिळणार नाही. मला भव्य महालाची आवश्यकता नाही. माझे तत्वज्ञान तुला ऐकावयाचे असेल तर राजमहालाचा त्याग करून बाहेर यावे. मला राजवाड्यात बोलावूं नये. माझे बोलणे तुला समजायचे असेल तर तूं तुझ्या परिसराचा त्याग करून दूर वर या झाडाखाली यावेस. येथे तू स्वतःला विसरशील. तरच माझे बोलणे तुला समजेल. येथे उच्चनीच नाही. सर्वजण येथे समान.''

डायोजिनिसला कसलीही आवश्यकता नव्हती. अंगावर पुरेसे कपडे नव्हते. पाहिजेत हा भाव नव्हता. घर नव्हते. घर पाहिजे ही त्याला कल्पना

नव्हती. आपल्या देशातसुध्दा डायोजिनिस सारखे अनेक संत होऊन गेले आहेत. त्या सर्व संतामध्ये एक अद्‌भुत गुण प्रामुख्याने दिसतो. तो गुण म्हणजे परम आत्मतृप्ति. अशी आत्मतृप्ति ही संताची परम गति ! 'सतां हि गतिः ।' संतांची ही गति आपल्या जीवनात परमगति म्हणून स्वीकार केल्यास आपले जीवन ही संत जीवन बनते. ही गति प्राप्त झाल्यानंतर दुसरी कोणतीही गति मिळविण्याची इच्छाच शिल्लक राहणार नाही. कोणतीही गति मिळविली तरी दुसऱ्या गतीची अभिलाषा उत्पन्न होते. त्या गतीना गौण मानून ही गति स्वीकारावी.

या गतीचे ध्येय समोर ठेवून भगवच्चिंतन करावे. जगातील अमूल्य वस्तूंपैकी सर्वात अमूल्य वस्तू कोणती असेल तर तो देव. हा भाव हेच भगवच्चिंतन. देवाची कल्पना मनांत भरून राहावी. त्याच्याहून थोर वस्तू दुसरी नाही. हा भावच भगवच्चिंतन. तराजूच्या एका परडींत भगवत् भाव, दुसऱ्या परडींत जगांतील समस्त वस्तु संपत्ति यांची तुलना करावी. या दोन्ही वस्तुंपैकी एकाची निवड करावी. भगवत् भाव निवडला तर भगवत् सत्य आपल्या जीवनांत व्यापून राहते.

**करियनित्तडे ओल्ले. सिरियनित्तडे ओल्ले.**
**हिरिदप्प राज्यवनित्तडे ओल्ले.**
**निम्मशरणर सूळ्नुडिय ओंदरगळिगे इत्तडे**
**निंम्मन्नित्ते काणा रामनाथा !**

**भावार्थ :** हत्ती दिला तरी नको. श्रीमंती-संपत्ति दिली तरी नको. मोठे राज्य दिले तरी नको. तुमच्या शरणांच्या सुमधुर अमृतवाणीचा एक थेंब

मिळाला तरी रामनाथा-जीवन सार्थक होईल.

संतांचा-शिवशरणांचा एक शब्द ऐकून, जीवनांतील ती अमूल्य वस्तू मानून. करि, सिरि, राज्य यांना झिडकारून; अत्यंत मधुर, अत्यंत अर्थगर्भित अनुभववाणी स्वीकारण्याचा शहाणपणा हा. या सत्य शब्दाच्या प्रेमाने जीवन सफल होते.



## ॥ १५ ॥

अनेक संतांनी-शिवशरणांनी देवाचे वर्णन केले आहे. देवाचे थेट वर्णन करण्यापेक्षा त्यांनी उपमा-दृष्टांत आदि अलंकाराचा उपयोग करून श्रोत्यांच्या मनावर परिणाम होईल अशा रीतीने उपदेश केला आहे. आपण सांगू ते श्रोत्यांच्या मनावर स्पष्टपणे बिंबवायचे असेल तर ही अलंकाराची भाषा अवश्य. जगद्गुरु शंकराचार्यांना हे जग मिथ्या वाटले. पण ते सांगायचे कसे ? ती कल्पना कशी बिंबवायची ? त्यासाठी त्यांनी दृष्टांत दिला. रज्जु-सर्प, रज्जु-दोरामध्यें सापाचा आभास. भ्रांतीच्या सापाचे अस्तित्व कसे ? ते रज्जु प्रमाणे सत्य नव्हे. कधीही अस्तित्वात नसलेल्या वस्तूप्रमाणे असत्य नव्हे. म्हणजे साप सदसत्-विलक्षण. जगाचे अस्तित्व सुध्दा तसेच. हा दृष्टांत सूक्ष्म कल्पना अधिक स्पष्ट करायला सहाय्यक होतो.

असत्य म्हणजे कधीही नसणारे. उदा. गोल चौक, चौकोणी त्रिकोण इत्यादि. गोल चौक म्हणजे म्हणजे केवळ शब्द मात्र. वस्तु शून्य, केवल विकल्प, शाब्दिक अर्थ आहे. पण वस्तु नाही. शब्दाला अर्थ आहे पण तो अर्थ भावगम्य नाही. तेथे वस्तु नाही, वस्तु नसतां केवळ शाब्दिकरीत्या एखादी वस्तु असेल तर ते असत्य. साप तसे असत्य नव्हे. तो दिसतो. पण स्फुट. दृश्य वस्तूप्रमाणे सत्यही नव्हे.

हे जग सत्यही नव्हे. असत्यही नव्हे. हे जग संपूर्णपणे नाही असे नाही. अथवा हे शाश्वतपणें आहे असेही नव्हे. सत् म्हणजे शाश्वत वस्तू नसल्याने सद् विलक्षण. नसलेल्या वस्तूप्रमाणे ते नसलेले नव्हे. म्हणून ते असद् विलक्षण. अशाप्रकारे सत्याला आणि असत्याला विलक्षण असे अस्तित्व शंकराचार्यांनी या जगासाठी कल्पिले. हे अस्तित्व आपल्या गमनास आणून देण्यासाठी योग्य आणि समर्थ दृष्टांतांचा त्यांनी उपयोग केला. या जगाचे अस्तित्व केवळ दिसण्यात आहे. सत्य नव्हे असे पटवून सांगितले.

परदेशांत सुध्दां अशाप्रकारचे चिंतन चालू आहे. वस्तूमध्ये गुण आहे. गुणांना आधारभूत जशी एक मूळ सत् वस्तु आहे ती म्हणजे ***Substance*** **सब्स्टन्स**. गुण समुदायाचे प्रकटीकरण म्हणजे ***Appearance*** **अपीयरन्स**. असलेले अस्तित्व दिसत नाही. दिसणारे ते नसते. जे असते ते दिसत नाही. जे दिसते ते असत नाही. जे नाही ते दिसते. फुलाचे सब्स्टन्स असते पण दिसत नाही. गुण समुदाय असत् ! स्व अस्तित्व रहित. पण ते दिसते.

विज्ञानी सुध्दां हेच सांगतात. टेबल म्हणजे प्रचंड संख्येचा अणू समूह. आपणांला दिसणारे टेबल केवळ भास मात्र. म्हणजे टेबल आहे असे नव्हे. नाही असे ही नव्हे.

पाण्यांत ($H_2$ व O) हैड्रोजन व ऑक्सिजन हे मूळ घटक. ते अणु. अणु म्हणजे शक्ति गोल. ते आहेत. पण त्यांच्या समूहांत दिसणारे 'पाणी' आपल्या अनुभवाला येणारी प्रिय वस्तु. पण त्यांतील असणारी वस्तु केवळ शक्ति. पाणी आहे म्हटले तर आहे. नाही म्हटले तर नाही. शंकराचार्यांनी या जगाला 'मायिक' असे म्हटले आहे.

बसवेश्वर म्हणतात,

*चकोरंगे चंद्रमन उदयद चिंते*
*अंबुजके भानुविन उदयद चिंते*
*भ्रमरंगे परिमळद बंडुंबुव चिंते*
*एनगे नम्म कूडल संगम देवर नेनेवुदे चिंते*

**भावार्थ :** चकोर पक्षी जसा चंद्रोदयाचे चिंतन करतो. कमळाला जसे सूर्यादयाचे चिंतन, भ्रमराला जसे फुलांतील परिमळ सेवनाचे चिंतन तसेच मला माझ्या कूडल संगमदेवाचे स्मरण करण्याचेच चिंतन.

चकोर पक्षी जसा चंद्रोदयाचे चिंतन करतो, अंबुज जसे भानूचे चिंतन करतो तसेच बसवेश्वरांना देवाचे स्मरण करण्याचेच चिंतन. दृष्टांताने सहजपणे स्पष्ट केले आहे.

*हिंडवनगलि हिडिवडेद कुंजर*
*तन्न विंध्यव नेनेवंते नेनेवेनय्या*
*बंधनक्के बंद गिळि*
*तन्न बंधुव नेनेवंते नेनेवेनय्या*
*कंद नीनित्त 'बा' एंदु*
*नीवु निम्मंदव तोरय्या चन्नमल्लिकार्जुना*

**– अक्कमहादेवी**

आपल्या कळपासून ताटातूट होऊन बंधनांत सांपडलेला हत्ती जसा आपल्या अरण्याची, पर्वताची सतत आठवण काढतो, पिंजऱ्यांत सांपडलेला पोपट जसा आपल्या मुक्त बंधु-बांधवांची आठवण काढतो, तसे मी सतत

तुमचीच आठवण काढते. बाळा इकडे 'ये' म्हणून आपल्यापाशी बोलावून आपले निजरूप दाखवा.

बंधनांत सांपडलेला पोपट आपल्या वनांतील बंधु-बांधवांची आठवण काढतो. सुंदर पिंजऱ्यांत पोपट. त्याला आपण नाना प्रकारची फळे, पाणी देतो. प्रेमाने त्याच्याशी बोलतो. हे सर्व अनुभव घेऊन सुध्दां तो पोपट आपल्या हृदयांत अरण्याची आठवण काढतो. आम्रवृक्षावर बसलेल्या आपल्या बंधु-बांधवांची आठवण काढतो. तसेंच अक्कमहादेवी शरण समूहाच्या प्रेमपिंजऱ्यांत राहूनही चेन्नमल्लिकार्जुन देवाची आठवण काढत होती.

दृष्टांताचा वापर केला नसता तर प्रभावीपणाने तो भाव कदाचित मांडतां आला नसता. बसवण्णांची भाव-तीव्रता आपणांस समजली नसती. म्हणूनच आध्यात्मिक साहित्यांत दृष्टांत पेरण्याचा प्रघात सुरू झाला. अत्यंत परिणामकारक रीतीने या दृष्टांतांचा प्रयोग केला गेला. संतांच्या अत्यंत सूक्ष्म भावना-विचारांना स्पष्टपणें मांडणें दृष्टांतामुळे सोपे झाले.

भगवंत म्हणजे काय ? जीव म्हणजे काय ? याचे चित्रण करण्यासाठी उपनिषदांत एक सुंदर दृष्टांत आहे.

*द्वा सुपर्ण सयुजा सखाया*
*समानं वृक्षं परिषस्वजाते*
*तयोरेकः पिप्पलं स्वाद्व*
*तन्यश्नन्नन्यो अभिचाकशीति (मुं. ।। १,३-४)*

चार ओळींतच जगत्, जीव, ईश व त्यांची स्थिती अद्‌भुतपणें रेखाटले आहे. येवढाच विषय समजावून सांगायला कदाचित एक मोठा ग्रंथ लिहावा

लागला असता. पण चारच ओळींत दृष्टांतांच्या आधारे प्रभावीपणे हा विषय मांडला गेला.

एक वृक्ष, फळांनी लगडलेला, विशाल असा. त्या वृक्षांत एक पक्षी बसला आहे. तो पक्षी ज्या शाखेवर बसला आहे, त्याच्या खालच्या शाखेवर आणखी एक पक्षी बसला आहे. हा पक्षी फळे खातो आहे. वरच्या शाखेवरील पक्षी खात कांही नाही. फक्त प्रकाश टाकतो आहे. त्या पक्षाच्या प्रकाशांत वृक्ष दिसतो. त्या वृक्षावरील फळे दिसतात. खालच्या शाखेवरील पक्षी दिसतो. तो वरच्या शाखेवरील पक्षाच्या प्रकाशांत फळे खाण्यांत मग्न झाला आहे. या दोन्ही पक्षांमध्ये मित्रत्वाचे संबंध ! एकमेकांना सोडून न राहण्या इतकी गाढ मैत्रि. दोन्ही एकत्रच असतात. पण दोहोंचा स्वभाव भिन्न. वरच्या फांदीवरील पक्षी प्रकाश देतो. खालच्या फांदीवरील पक्षी फळे खाण्यांत मग्न. दोन्ही पक्षांनी एकाच वृक्षांत आश्रय घेतला आहे. त्या वृक्षावरील फळे गोड, तो पक्षी स्वत:लाच विसरून फळे खाण्यांत मग्न झालेला. तर मग त्या फळांची गोडी केवढी असेल ! फळे खाण्यांत पक्षी देहभान विसरून गेला आहे.

वरच्या शाखेवरील पक्षाला खालच्या शाखेवरील फळे खाणारा पक्षी दिसतो. त्या फळांचा रस चोखून आनंद अनुभवणारा पक्षी दिसतो आहे. पण त्या पक्षाप्रमाणे स्वत: मात्र त्या फळांच्या मोहांत अडकलेला नाही. ही त्या पक्षाची विशेषता.

सामान्यपणे भोग दृश्यें पाहून मनाला त्यांचा मोह पडतो. रस्त्यावरून जाणारा वृध्द भिंतीवरील शृंगार रस चित्र पाहतो. ते चित्र पाहतांच त्याला पूर्वीचे आठवते. आपण आपली पत्नी, लग्न, मिरवणूक सर्व चित्रे डोळ्यांसमोर सरकत जातात. तो देहभान विसरतो. येथे तो शृंगार प्रत्यक्षांत नाही. भिंतीवरील

निर्जीव चित्र पाहून त्याला या उतारवयांत मोह पडत असेल तर युवकांच्या मनावर किती परिणाम होत असेल ?

येथे दोन पक्षी आहेत. एक पक्षी अत्यंत आनंदाने फळांतील मधुर रस चाखण्यांत मग्न आहे. दुसरा पक्षी वरून पाहतो. खालच्या फांदीवरील पक्षावर प्रकाश टाकतो पण स्वत: त्या फळांवर मोहित होत नाही. केवढा अर्थ भरला आहे या दृष्टांतात.

वरच्या फांदीवरील पक्षाने प्रकाश देऊन कितीही सावधानतेचा इशारा केला तरी तिकडे लक्ष न देतां फळांचा आस्वाद घेतांना देहभान विसरला आहे, खालच्या फांदीवरील पक्षी. आपली पण तीच स्थिती. वयाला ६० वर्षे पूर्ण होऊन गेली तरी जागृत न होण्याइतकी मग्नता संसारांत. जीव पक्षी फळे खाण्यांत मग्न. या गोष्टींचे चिंतन करावे. चिंतन केल्याने ''आपले जीवन कसे आहे ?'' ''दिव्य जीवन कसे असते ?'' याची कल्पना येते. आपण मोहासक्त, उपभोगशील. मोहाचे दास. अन्य विषयांचे चिंतन करायला मुळींच वाव नाही.

भोगमोही पक्षी वीतराग-शोक व्हायचा असेल तर काय केले पाहिजे ? पुढील दोन ओळींत सांगितले आहे. अशा पक्षाने जागे व्हावे. मोहांतून पार पडले पाहिजे. मोहाच्या शोकांतून मुक्त झाले पाहिजे. वीतशोक झाले पाहिजे. तसे व्हायचे असेल तर वरच्या फांदीवरील पक्षाकडे त्याने पहावे. तो ईश. आपल्या सारखा अनीश नव्हे, इकडे लक्ष द्यावे. फळाचा आकार, रंग, रूप याने आपणांस वेड लावले आहे. पण वरच्या फांदीवरील पक्षी फळाच्या प्रभावांत सापडलेला नाही. फळाच्या प्रभावाच्या बाहेर-मुक्त राहणेच ईश. फळाच्या प्रभावात सांपडणे हेच अनीश. तो शोक रहित. आपण शोकशील. याचे चिंतन करावे.

खालच्या फांदीवरील पक्षाने वरच्या फांदीवरील पक्षाला पाहून त्याची महिमा ओळखावी. महिमा म्हणजे सदा प्रकाशणे. सर्व उपभोग्य वस्तु उपलब्ध असतांना सुध्दां त्या वस्तूंकडे लक्ष न देणे हीच महिमा. येथे आजूबाजूला कोणी नाहीत असे समजा. येथे दहा पैशाचे नाणे पडले आहे. ते नाणे उचलून घ्यावेसे वाटते. हा मोह महिमा. हा मोह नसलेले खरे महिमान्वित होत. समस्त राज्य जरी दिले, तरी तिकडे लक्ष न देणे, हीच महिमा स्थिति. हीच विराग महिमा !

वरच्या फांदीवरील पक्षाची ही महिमा ! तो पक्षी केवळ पाहतो. आशा करत नाही. ही महिमा खालच्या फांदीवरील पक्षाने जाणली तर तो वीत-शोक होतो. त्याचा मोह दूर होतो. हेच स्वातंत्र्य. हीच मोह मुक्ति. तो वरच्या फांदीवरला पक्षी उडून जातो. खालच्या फांदीवरील पक्षी उडून जातो. दोन्ही नाहीसे होतात. जे कांही उरते ते अनंत आकाश !

हा एक दृष्टांत. येथे वृक्ष कोणता ? दोन पक्षी कोणते ? फळे ती कसली ? प्रकाश कसला ? बंधन कसले ? मुक्ति कधी ? हे सर्व दृष्टांताच्या पार्श्वभूमीवर चित्रीकरण करून घेणे, हे चिंतन.

हा दृष्टांत पहा. एक वृक्ष खूप फोफावला आहे. त्या वृक्षांत पक्षी बसला आहे. पक्षी हाच जीव. वृक्ष हाच देह. तेच जग. जीवरूपी पक्षी जगांत बसला आहे. या विश्वरूपी भव्य वृक्षावर पक्षी बसला आहे. विशाल अशा महाविश्वांत एक फांदी म्हणजे देह. त्या देहांत एक जीव पक्षी.

भूमि, पाणी, अग्नि, वायु, आकाश, हा विशाल वृक्ष. वृक्ष दहा दिशांत पसरला आहे. त्या वृक्षांत शाखा. असंख्य शाखा. असंख्य देह. त्या प्रत्येक

शाखेंत फळे. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध रूपी फळे. फांद्या फांद्यावर ती फळे खूप खूप लगडली आहेत. डोळे उघडले की पुरे. रूप दिसते. कान दिला तर ध्वनि-शब्द ऐकूं येतो. धरूं जातां मृदुल-मधुर स्पर्श. किती प्रकारचे रस ! किती प्रकारच्या वासना ! यामुळे हे जग रसपूर्ण होय ! त्या वृक्षांतून शब्द, रूप, रस, गंध काढून टाकला तर तो वृक्ष अप्रिय होतो. नीरस होतो. ही पांच फळे रसपूर्ण ! आकर्षक !

रावण सामान्य व्यक्ति नव्हे. महाज्ञानी, विद्वान पंडित. भगवंतालाच प्रसन्न करून घेणारा महा तपस्वी. अशा रावणाला भुरळ पडली रूपाची. वेडा झाला तो. अशा महान तपस्व्याची ही अवस्था तर आमच्या सारख्या पामरांची काय कथा ?

जग रूपी वृक्षांमध्ये अशी ही पांच प्रकारची फळे. या फळांच्या फांदीवर जीवरूपी पक्षी बसला आहे. फळ खातो आहे. पक्षी ज्या दिवशी फांदीवर येऊन बसला, त्याचदिवशी फळे खाण्याला सुरूवात झाली. ज्यादिवशी हा माणूस जगांत आला, खाण्यांत गुंतला. खाण्यांत मग्न झाला. किती मग्न झाला आहे. म्हणजे, वरच्या फांदीवरील पक्षी त्याला दिसत नाही. ''मी कोण ?'' हे त्याला समजले नाही. ''पुरुषः निमग्नः'' त्याला जागे करणे कष्टदायक. येवढा तो या संसारांत बुडून गेला आहे.

बुध्द, महावीर, शंकराचार्य, बसवण्णा, अल्लमप्रभु इत्यादि साधु, संत, ज्ञानी, महात्मे आले त्यांनी याला जागे करण्याचे प्रयत्न केले.

***''उत्तिष्ठत, जाग्रत, प्राप्य वरान् निबोधत !''***

असे म्हणून जाग आणण्याचा प्रयत्न त्यांनी केला.

''उठा, जागे व्हा, डोळे उघडून पहा. उत्तम पुरुषांच्या जवळ जा. ज्ञानियांच्या समीप जा. त्यांचा उपदेश ऐका. जीवनाचा उध्दार करून घ्या.'' असे ते म्हणाले. येवढे महापुरुष येऊन गेले. त्यांनी जाग आणण्याचा प्रयत्न केला. पण आम्ही आपले गाढ झोपलेले. महात्म्यांनी जो उपदेश केला, तो आम्हीं तोंडपाठ केला. अत्यंत अस्खलितपणें आपण व्याख्यान देतो. पण आश्चर्य असे की आम्ही जागे झालोच नाही. झोपेतच आपण बडबडतो आहोत.

एक होता गुरु. त्याचा एक शिष्य होता. दोघेही तीर्थाटनाला निघाले. वाटेत गुरुला तहान लागली. शिष्य पाणी आणायला गेला. खूप दूरवर गेला. एका विहिरीजवळ आला. तेथे एक तरूणी पाणी रहाटाने काढीत होती. शिष्याने पाणी मागितले. तरुणीने दिले. हातपाय धुवून पाणी पिऊन शिष्य तृप्त झाला. विहिरींतल्या पाण्यांत तरूणीचे प्रतिबिंब. तो वेडा झाला. तिच्या मागून तिच्या घरी गेला. आपण गुरुचा शिष्य, आपला गुरु तहानेने व्याकुळ होऊन दूर झाडाखाली बसला आहे; हे तो विसरला. त्या तरुणीच्या बापाला गांठून आपला मनोदय त्याने सांगितले.

शिष्य आतां येईल; आणखी थोड्यावेळाने येईल म्हणून गुरु त्या झाडाखाली वाट पहातच राहिला. वधु पित्याने आपल्या कन्येची अभिलाषा धरून तिच्या पाठोपाठ आलेल्या शिष्याला पाहिले. शिष्याचा सुंदर सतेज देह पाहून त्याला खूप आनंद झाला.

''भगवंतानेच तुला पाठविले. हे घर ही तुझेच ही तरुणीही तुझीच.'' असे सांगून दोघांचे लग्न लावून दिले. संसार सुरू झाला. मुले जन्माला आली. एक दोन नव्हे...!

अजूनही त्याला गुरुची आठवण झाली नाही. गुरु आपला शिष्याची वाट पहातोच आहे. याला जागे करण्यासाठी संत आले, अन गेले. पण त्याला गुरुची आठवण होईना. संसारबंध तुटेना. गुरु वाट पहात होता. शिष्य आतां येईल, मग येईल म्हणून !

गुरु सानिध्यात राहून ज्ञान संपादन केलेल्या विरक्त शिष्याची अवस्था ही, तर मग सामान्य लोकांची अवस्था कशी बरे असेल ? विषयासक्त जनांची अवस्था कशी बरे असेल ?

एकाएकी त्या शिष्याची पत्नी निवर्तली. सुंदर आणि प्रेमळ पत्नी मरून जातांच विरक्ति आली. गुरुला झाडाखाली बसविल्याची आठवण झाली. पळतच तो गुरुकडे गेला. गुरु वाट पहात तेथेच बसला होता. शिष्य कधी ना कधी येईलच या भरवशाने. गुरुचे येवढे प्रेम आपल्या शिष्यावर.

प्रपंचाचे हे विषय उपभोगतांना, संसार करतांना मन इतके मुग्ध, मोहित होऊन जाते. कोठला भगवंत ? कुठला संत ? आपण दुर्जन नव्हे. सज्जनच. शिष्य सुध्दां सज्जनच. जगाचा माया प्रभावच हा.

*''जगव सुत्तिर्पुद्ध निन्नय माये''* — ***महात्मा बसवेश्वर***

''तुझ्या या मायेने जग व्यापून टाकले आहे.''

तर मग काय करतां येणे शक्य आहे ?

विषय फळे चाखतांना शोक उत्पन्न होतो. प्रपंच करतांना थोडी फार संकटे येणारच. पण त्यामुळेच माणूस शोकाकूल होतो. त्याचे शोक-कष्ट दूर करण्यासाठीच हे भगवच्चिंतन. हे व्याकरणाचे चिंतन नव्हे. तर्काचे नव्हे.

आपल्या जीवनाकडे पाहण्याचा हा क्षण. जीवन समृध्द करण्याची ही पध्दत.

वरच्या फांदीवर बसलेला तो पक्षी म्हणजे साक्षी पक्षी. या जीवात्म्याच्या दृष्टीने तो भगवंत (भावगम्य). मी जीव पक्षी; भगवंताची दृष्टि साक्षी पक्षी. तो साक्षी पक्षी, ज्ञानी पक्षी जगावर ज्ञानाचा प्रकाश पसरवितो. फुलां-फळांवर, शब्द-स्पर्शदीनां प्रकाश पसरवितो. अशाप्रकारे प्रकाश पसरविणाऱ्या भगवंतावर शब्द, स्पर्शादींचा प्रभाव नसतो. आपण त्याला सोने नाणे अर्पण केले, तरी भगवंत तिकडे पहात नाही. तुम्ही साधे अन्न अर्पण करा अथवा पंच पक्वान्नांचा नैवेद्य दाखवा. लिंगदेव ते पाहत नाही. जेव्हां हा जीव वर मुख करून त्या साक्षीकडे पाहतो तेव्हां त्याला सगळीकडे पसरलेला भगवंताचा प्रकाश दिसतो. त्या प्रकाशाच्या दर्शनाने जीवनरूपी पक्षाचा मोह नाहीसा होतो. शोक दूर होतो. जीव भाव नाहीसा होतो. त्या जीव कल्पनेबरोबरच ईश कल्पनाही नाहीशी होते. तेव्हां जे कांही राहते तोच भगवंत !



## १६

आपणांस दिसणारे जगत दर्शनाचा विषय. त्यामुळे ते दृश्य. प्रकृतीचा अनंत विस्तार हे जग ! येथे स्थूल वस्तु आहेत. अत्यंत सूक्ष्म वस्तु आहेत. मनुष्याची मति जशी स्थूल वस्तूंचे ग्रहण करते तशीच अति सूक्ष्म वस्तूंचे ग्रहण करते. प्रकृतीचा समस्त विस्तार मानवीय मति जाणूं शकते. मापूं शकते. त्यामुळे हे जग दृश्य ! मतीला हे दृश्य ! ही दृश्य वस्तु आपणांस यथावत दिसली की सत्यदर्शन झाले असा त्याचा अर्थ. वस्तु जशी आहे; तशीच ती दिसली की सत्यदर्शन. डोळ्यांनी-बुध्दींने जेवढे पाहतां येणे शक्य आहे; ते सर्व दृश्य ! अधिगग्य ! अशा गम्य वस्तूंचे ज्ञान गम्यज्ञान. हे ज्ञानच प्रेमा, यथार्थ, सत्यज्ञान.

या प्रकृतीच्या पलीकडील म्हणजे जेथे प्राकृतिक विकार नाहीत, विकास नाहीत, गुणांची व्याप्ति नाही; असे क्षेत्र, अगम्य क्षेत्र. ते अदृश्य. तेथे डोळ्यांना प्रवेश नाही. सामान्य मतीला प्रवेश नाही. ते ऋत, जेथे मतीचा प्रवेश असतो, त्या सत्य वस्तूला 'सत्य' म्हणावे. हे ही सत्यच. तेही सत्यच. पण हे गम्य सत्य; ते अगम्य सत्य. डोळ्यांनी हे अगम्य सत्य जाणतां पाहतां येत नाही. मतीला हे अगम्य सत्य जाणतां येत नाही. इतके शुध्द असे जे सत्य ते ऋत. त्याचे ज्ञान ऋत ज्ञान.

जगाचे ज्ञान सत्यज्ञान. त्याचे परिशीलन, मापन करणें शक्य आहे. पण ऋत ज्ञानाचे परिशीलन शक्य नाही. कारण मापन करण्याचे साधन तेथे नाही. आपल्या देहाचे वजन करतां येते. भावनांचे विवेचन करतां येत नाही. विचार मंथनाचा परामर्श करतां येईल. पण माझे, माझ्या आत्म्याचे तोलन-मापन करतां येत नाही. बीजाचे वजन करतां येईल. बीजामध्यें जे पीक आहे; त्याचे वजन करतां येईल. पण बीजामध्ये असलेली प्राणशक्ति मापतां येत नाही. मापनाला ती प्राणशक्ति गवसत नाही. पण ती प्राणशक्ति नसेल तर बीज अंकुरणार नाही. बीज अंकुरून वृक्ष व्हायचा असेल तर आंत प्राणशक्ति असली पहिजे. त्या प्राणशक्तीचे मापन करतां येत नाही.

जगांतील सर्व वस्तूंचे तोलन करतां येईल, मापन करतां येईल. पाहतां येईल. जाणतां येईल. पण जगाच्या आंत आणि त्या पलीकडे असणारे ऋत (महासत्य) दृष्टि आणि मतीला गम्य नाही. दृष्टि, मति, मन, मौन झाल्यानंतरच अनुमान दृष्टीचे उद्घाटन. त्या दृष्टीला ऋत दर्शन. ते दर्शन घेणारा तो 'ऋषि'.

लोकसत्य जाणणारे ही ऋषीच. पण अलौकिक ऋत अनुभवणारे परम ऋषी. नेत्र व मति यांचा उपयोग न करतां त्यांनी परमसत्य जाणले. आपण भौत ऋषि. ते अभौत ऋषि. त्यांच्यामध्ये व आपणांमध्ये एक भेद आहे. या ऋतचे दर्श घेतलेल्या ऋषींच्या जीवनांत ऋत व्यापलेले असते. अभिव्यक्त झालेले असते. ऋषीच्या डोळ्यांमध्ये ऋत अभिव्यक्त झालेले असते. त्यांच्या वाणीमध्ये अभिव्यक्त होते. कार्यात अभिव्यक्त होते. त्याचे जीवन संत जीवन होते. ऋत दर्शीचे जीवन ऋतमय. तो सत् पूर्ण संत. त्या ऋतमध्यें त्याने स्वतःला निवेदिलेले असते. म्हणून तो शरण, ऋषि, संत ! तो जगामध्ये ऋत ज्ञानाचा प्रसार करतो. त्यामुळे तो गुरु.

ऋत दर्शन झाल्याशिवाय कोणी ऋषि, शरण, गुरु होऊं शकत नाही.

जो ऋषि होतो त्याची वाणीच मंत्र ! त्या ऋत दर्शनाचा प्रभाव, सुगंध त्याच्या वाणीतून प्रकटला तर ते गुरुवचन. तीच शरण वाणी. संत वाणी. ''मातेंबुदुज्योतिर्लिंग !'' वाणी हेच ज्योतिर्लिंग ! (अल्लमप्रभू)

***''करूण रसद कोडिवरिव कटाक्षद परतत्व अरूपुव आलापद वर पुण्यमय शरीरद निराभारी सद्गुरु इरलेन्न मानसदल्लि''***

***– निजगुण शिवयोगी.***

**भावार्थ :** ज्याच्या केवळ कटाक्षाने करूणा रसाचा महापूर येतो, जो परतत्वाचा बोध करतो. त्या पुण्यमय शरीराच्या निराभारी सद्गुरुचे स्मरण नित्य माझ्या मनांत राहू दे !

ऋत दर्शन झालेल्या गुरुचे लक्षण म्हणजे निराभारित्व. त्याच्यावर इहलोकाचा भार नसतो. लोकज्ञानाचा भार नसतो. लोकानुभव रसाचा मोह असत नाही. तेव्हां तो निराभारी होतो. जो खरा ज्ञानी गुरु असतो, त्याचे बोलणे वेगळेच असते. सामान्य गुरुचे बोलणे वेगळे. दोन्हीमध्ये फार मोठा फरक आहे. आकाशांतून पाऊस पडून भूमि ओली झाल्यावर सस्य बहरते. कोरडे आकाश, वाळून गेलेली धरती-जळती धरती, त्यामध्ये पाणी शिंपून-शिंपून पिके काढतो. त्या पिकाची वाढ वेगळीच असते. (धाराकार) मुसळधार पाऊस पडला की जळती भूमि थंड होते. झाडे झुडपे बहरतात. फुले फळे देतात. आकाशांतून वर्षाव झाल्याप्रमाणे महात्मे, साधु, संत, शरण यांची वाणी. भूमंडलावर बरसलेले ज्ञानमय जल. असा वर्षाव झाला की जग शांत होते. पांडित्याचे पाणी नळाच्या पाण्यासारखे ते परिमित अशुध्द, भू-स्पर्शित, लवण मिश्रित.

आकाशातून होणारा वर्षाव स्फटिकाप्रमाणे शुभ्र-स्वच्छ तसेच थोर

महात्म्यांची वाणी मंत्रवाणी, त्यामध्ये अशुध्दतेचे लवण नाही. 'मी' 'माझे' ही अशुध्दता पांडित्याच्या वाणीत.

परमात्मा गोड फळे देतो. गोड गोड द्राक्षे. पक्षी गोड द्राक्षे खाऊन आंनदित होतात. आपण मात्र द्राक्षाचा रस काढून तो कुजवून त्याचे वाईन बनवितो. ते माणसांना आवडते. तशीच पांडित वाणी. ती लोकांना आवडते. कारण त्यांत मीठ-मसाला असतो. 'मी' हा मादक अंश असतो.

आपले एक छोटसे घरकुल असते. एकच दरवाजा. दोन खिडक्या. त्यांतच एक छोटीशी खोली. त्यांत एक छोटासा बिछाना. येवढे असले की आपणांस केवढा आनंद होतो ! त्या इवल्याशा खोलीत आपण झोपलो की किती संतोष असतो. त्याच्या ऐवजी आपले नसलेला असा एक भव्य महाल असेल, तर त्या महालांत झोपण्यात तेवढा आनंद नसतो. रूचि कशामुळे ? ही रूचि 'अहं' 'मम' हे भाव आहेत म्हणून. आकाशांतून वृष्टि होणाऱ्या पर्जन्याप्रमाणे संत मुखाने येणाऱ्या संत वाणीत 'अहं' 'मम' नसतो.

आपल्या सारख्या सामान्यांची वाणी रसहीन. त्यामुळे नशा येईल पण दिव्य आरोग्य लाभणार नाही. पण ज्ञानियांची वाणी ऐकली की आरोग्यमय, आनंदायी ती ! तेच निराभारी गुरु. अहं-ममाचा भार नसलेले ऋषि. त्यांच्या दृष्टींत, हृदयांत कारूण्य रस वाहतो. जगाला परतत्व बोध करायची अदम्य आकांक्षा त्यांना असते.

त्या गुरुचा देह 'वरपुण्यमय' म्हणजे बाह्यांतर शुध्द. त्यांची वाणी ऐकून त्याचे चिंतन करणे हेच भगवच्चिंतन. अल्लमप्रभु हे थोर महात्मे. आकाशायेवढे उत्तुंग तत्व जाणून मुक्त जीवन कंठत होते. निराभारी गुरु अल्लमप्रभु. त्यांचे वचन.

**उदकदोळगे किच्चु हुट्टि सुडुत्तिद्दुद कंडे**
**गगनदमेले मामरन कंडे**
**पक्क विल्लद हक्कि गगन नुंगित्त कंडे.**
**गुहेश्वरा !**

**भावार्थ :** पाण्यात आग पेटलेली मी पाहिली. गगनांत आम्रवृक्ष पाहिला. पंख नसलेल्या पक्षाने अवकाश गिळलेले पाहिले; गुहेश्वरा !

पाण्यांत आग पेटली. पेटलेल्या आगीने पाण्यांतील सर्व किल्मिषे जाळून टाकली. पाणी हेच चंचल मन. अधोमुख होऊन वाहते पाणी. ऊर्ध्वमुख होऊन पाणी वाहात नाही. तसेच आपले मन सुध्दां हीन विषयांकडे सहज धांवते.

प्रारंभी मन निर्मळच असते. कालांतराने ते हीन विषयांकडे धांव घेऊं लागते. किल्मिषाने भरून जाते. अधिकाअधिक चंचल होते. दुराशा वाढत जातात. हीन विषय मनांत भरू लागतात. या पवित्र मंदिरांत चांगले असे खूपच आहे. मन तिकडे लक्ष देत नाही. येथे जे दोष आहेत, तिकडेच लक्ष जाते. जगांत ज्या ज्या चांगल्या गोष्टी आहेत, तिकडे आपण लक्ष देत नाही. जगांतील सगळी घाण आपल्याकडे भरून घेतो.

जग किती सुंदर आहे ! हिरवीगार वनश्री, झुळुझुळु वाहणारे निर्मळ झरे, आकाशांत स्वच्छंद विहार करणारे पक्षी, पाण्यांत सुळकन सूर मारणारे मासे. यांत वाईट काय आहे ? कोणता प्राणी वाईट आहे ? कोणता पशु दुधांत पाणी मिसळून फसवणूक करतो ? सगळे पशु-पक्षी चांगलेच आहेत. सगळे चांगले असावे असे म्हणणाऱ्या मानवाला सोडून बाकी सगळेच चांगले आहेत.

आपले मन या सुंदर जगाची उपेक्षा करते आणि जेथे जेथे दोष आहेत, घाण आहे, तेच आपल्यांत भरून घेते.

जग अत्यंत भव्य. त्यांत बिघाड निर्माण कराण्याचे सामर्थ्य मानवामध्यें कोठून येईल ? फार तर तो या पृथ्वीवरील हवेंत प्रदूषण करूं शकेल. पाणी घाण करूं शकेल. माणसाच्या संपर्काने स्वच्छ-शीतल जलाने भरलेली स्वर्गंगा आज मलीन होऊन गेलेली आहे. पण माणूस संपूर्ण विश्वाला बिघडवू शकणार नाही. ते भव्य-दिव्य ! निस्सीम. संपूर्ण विश्वाचे शुध्दिकरण करण्याची ताकत तुला कुठली ? जे कांही बिघडले असेल तर ते तुझे मन, तुझे शरीर.

असे दूषित झालेले मन. तेच उदक. त्यांत अग्नि उत्पन्न झाला. चिंतनाचा अग्नि ! वचनाचा अग्नि ! ''उदकांत उद्‌भवलेला अग्नि जळतांना मी पाहिले.'' याचा अर्थ ज्ञानरूपी अग्नीने मन रूपी उदकांतील मालिन्य जाळून टाकले. गुरु वचनाचा अग्नि मनाच्या कोतेपणाला जाळून टाकतो. तेव्हां मन-पण गमावून अ-मन होते. अशी अ-मन स्थिति प्राप्त झाल्यावर त्या अ-मनांत नवी दृष्टी उत्पन्न होते. सत्य-दर्शनाची शक्ति उत्पन्न होते.

'गगनांत आम्रवृक्ष पाहिला.' सत्यदर्शनाची शक्ति प्राप्त झालेल्या दृष्टीला गगनांतील आम्रवृक्ष दिसतो. आम्रवृक्ष, मोठा वृक्ष. गोड फळे देणारा वृक्ष. हे जग म्हणजेच आम्रवृक्ष. हा आम्रवृक्ष कोठे आहे ? गगनांत ! याची मुळे अवकाशांत. म्हणजे या जगाच्या पार्श्वभूमी गगन, अवकाश. देव-अवकाश. त्याचे अस्तित्व रस शोषून हे जग वाढते. हे अल्लमप्रभूने पाहिले. म्हणूनच गगनांत आम्रवृक्ष पाहिला असे ते म्हणतात.

'पंख नसलेल्या पक्षाने अवकाशाला गिळलेले पाहिले.' अहं-मम रूपी दोन पंख गळले. तेव्हा निरऽहं-निर्मम झालेला जीव लौकिक मंडळाच्या

पलीकडे अनंतात समरस होतो. मुक्त होतो. तो अवकाशांत आणि त्याच्यामध्ये अवकाश. ''अवकाशाने अवकाश गिळले.''

अशा अमूल्य वचनांचे चिंतन करणें हेच भगवच्चिंतन. ''मी असा, मी तसा.'' हा भाव असेल तर शुध्द आणि फळप्रद चिंतन होत नाही. ते विचार मंथन होईल पण अनुभाव-चिंतन होत नाही.

एक होतं झाड. झाडाखाली झरा. यात्रिकाला तहान लागली होती. पाणी वहात होतं. तोंडात चुना तंबाखु-पान. न थुंकता, तोंड न धुतां पाणी प्यायला. बेचव कडू पाणी. ''पाणी बिघडले आहे.'' तो म्हणाला. तेव्हा झरा म्हणाला, ''मानवा रे ! घाण तुझ्या तोंडात आहे. थूंकून टाक. चूळ भर. मग तुला समजेल मी कसा आहे ते !''

साधु संतांची वाणी-शरण वाणी स्वच्छ-मधुर. त्यांची रूचि-अनुभवायची असेल, तर आपले हृदय स्वच्छ झाले पाहिजे. आपण जे जे तोंडात चघळतो, पर धन, पर स्त्री, देश-कोष. सर्व कांही. ते सर्व थुंकून चूळ भरली पाहिजे. त्यानंतरच संत-शरण वचनामृताची गोडी कळते. तेव्हांच भगवच्चिंतन !



## ❧ १७ ❧

वस्तूच्या गुण लक्षणांना मनांत चित्रण करणें, मनाला त्या लक्षणार्थांत विकसित करणे-पसरविणे म्हणजेच चिंतन. त्याने मन विशाल होते. मनांत आनंद भरून राहतो. म्हणूनच संत-शरण या चिंतनाला फार मोठे महत्व देतात. संतांनी-शरणांनी रात्रंदिवस भगवंताला आपल्या अंतरंगात-बहिरंगात आळविले. डोळे उघडून जे जे पाहिले त्या सर्वांशी भगवंताच्या अस्तित्वाची सांगड घातली. बाहेर जगाचे वीक्षण, अंतरंगात अनुभव. डोळे ज्याला पाहून संतोष पावतात, मन त्यांचे चिंतन करून सुखी होते. हाच अनुभव !

मरूळ शंकर देव दूरदेशाहून कल्याणला आले. कल्याण नगरांत अनुभव मटपांत अनेक वर्षे त्यांची गुप्त साधना सुरू होती. चोरामध्ये सुध्दां देवाचे रूप पाहणारा सम्यक्ज्ञानी बसवेश्वर. पण त्याला सुध्दां मरूळ शंकर देवाचे महत्व समजले नव्हते. येवढे ते गुप्त-भक्त. आत्माराम ! स्वलीलानंद ! महाप्रसादि ! त्यांनी ऐकलेले ते लिंग-प्रसाद ! पाहिलेले ते सर्व शिवलिंग प्रसाद. रूचि घेतलेले ते सर्व गुरुलिंग प्रसाद, आघ्राणलेले ते सर्व आचार लिंग प्रसाद !

आपण सद्गुरुंच्या दर्शनास जातो. फळें अर्पण करतो. गुरु महाराज त्या फळांना स्पर्श करून आपणांस प्रसाद देतात. तेव्हा ते फळ सामान्य फळ

नसते. तो सद्‌गुरु महाराजांचा प्रसाद असतो. आपण जेंव्हा फळ विकत घेतले तेव्हां ते आपले असते. सद्‌गुरुला अर्पण केल्यानंतर ते गुरुचे-देवाचे. त्यांनी आपणांस दिलेले फळ म्हणजे केवळ फळ नूसन तो प्रसाद होय. येथे भाव बदलला. दृष्टि बदलली.

मरूळ शंकर देव महाप्रसादी. हे समस्त् जगत् भगवंताचे, या निर्मल भावनेने त्यांनी जगाकडे पाहिले. त्यांचे मन पवित्र ! इंद्रिये पवित्र ! समग्र जीवन पवित्र !

बसवेश्वरांच्या प्रासादांत (महामने) नित्य अन्नसंतर्पण ! जन जेवून उष्ट्या पत्रावळी त्याच ठिकाणी सोडून जात. त्या उष्ट्या पत्रावळी काढून टाकणे, स्वच्छता ठेवणे, हे काम मरूळ शंकर देवांनी आपल्या अंगावर घेतले. प्रसाद भवनांत उरले सुरले अन्न (प्रसाद) सेवन करून ते महाप्रसादी झाले. अल्लमप्रभुसारख्या वैराग्य चक्रवर्ती-परमज्ञानी, दिव्य दृष्टीच्या महात्म्याने मरूळ शंकर देवांची गुप्त भक्ति ओळखली आणि त्यांनी मरूळ शंकर देवांना वंदन केले. मरूळ शंकर देवांना सदा देवाचे ध्यान. उठतां, बसतां, चालतां, बोलतां देव-भाव. आपणांस सदा-प्रपंचभाव !

पवित्र जीवनासाठी भगवच्चिंतन. जी वस्तु सर्वत्र व्यापून असते त्या वस्तूचे चिंतन करावे. अल्पस्थळांत असणाऱ्या वस्तूंचे चिंतन केल्याने तृष्णा वाढते. मन असमाधानी होते.

*''नाल्पे सुखमस्ति योवै भूमा तत् सुखं''*

''अल्पामध्ये सुख नाही. भूमामध्यें सुख !''

हा सनत्कुमारांचा उपदेश नारद महर्षींना !

नारद महर्षींनी सुखाची आशा केली. समाधान हवे होते. त्यांना. जगाच्या सर्व ज्ञानांचे त्यांनी संपादन केले होते. स्वर्ग, मर्त्य, पाताळांत त्यांचा संचार होता. त्यांचा अनुभव अपार ! अशा नारद महर्षींना समाधान हवे होते. ते स्वर्गांत लाभले नाही. भूलोकांत समाधान आढळले नाही. अधोलोकांत सुध्दा ते नव्हतेच. कितीही संचार केला तरी समाधान नव्हते. सनत्कुमार ऋषींनी नारदांना सांगितले की,

''तू जे जे पाहिलेस ते सर्व अल्प होते. अत्यंत क्षुद्र ! जे अल्प-क्षुद्र, त्याचा संग्रह केल्याने क्षणिक सुख लाभेल. शाश्वत समाधान लाभणार नाही.''

सुख होणे वेगळे. समाधान लाभणे वेगळे. खाज सुटली की आपण अंग खाजवितो. तेव्हा सुख होते. खाज नसेल तेव्हां आरोग्य आहे, समाधान आहे. सुखाचे खाजविणे दु:खामध्ये परिवर्तित होऊं शकते. समाधान अल्पकालीन नसते ते नित्य असते.

आपण लहान-सहान वस्तु मिळविल्या की आपणांस किंचित सुख होते. पण कांही काळानंतर दु:ख होते. प्रपंच जो प्रारंभी सुखाचा वाटतो, हवासा वाटतो तोच कांही वर्षानंतर नकोसा होतो. ज्या पत्नीच्या मुखदर्शनासाठी राम तळमळत होता, त्याच पत्नीचे मुखदर्शन त्याला नकोसे झाले. गर्भवती सीतामातेचा त्याग करून त्याने तिला अरण्यांत धाडले.

ही केवळ एका रामाची कथा नव्हे. ही सर्वांची कथा. वाल्मिकी ऋषीने सूचकतेने कथा रचली आहे. ही कथा रामाची नव्हे. आपलीच ! प्रारंभी संसार फारच आकर्षक वाटतो. नंतर रामायण ! संसार नकोसा वाटतो. समाधान मिळविण्यासाठी मन धाव घेते. ते समाधान भूमा चिंतन असते.

भूमा म्हणजे अनंत. ज्याच्यामध्ये अन्य कांहीही वेगळे असे ऐकता येत नाही. पाहतां येत नाही. चिंतन करतां येत नाही; ते भूमा. जे तसे नाही ते अल्प. हे फूल अल्प. जगांतील सर्व वस्तू अल्प. तेथे भिन्नतेला वाव आहे. त्या वस्तु एका विशिष्ट स्थानात आहेत. दुसऱ्या स्थानी त्या वस्तु नाहीत. एका काळी आहेत. अन्य काळांत नाहीत.

परमात्मा कसा आहे ? वस्तूंनी तो परिमित नव्हे. देश-काल परिमित नव्हे. भाव परिमित नव्हे. तो खरा भूमा. सर्वव्यापक ! आपण ज्याची पूजा करतो तो देव देश-काल सीमित असेल, तर तो देवच नव्हे ! तो परमात्मा नव्हे ! त्या परमात्म्याला देशाचे बंधन नसावे. देवळाने भगवंताला बांधून ठेवूं नये. तसे बंधन ठेवले, तर भगवंत अल्प होतो. भारतीय देव युरोपांत जाऊ शकत नाही. युरोपियन देव भारतीय मंदिरांत येऊ शकत नाही. घाबरतो तो. कां बरे ? हे देव अल्प आहेत. 'भूमा' देवाला भारत काय अन् युरोप काय ?

एका देशात असून, दुसऱ्या देशांत नसेल तर ते परिमित. नारायणाच्या देवळांत 'शिव' नसतो. असे कांहीजण मानतात. तर शिवालयात नारायण नसतो. असे आणखी कांहीजण मानतात. खरे पाहतां शिव आणि नारायण दोन्ही एकच. तो आमच्या अल्पतेचा मूर्खपणा पाहून हंसत असावा. मनुष्य आपली अल्पता देवावर आरोपित करतो. ज्ञानी संत तसे नव्हेत. ते देवाइतकेच अनंत भावी होत.

श्रेष्ठ संत महात्मे यांची जात कोणती ? त्यांचा देव कोणता ? त्यांची भाषा कोणती ?

*''एम्म शरणरू देश भाषिकरल्ल. देशाभिमानिगळल्ल. देशांतर माडुवरू.''*

**भावार्थ :** आमचे शरण देश-भाषिक नव्हेत. देशाभिमानी नव्हेत. ते देशांतर करतात.

एखाद्या देशाचा म्हणजे प्रांताचा, भाषेचा वा जातीचा अभिमान संत धरत नाहीत. ते सर्वत्र संचार करतात. ते सर्व देशांचे सर्व भाषांचे होत. अशा शरणांना घरांत आणून कड्या कुलपांत बंद करून ठेवले आम्ही. हे संत आमचे ते संत तुमचे असा भेद आम्ही केला.

''जगदगल-मुगिलगल'' जगायेवढा-आकाशा येवढा विस्तार मानणाऱ्या बसवण्णाला आपण संकुचित चौकटींत बांधून ठेवले आहे. कोणताही शरण-संत संकुचित असणे कसे बरे शक्य आहे ? ते सर्व सीमा उल्लंघन करतात. कोणत्याही संकुचित विचारांना त्यांच्या पाशी वाव नाही.

आपण बसवण्णा, शंकराचार्य यांचा आदर करतो. ते आम्हांला प्रिय कां बरे ? ते सर्व संकुचित सीमा उल्लंघन करतात म्हणून. ते 'भूमा' जाणून घेतलेले. कोणत्याही परिमितीला ते सांपडत नाहीत. म्हणून तर अशा महात्म्यांना सारे जग वंदन करते.

सागर पाहिल्यानंतर लहान-सहान तळ्यांचा-डबक्यांचा अभिमान राहात नाही. तळ्यांचा उपयोग कोणी करीत नाहीत असा त्याचा अर्थ नव्हे. विहिरी-तळ्याच्या पाण्याचा उपयोग आपण करतो. पण तेच पाणी श्रेष्ठ. अन्य कोणतेही पाणी कनिष्ठ; असा दुराभिमान कोणी धरत नाही. कारण त्याने सागर पाहिलेला असतो. तसेच भगवंताची इष्टलिंग, इष्टदेव अथवा अन्य कोणत्याही रूपांत आराधना केली तरी हरकत नाही. पण यांचा दुराभिमान मात्र नको.

देव पूर्वी होता. आता नाही. हा जागृत देव. हा अजागृत देव. असे

आपण म्हणतो. देव सुध्दां जागृत आणि अजागृत ! किती चुकीची समजूत आपली. किती दूषित दृष्टी ! असे कां बरे ? आपण सत्य चिंतन केले नाही. आपल्या जीवनांत आपण जे अनुभवतो ते ते देवाला सुध्दा लागू होते. अशी आपली समजूत. आम्हाला मिति आहे. देवाला सुध्दा मिति घालण्याचा आपण प्रयत्न करतो.

देव विच्छिन्न झाला. भग्न झाला. फुटून गेला. अशी भाषा आपण करतो. देव कधीतरी नाश पावेल कां ? फुटणाऱ्या वस्तूमध्ये राहून तो फुटून-तुटून जाईल कां ? पूर्वी असून आतां नसेल काय ? हे सर्व आपले अज्ञान.

देव जसा देश-काल परिमित नव्हे तसा तो वस्तु परिमित नव्हे. देव या वस्तूमध्यें आहे. त्या वस्तूमध्ये नाही असे आपण म्हणतो. सुंदर शिल्पांत कोरलेल्या मूर्तीत देव नाही असे समजून अनेक धार्मिक विधि करून त्यांत प्राण प्रतिष्ठापना करतो. दगडांत मूर्ति कोरण्याआधी सुध्दा देव होताच. मूर्ति कोरल्यानंतरही होता. आता स्वामी महाराजांनी हात लावतांच आपल्या भावनेंत तेथे दिसूं लागला. आधी पाहिल्यावर तो तेथे दिसला नाही. सुंदर मूर्ति कोरल्यानंतर सुध्दां देव दिसला नाही. महात्म्यांच्या स्पर्शानि तेथे देवाचे प्राण प्रतिष्ठित झाले असे आपण समजतो. खरे पाहता त्या दगडांत सुध्दां देव होता. आपल्या डोळ्यांत तो नव्हता. गुरुंनी शक्तिपात केला तो मूर्तिमध्ये नव्हे. आमच्या भावनेमध्ये.

कांही वस्तूंमध्ये देवाचे अस्तित्व अधिक असते. कांही वस्तूंमध्ये कमी, ही कल्पना अतात्विक होय. सर्व वस्तूंमध्ये समानतेने देव आहे. कोणतीही संख्या घ्या. त्यांत एक ही संख्या आहे + १ झाल्यावर ती संख्या दोन होते. १+१+१ झाल्यावर ती तीन होते. कोणतीही संख्या असो त्यांतून एक-एक

वजा करीत गेले की शून्य उरते. विश्वांतील वस्तु संख्येप्रमाणे होत. प्रत्येक संख्येच्या अंतरंगात आदि-अंतामध्ये परब्रह्म. तो भूमा. संख्या म्हणजे एक असे समजणें अल्प होय. ती मूळ प्रकृति. संख्या परिमित. शून्य अपरिमित. तसेच जगत व जगाच्या वस्तु परिमित. देव अपरिच्छिन्न ! अपरिमित !

भाव परिमिती सुध्दां देवाला नाही. कोणताही भाव मनामध्यें प्रकटला तरी त्या भावाच्या अंतरंगात तीच वस्तु भरून असते. 'नाही' या भाषेमध्ये देव आहे. 'आहे' या भाषेंतही देव आहे. नाही असे म्हणतांना सुध्दां अस्तित्व आहे. हे अस्तित्व 'नाही' लाही आधार 'आहे' ला ही आधार. कारण 'नाही' म्हणणे हा सुध्दा भावच. 'आहे' म्हणणे हा सुध्दा भावच. भावाला अस्तित्व आहे. ते अस्तित्वच देव होय. जी वस्तु भाव परिमित ती देव नव्हे. पुरुष भावाने देव मित झाला तर स्त्री देव नव्हे. स्त्री भावाने देव मित झाला तर पुरुष देव नव्हे. खरा देव भाव-मित नव्हे. तो स्त्री भावनेलाही आधार. पुरुष भावनेलाही आधार. भाव परिच्छिन्नता त्याच्या ठिकाणी नाही.

अशाप्रकारे चार परिच्छिन्नता काढून टाकल्यानंतर जे कांही शिल्लक राहते तोच देव. या चार परिच्छिन्नता घातल्यानंतर जे कांही दिसते तेच जगत् ! हे अल्प. ते भूमा ! या अल्पामध्ये असलेल्या 'भूमा' चे चिंतन करावे. बंधु बांधवांच्या समवेत आपणांस जीवन कंठायचे आहे. वस्तूंच्या संचयाच्यामध्ये आपले जीवन गुंतवायचे आहे. पण अंतरंगात आणि दृष्टिमध्ये एक वस्तु स्पष्टपणे असावी. ती म्हणजे 'भूमा' ! अशाप्रकारे दृष्टीमध्ये 'भूमा' असणे हेच भगवच्चिंतन. असे चिंतन केले तर आपणांत व तुमच्यांत कांहीच फरक-तूं-मी फरक राहणार नाही. जातिभेद, लिंगभेद असणार नाही.

मी पुरुष नव्हे, मी स्त्री नव्हे. माझ्या पुरता 'मी'. अंतरंगात पाहिले

असतां तेथे पुरुष नाही. स्त्री नाही. जेव्हा देहाचे भान आले तेव्हां पुरुष भाव आला. स्त्री भाव आला. देहाची कल्पना सोडून उरलेला 'मी'. त्याला लिंग नाही. स्त्री असो, पुरुष असो ते सर्व व्यावाहारिक भेद. पारमार्थिक नव्हे.

'भूमा' चिंतन केल्याने आपण निश्चल, निश्चिंत होतो. क्षुल्लक घटनांविषयीं डोक्याला ताप देत नाही. बाह्य जगताच्या द्वंद्वांचा सुख-दुःखांचा अनुभव आपण घेतो. पण ते सर्व वरवरचे. अंतरंगी मात्र प्रशांत. बाहेर जगत्, आंत देव.

सौंदर्याला खोली नसते. आपल्या देहावरील चामड्याचे आवरण काढले तर तो देह पाहून कोण बरे मोहित होईल ? तसेच हे जग. ते वर वर सुंदर दिसते. त्याला खोल अस्तित्व नाही. ते दिसण्यापुरते. त्या जगाच्या अंतरंगात घन वस्तु तो 'देव' त्याला पाहिले तर मोहित होण्याचे कांहीच कारण नाही. त्या देवाला पहायचे तर ते चिंतनानेच शक्य आहे.

कोणाचाही प्रपंच कितीही मोठा भासला तरी त्यांत गहनता नसते. येवढे समजले की केवढा आनंद ! राजा महाराजांचा प्रपंच भव्य वाटतो. पण जवळून पाहिले की त्याचीं अल्पता त्यांच्या कमतरता दिसून येतात. बाहेरून कितीही झक पक दिसले तरी आंत किती चिंता ? किती राजे महाराजांनी आत्महत्या केली नाही ? किती श्रीमंतांना वेड लागलेले नाही ? म्हणून बाह्य वैभव पाहून आपण मोहित होऊं नये. प्रापंचिक वैभव म्हणजे ढेकणांनी भरलेले राज सिंहासन ! जो त्याच्यावर बसतो, त्यालाच त्याचा ताप कळतो. पाहणाऱ्याला मात्र तो भव्य-वैभवपूर्ण वाटतो.

हे आपण जाणून घेतले तर जीवन सुसह्य होते: दूरून डोंगर साजरे.

पाहूनच आदंदित व्हावे. आपण ज्या डोंगरावर आहोत, त्याचा त्याग करून मृगजळाच्या मागे धावण्यांत अर्थ नाही. जे जे अल्प आहे, ते सर्व सुख-दुःखाने भरलेलेच. 'भूमा'चे चिंतन करा. आपला भाव तसाच होऊं द्या. त्यामुळे आपणांस शाश्वत समाधान लाभते.



## ॥ १८ ॥

माणसाने सर्व कांही जाणून घ्यावे. दिव्य सत्य दर्शनाची अनुभूति घ्यावी. या दिव्य दर्शनाच्या आशेच्या परिणामाने ऋषि-मुनि झाले. संतांनी, शरणांनी स्वत:ला समर्पण केले याच दिव्य-सत्य दर्शनाच्या अनुभूतीसाठी. असंख्य साधकांनी आपल्या घरादाराचा त्याग केला याच इच्छेच्या पूर्तीसाठी. वस्तूंचा उपभोग घेऊन सुख मिळवावे ही जशी आपली इच्छा, तसेच सत्यानुभव घेण्याची इच्छा साधकांना. आमच्या इच्छा सहज पूर्ण होतात. साधकांच्या इच्छा दीर्घ काळानंतर पूर्ण होतात. याचे कारण असे की, आपल्या मनाला त्या शाश्वत सत्याच्या उंची पर्यंत पोहोचायचे प्रशिक्षण नसते. दुसरे कारण अभ्यासाची कमतरता. शब्द आणि वस्तू यावर अवलंबून कार्य करायची मनाची प्रवृत्ति. कशाचेही सहाय न घेता, मन सत्य प्रज्ञेच्या उंचीवर जाणे कष्टाचे काम !

भूमीवर संचार करताना रेल्वे, कार वगैरे अनेक वाहने सुलभपणे लाभतात. पण अंतरिक्षांत जाण्यासाठी वाहने मिळणे कठिण. त्याहून उंच-पलिकडे जाणे त्याहून अधिक कठिण. आकाशाच्या पलिकडे जाणे आणखी अधिक कठिण. आकाशाच्या पलिकडे जायचे तर अत्यंत कष्टाचे काम. सहाय करणारे कोणीही नसतात. कोणतीही भौतिक वाहने सहायक होत नाहीत. लौकिक साधना करताना अनेकजण मित्र भेटतात. उदा. व्यापाराच्या क्षेत्रात

प्रवेश केला, तर सहाय करणारे अनेकजण भेटतात. शेतीच्या क्षेत्रांत काम करताना अनेकजण सहाय करतात. पण अध्यात्म क्षेत्रांत सहकार्य करणारे फारच विरळ.

सॉक्रेटिस एक महान संत. अथेन्स नगरांतील अनेक तरुणांना सॉक्रिटिसच्या तत्वज्ञानाचे वेड लागले होते. सॉक्रिटिसचे तत्वज्ञान अत्यंत परिणामकारी. त्याचे जीवन अत्यंत साधे, सरळ. अधिक लोभ नाही. दुराशा नाहीत. रागद्वेष नाहीत. छल-कपट नाही. तो एक महात्मा. त्याचे तेजस्वी बोल ऐकायला युवक अत्यंत आतूर असत.

एकदां एक पंडित सॉक्रेटिस जवळ गेला. म्हणाला, ''सॉक्रेटिस महाराज, तुमच्या भोवती इतक्या युवकांचा गराडा पडलेला आहे. हे युवक सत्य चिंतन करतात. अलौकिक विचार करतात. विराग प्रिय झालेत हे ! त्यांना सत्शील बनवायला तुम्हांला केवढा अधिक काळ लागला. किती कष्ट करावे लागले. मी यांना चुटंकीसरशी भोग-प्रवण करूं शकतो. विलास प्रिय करूं शकतो. त्यांना असत्य प्रिय बनवूं शकतो. एकजण सुध्दां तुमच्याकडे फिरकणार नाही असे मी करूं शकतो. तुमचे काय म्हणणे आहे ?''

सॉक्रेटिस म्हणाला, ''युवकांना वाम मार्गाला न्यायला, त्यांचा अध:पात घडवायला, तुझ्यासारख्या पंड्तिाची काय गरज आहे ? डोंगराच्या शिखरावरून मोठा दगड ढकलायला शक्तिवान पैलवानाची गरज काय ? एखाद्या लहान मुलाने जरी दगडाला जरासा धक्का दिला तरी तो आपोआप घरंगळूं लागतो. खाली खाली जाऊं लागतो. तसेच युवकांना वाम मार्गाला लावायला तुझ्यासारख्या पंडिताची आवश्यकता नाही. उगाच कोणीतरी चार गोष्टी सांगितल्या तरी जन बिघडून जातात. बरे युवकांना वाम मार्गाला

लावण्यांत तुझे पौरुष ते कसले ?''

**पराचिखानि व्यतृणत् स्वयंभूः**
**तस्मात् पराङ्पश्यति नांतरात्मन ।।**

देवाने इंद्रियांना बहिर्मुख केले. सांसारिक आवड ही नैसर्गिक. त्यामुळे पतन, अधोगमन फारच सुलभ. उत्थापन, उद्घाटन फार श्रमाचे. सामान्य प्रवृत्तीच्या लोकांना सत्य-प्रवृत्त करण्यासाठी सॉक्रिटिसच पुनः एकदां जन्माला यायला हवा. पतन घडायला एक क्षुल्लक आमिष पुरे.

विश्वमित्र तपोबलाने केवढा उंच गेला. प्रतिसृष्टि निर्माण करण्याचे सामर्थ्य त्याला लाभले. पण निमिषार्धात त्याचे तपोबल नष्ट झाले. अधःपात झाला. नहुष राजाने स्वर्गप्राप्तीसाठी किती कष्ट झेलले. पण सर्प होऊन खाली पडायला एक क्षणभर ही वेळ लागला नाही.

कोणी लग्न करून संसार करायला तयार झाला तर सगळा गांव त्याला सहाय करायला येतो. पण कोणी संसार त्याग करून संन्यास स्वीकार करायला तयार झाला. तर त्याला कोणीही सहाय करत नाहीत. उलट विरोध करतील.

प्रपंच क्षेत्रा व्यतिरिक्त अशा नीतीक्षेत्राला नेणारे फारच थोडे जन. धर्मक्षेत्राला नेणारे आणखी कमी. तत्वक्षेत्राकडे नेणारे विरळच. तत्वज्ञानाची अनुभूति शक्ति प्राप्त करून देणारे फारच विरळ ! सत्यक्षेत्रात प्रवेश करूं इच्छिणाऱ्यांना विरोध आणि अडथळे फार. शंकराचार्य कोणालाही न सांगता घर सोडून गेले. बुध्दाने सर्वजण झोपेत असलेली रात्रीची वेळ निवडली. कां बरे ? कदाचित त्याचा निश्चय डळमळता असता ? की त्याच्या आप्तगणांनी फार मोठा विरोध केला असता ? सत्य शोधन करायचे काम

सोपे नव्हे. कोठेतरी क्वचित एकदा गुरु, वीर, ज्ञानी लाभला तर ते साधकाचे भाग्य समजावे. साधकाला सिध्दिमार्गक्रमण करायला आलंबने म्हणजे सहायक साधने आवश्यक. आलंबन आवश्यक.

आलंबनांत प्रामुख्याने दोन प्रकार. एक रूप. दुसरे शब्द. रूपाचा अवलंब करून मन एकाग्र करतां येते. तसेच शब्दाचा अवलंब करून मन देव क्षेत्राकडे प्रवेश करते. आपण सुध्दां भगवच्चिंतनासाठी शब्दावलंबन विधान उपयोग करतो आहोत.

पवित्र शब्द ऐकून त्या शब्दांच्या अर्थाचा मागोवा घेत प्रगती केली तर मन सहजपणे देवक्षेत्रांत प्रवेश करते. श्रवणाख्य समाधि स्थिति लाभते. प्रवचन म्हणजे शब्दालंबन विधान. मन इकडे तिकडे न जातां एक तासभर शब्द प्रवाहाबरोबर वाहात जाते. तो प्रवाह तत्वक्षेत्रांत समावेश झाला तर ऐकणारे मन सुध्दां तेथे समरस होते. तसे आपण इतर वेळी ध्यानस्थ बसलो तरी ती तन्मयता येत नाही. ध्यानावस्थेला शब्द फारच सहकारी होत. शब्दांप्रमाणेच 'लिंग' अथवा देव प्रतिमा इत्यादि, 'रूप' साधनेला समर्थ सहकारी होत. शिवशरण इष्टलिंगाच्या दर्शनांत तन्मय होत असत.

उरिंलिंग पेद्दि हा उरिंलिंग देवाचा शिष्य. तो आधी चोर होता. त्याला कसलेच संस्कार नव्हते. धर्म, नीति, तत्व, शास्त्र कशाचा सुध्दा त्याल गंध नव्हता. असा तो उरिंलिंग पेद्दि चोरी करण्याच्या उद्देशाने तो उरिंलिंग देवांच्या घरी रात्री येतो. उरिंलिंग देव शिवयोग साधनेत मग्न असतात. पेद्दि आडोशाला उभा राहून पाहतो. उरिंलिंग देवांची ती अवस्था, मुखावरले ते तेज, करस्थळांतील लिंगावर स्थिर झालेली त्यांची दृष्टि, हे सर्व पाहून पेद्दिच्या मनांत परिवर्तन होते. गुरुमहाराज ज्या वस्तूला तळहातांत ठेवून येवढी साधना

करीत आहेत, दृष्टि एकाग्र करून आहेत, त्यांतच मग्न झाले आहेत, ती वस्तू आपण सुध्दा मिळवायचीच असा निर्धार करतो. चोर खाली उतरून येतो. गुप्त सेवा करतो. कालांतराने गुरु माऊली त्याला इष्टलिंग प्रदान करतात. पेद्दि लिंगपूजा-अनुष्ठान करतो. व सहज समाधि स्थिती प्राप्त करून घेतो. त्याचे एक वचन पाहू या !

***त्वं पदवे अंगवेंदु अरुहिद***
***तत् पदवे लिंगवेंदु अरुहिद***
***असि पदवे प्राणवेंदु अरुहिद गुरु***
***अंगवे लिंगवेंदु लिगंवे अगंवेंदु***
***अंगवे लिगंवेरडु समरस प्राण वेदुं अरूहि***
***इष्टलिंग वन्नित्तु दृष्टि लिंगवेंदु आदेश कोट्ट***
***आ दृष्टिलिंग बळिसी नानीनेल्लवनु बयलोळगे बिट्टु***
***बट्ट बयलागि होदे !***
***उरिलिंग पेद्दि प्रिय विश्वेश्वरा !***

**भावार्थ :** त्वं पद हेच अंग असा उपदेश गुरुनी केला. तत् पद हेच लिंग असा उपदेश केला. असि पद हेच प्राण असा गुरुने उपदेश केला. अंग हेच लिंग, लिंग हेच अंग. अंगलिंग दोन्ही समरस प्राण असा उपदेश करून इष्टलिंग, देऊन दृष्टि लिंग हा आदेश दिला. त्या दृष्टि लिंगाचा अवलंब करून मी-तू हे सर्व अवकाशांत सोडून मी सुध्दां अवकाशांत समरस होऊन गेलो. शून्यांत एक झालो उरिलिंग पेद्दी प्रिय विश्वेश्वरा !

इष्ट लिंग देऊन गुरुंनी, 'हे दृष्टि लिंग' असा उपदेश केला. हे रूप आलंबन. इष्टलिंगाचे नेत्रानुसंधान करून त्या इष्टलिंगाला विसरून अदृश्य

देवाकडे लक्ष द्यावे. त्या निर्गुण निराकार देवाकडे प्रवाहित व्हावे असा त्यांनी उपदेश दिला. लिंग म्हणजे विश्वचेतन तो तत् पदाचा अर्थ. अंग म्हणजे व्यष्टि चेतन. तो त्वं पदाचा अर्थ. अंग हेच लिंग असा उपदेश गुरुंनी केला. ते तत्व भावगम्य व्हावे म्हणून दृष्टि लिंग दाखविले. दिसणारे एक रूप तळहातांत ठेवून. गुरुंनी सांगितले हे दृष्टि लिंग ! तू याचे अनुसंधान करावे ! अदृष्य अशा अवकाशांत-शून्यांत समरस व्हावे. असा आदेश त्यांनी दिला.

दृष्टिलिंगाची अर्चना करून उरिलिंग पेद्दीने अंग-लिंग सामरस्य प्राप्त केले. शेवटी तो महाशून्यांत विलीन झाला. त्या अवस्थेचा अनुभव घ्यायला ते रूप. हे इष्टलिंग हे प्रतीक, सहायक झाले. लोकव्यवहारात सुध्दा प्रतीकांचा पाऊलो पावली उपयोग करून घेतो. उदा. फुलाचा हार. तो गौरवाचा, प्रेमाचा, भक्तीचा संकेत, प्रतीक.

जगातील सर्व धर्म प्रतीकांचा उपयोग करतात. डोळ्यांनी दिसणाऱ्या कोणत्यातरी एकाद्या वस्तूचा स्वीकार करतात. त्याच्या मार्फत भक्त आपली भावना व्यक्त करतो. तत्वाची परिकल्पना करतो. अदृश्य-अगम्य सत्याशी तद्रूप होतो.

**''येषां भूतानां पृथिवी रस: ।''**

'भूमंडल ! याचे सार सर्वस्व म्हणजे पाणी. भूमंडलाच्या समस्त वस्तूंचे सार म्हणजेच पाणी. पाण्याचे सार म्हणजे 'ओषधय:', सस्य संपत्ति. या सस्याचे सार म्हणजेच देह. या देहाचे सार म्हणजे वाणी. वाणीचे सार सत्य-ऋत.

भूमि-भूमीपासून पाणी. पाण्यापासून सस्य. सस्यापासून देह, देहांतून

वाणी प्रकटली त्या वाणी मागे सत्य. त्या सत्याच्या अनुभूतीमध्यें साम. साम म्हणजे संतोष. सामाचा महा प्रवाह म्हणजे समाधान ! भव्य आनंद ! अशा आनंदानुभूतीध्यें डुंबणाऱ्या, रमणाऱ्या महानुभावाच्या मुखांतून जो उद्‌गार निघतो, तो ॐकार होय. सहजपणे उमटणारा तो ॐकार आत्म्यापासून आकाशाला, आकाशापासून वायूला, वायूपासून अग्नीला, अग्नीपासून जलास. जलापासून भूमीला, भूमीपासून सस्याला हा मूळ चेतन ॐकार नाद उतरला. तेथून तो देहाला-वाणीला प्राप्त होऊन, ॐकार होऊन प्रकटला. अशारीतीने ॐकार विश्वव्यापक होय. विश्वांत धुमणारा दिव्य ॐकार निनाद हा. विश्वाच्या कणाकणांतून ॐकार भरून राहिला आहे.

ॐकार गान रूप, गीत रूप, तो पवित्र उद्‌गीथ. सत्यानुभवाचे व्यक्तरूप ! वरून वाहात आला तर तो ॐनाद. खालून वर आला. तर तो उद्‌गीथ ! उगमाकडे धावणारी ध्वनि, दिव्यनाद, पवित्र मंत्र ! पावन संकेत ! कोणताही मंत्र असला तरी सर्व मंत्रांना ॐकार हीच मूळ ध्वनि ! सर्व प्रथम उद्‌गाराची ध्वनि ती ! ती ध्वनि कोणी निर्माण केली नाही. सहजपणे विश्वांत प्रकटली ती. अशा उद्‌गीथाची उपासना करावी. कशी ? तीन प्रकारे.

पहिली पध्दत प्राणरूप उद्‌गीथ उपासना. या जगांत कोट्यावधी जीव आहेत. प्रत्येक जीवाच्या देहामध्ये स्पंदन आहे. अद्‌भुत असे प्राण स्पंदन. हे प्राण स्पंदन सर्व प्राण्यांच्यामध्ये समान रूपाने आहे. लहान सहान किडा मुंगी यांमध्ये जे प्राण स्पंदन आहे तेच प्राण स्पंदन हत्ती सारख्या प्रचंड देहांत आहे. आपल्या देहातही तेच आहे. समस्त विश्वांतही आहे ! हे स्पंदन जाणून घ्यावे. जीव जंतूंना पाहतांच या स्पंदनाचे स्मरण व्हावे. ही प्राणोद्‌गीथ साधना. प्राण स्पंदनानुभव विधान. हृदयाच्या ठोक्यामध्ये देह चलनामध्ये, त्याच्या कार्य समूहामध्ये प्राणरूप प्रणव निनाद-ऐकावा.

दुसरी समष्टि भौत उद्गीथ साधना. उंच पर्वत शिखरावर जाऊन सभोवती पहा. क्षितिज, उषा, रवि, आकाश, हिरवळ, सौंदर्यराशी, हे सर्व सूर्याच्या प्रकाशाचेच रूप. सूर्य किरणांचे सौंदर्य. हेच उद्गीथ प्रकाश-प्रणव. हे प्रकाश प्रणव पाहणे. प्रवणाचे सौंदर्य, स्पंदन अनुभवणे हीच ती साधना. अरूणोदय, चांदणे, नक्षत्रांचे चमकणे हे सर्व विश्वगानच होय. प्रभातकाळी सूर्योदयाचे सौंदर्य-रात्री चंद्राच्या शीतल चंद्रकिरणांचे सौंदर्य अनुभवणे हीच भौत उद्गीथ उपासना. विश्वामध्यें निनाद करणारी प्रणवोपासना. ऋषीनी हा अनुभव घेतला. त्यांच्या हृदयांतून उत्स्फूर्तपणे गान स्फुरले. हे गानच 'साम' गान. कोणीही विश्व सौंदर्याच्या प्रभावाने गाऊ लागला की ती 'साम' संहिताच होय.

तिसरे आध्यात्मिक उद्गीथ ! बालकांच्या डोळ्यांतील कांति, मुखावरील प्रसन्नता, संत, शरण, विद्वानांच्या पवित्र हृदयांतून, देहातून वाहणारी शांति अनुभवावी. हेच प्रणव, अशी भावना करावी. हेच आध्यात्मिक उद्गीथ ! आपणांमध्ये बुध्दि आहे. विचार आहेत. प्रज्ञा आहे. अस्तित्वाची जाणीव आहे. हा सर्व त्या प्रणवाचाच निनाद आहे; असे अनुभवणे हेच उद्गीथ !

आपली संतोषदायक वाणी, रसपूर्ण भावना, प्रकाशक विचार या सर्वांमध्ये प्रणव ध्वनि ओळखणे. ही प्रणव ध्वनि ऐकून हर्षमग्न होणे, हीच आध्यात्मिक उद्गीथ साधना. ही तीन प्रकारची; शब्दालंबन, ध्वन्यालंबन, पवित्र साधना ! हेच भगवच्चिंतन होय.



# १९

या जगामध्यें जितक्या व्यक्ति-तितक्या प्रवृत्ति. तितकेच दृष्टिकोन. दृष्टिकोन भिन्न भिन्न असल्यामुळे, एकाच वस्तूचे दर्शन भिन्न भिन्न होऊन दिसते. वस्तूचे दर्शन भिन्न-भिन्न वाटते. एक व्यक्ति एखाद्याला चांगली वाटते तर दुसऱ्याला ती वाईट दिसते. आपणाला जे वाटते, ते आपल्या दृष्टीने बरोबर असते. दुसऱ्यांना जे वाटते ते त्यांच्या दृष्टिकोनांतून बरोबरच असते. आपापला भाव आपणांस योग्य असाच वाटतो. येवढेच नव्हे तर देश-काल सुध्दा विविध गतीनी गतिमान अशा एका व्यक्तीहून दुसऱ्या व्यक्तीचे भिन्न भिन्न असते. आइनस्टाइनचा सापेक्षवाद याचा पुरस्कार करतो.

एक उंच डोंगर. त्या डोंगराच्या शिखरावर एक माणूस उभा आहे. डोंगराच्या पायथ्याशी एक गाय उभी आहे. शिखरावर उभा असलेला माणूस पायथ्याशी उभ्या असलेल्या गायीला पाहून म्हणतो, ''किती लहान आहे ही गाय !''

पायथ्याशी उभी असलेली गाय शिखरावरील माणसाला पाहून म्हणते, ''किती लहान आहे हा माणूस !''

एकाच्या दृष्टीने दुसरा लहान. माणसाच्या दृष्टीने गाय लहान, गायीच्या दृष्टीने माणूस लहान. हाच सापेक्षवाद ! ज्याला कमी समजते त्याच्या दृष्टीने

मी अधिक जाणकार. माझ्याहून ज्याला अधिक ज्ञान आहे, त्याच्या दृष्टीने मी कमी जाणकार. आपण ज्ञानी कीं अज्ञानी ? याचा निकष लावणे फार कठिण. आपण स्वत:विषयी निश्चितपणे काहीच सांगू शकत नाही. तर मग जगाविषयी निश्चितपणे सांगणे कसे शक्य आहे ? सापेक्ष सिध्दांत आपणांस समजला तर, आपली बरीचशी भ्रांति दूर होते. आपली भाषा समतोल होते. नाहीतर कलह, छल-कपट, मतांधता उसळते.

रामाचा पक्ष धरणारे अनेकजण. रावणाचा पक्ष धरणाऱ्यांची संख्याही कमी आहे, असे नाही. त्रेता युगामध्येंच रामाला देव मानणारे जसे होते तसेच दोषदृष्टीने पाहणारे रजकासारखे लोक ही होते. त्या रजकाच्या अभिप्रायामुळेच रामाने सीतेचा त्याग केला ना ? जनाभिप्राय भिन्न-भिन्न. दोघांचा अभिप्राय अर्ध-अर्ध सत्य. पण ज्यांच्या त्यांच्या दृष्टीने ज्यांचा त्यांचा अभिप्राय पूर्ण सत्याचा होता ना ? जनाभिप्राय असाच असतो. अस्थिर आणि अपूर्ण सत्य. कोणी वंदणारे-तर कोणी निंदक.

लोकांनी पहिल्यांदा नेपोलियनची फारच स्तुती केली. तो हरला. सर्वांनी निंदा केली. महात्मा बसवेश्वरांचे अंतरंग शुध्द. बहिरंग शुध्द. कूडल संगमदेवाचे ते प्रिय भक्त. लाखो शिवशरणांनी बसवेश्वरांची स्तुति केली. त्याच काली त्यांच्या शेजारी बसणाऱ्या मंचण्णाला त्यांचे वागणे आवडले नाही. मंचण्णाच्या दृष्टिने बसवण्णा धर्मद्रोही, पाखंडी, त्याने सतत बसवण्णांची निंदा केली.

सर्व जणांच्या बाबतीत असेच घडते. आपणांस यथार्थतेने समजून घेणारे जन, जेम तेम ! हवं तर तुम्ही घरी जाऊन विचारा. त्यांना कांही हवं असेल तर तुमची फारच सरबराई होते. तुमची फारच स्तुति होते. तुमची

बुध्दिमत्ता, तुमचे वाक्पांडित्य यांची खूपच वाहवा होते. पण प्रसंग आला. तर तुमची खूप निंदा होते. तुमच्या लहान सहान चुका डोंगरा येवढ्या मोठ्या होऊन दिसतात. स्तुति-निंदा करणाऱ्या जनांचे चूक आहे असे नव्हे. तर जन भिन्न भिन्न दृष्टिकोनाने पाहात असतात. उघड्या डोळ्यांनी सूर्याकडे पाहवत नाही इतका तो तेजस्वी पण टेलिस्कोप मधून पाहिले तर त्याच्यावरही डाग दिसतात. जवळ जाऊन पाहिले तर डाग वगैरे काही नसून उष्णतेमधील फरकाने डाग दिसतात. सूर्यासारख्या तेजोराशीमध्ये सुध्दा आपण डाग शोधतो. महात्मा बसवेश्वरांसारख्या महाज्ञानी-महाअनुभावी शरणाला भिन्न दृष्टीकोनातून पाहतो. तर मग आमच्याकडे जगांतील लोकांनी भिन्न-भिन्न दृष्टीने पाहू नये असे म्हटले तर ते कसे शक्य आहे ? साक्षात भगवंताला सुध्दां तो 'एकच' आहे. अशा दृष्टीने पाहणारे अनेकजण. तर तो एक नसून 'अनेक' म्हणणारे कित्येकजण. तो वर आहे असे कांही, जण सांगतात तर तो सर्वत्र भरून राहिला आहे असे कांही लोक सांगतात. तो नाहीच. तो शून्य. असे प्रतिपादन अनेक जण करतात. त्याला जाणून घेतां येत नाही असे कांही जणांनी सांगितले. तर तो सुवेद्य ! असे अनेकांनी सांगितले. कोणते सत्य ? कोणते असत्य ? पाहण्याचे दृष्टिकोन किती बरे !

या दृष्टि वैविध्याची जाणीव अध्यात्म करून देते. त्यामुळें वस्तूचे सहज दर्शन होते. तेव्हा माणूस सर्व धर्म सहिष्णु होतो. तो कोणावरही कटु टीका करत नाही. आइन्स्टाइन सांगतात.

***"When we get the comprehensive vision of the Universe, we change our language; We never make assertions."***

परिमित असले तरी हे विश्व अनंत आहे. माणसाने यथार्थपणे या

विश्वाला जाणून घेतले तर त्याच्या भाषेमध्ये बदल होतो. आग्रहीपणा नाहीसा होतो. 'इदमित्थं' हे असेच आहे, अशी निश्चित भाषा तो वापरीत नाही.

आचार्य शंकर, भगवान बुध्द, श्रेष्ठ तपस्वी महावीर, सर्व शिव शरण ज्ञानी होते. त्यांची भाषा सुध्दां तशीच. वाचेमध्यें औदार्य. माझे म्हणणे तेवढेच सत्य. तुमचे म्हणणे मिथ्या. हा भाव संतांचा नव्हे. सर्वजण सत्यप्रिय असले तरी आपण जे सांगतो तेच सत्य असे प्रतिपादन केले की खंडन इतकेच. म्हणजे ते सत्याचे खंडन करीत नाहीत. तर सत्याविषयी असणाऱ्या आमच्या आंशिक मताचे खंडन करतात.

एकदां एक साधक जगभर संचार करून, जीवनांतील सुख-दुःखांचा अनुभव घेऊन, इति-मिती जाणून महानुभाव झाला. एकदां त्याला सत्यदर्शन घडले. सत्य देवता प्रशांत भावनेने उभी होती. सत्याचे दर्शन घेतल्यानंतर म्हणाला, ''सत्य देवते, तूं किती शुध्द, सात्विक. तुझ्या डोळ्यांत केवढे तेज ! येवढी परिशुध्द असूनही जग भिन्न-भिन्न रूपाने तुझे वर्णन करते. कां बरे ?''

सत्यदेवता म्हणाली, ''ते लोक मला पाहात नाहीत. आपापल्या डोळ्यामध्यें माझे जे प्रतिबिंब पाहतात त्या प्रतिबिंबाचेच ते वर्णन करतात. सरळ माझ्याकडे ते पाहात नाहीत. त्यांच्या डोळ्यांतील प्रतिबिंब म्हणजे मी नव्हे. पण ते प्रतिबिंब म्हणजे 'मी' असा भ्रम त्यांच्या मनांत निर्माण झाला. आपण जे पाहतो ते प्रतिबिंब आहे, असे त्यांना समजले, तर माझे नैजस्वरूप त्यांना पाहता येईल. मी कोणालाही 'पाहिजे' असे नाही. 'नको' असेही नाही. कारण ज्यांना त्यांना सोयीचे सत्य त्यांना हवे. 'मी' त्यांना नको, मी कोणालाही नको असेही नाही. कारण सर्वजण सत्याचा आदर करतात. आपण जे जाणले

ते सत्य आहे. असे सिध्द करायची धडपड करतात. सर्वांनी सत्याला मान्यता दिली आहे. पण 'मला' नाही. मी सत्य हे त्यांना माहित नाही.''

आपण निरामय होऊन आपल्या भावना-आपले दृष्टिकोन यांचा त्याग करून, जे आहे, तसे सहज पाहायला शिकलो तर तेच सत्य-दर्शन. तेच भगवत् दर्शन !

आपले निज स्वरूप जाणायला आम्ही स्वत:चेच परीक्षण करावे. कोण कोण केंव्हा केव्हां भिन्न-भिन्न प्रसंगी आमच्या बद्दल जे भिन्न भिन्न अभिप्राय व्यक्त करतात, त्या सर्वांचा संग्रह केला तर एक महत्वाची गोष्ट आपणांस समजते. ते सर्वजण आमच्या विषयी भिन्न भिन्न, येवढेच नव्हे तर परस्पर विरोधी अभिप्राय सांगतात.

सरकार आमच्याकडे मतदार या दृष्टीने पाहते. तर देश नागरिक म्हणून आम्हांला ओळखतो. जनगणती करणारे एक संख्या या दृष्टीने आपणाकडे पाहतात. समाज आम्हांला ज्या-त्या जातीचा, त्या समुदायाचा असे समजतो. हे सर्व अभिप्राय आपणांसमोर ठेवून आपण कोण ? असा प्रश्न करून परीक्षण केले तर दिग्भ्रांति होते.

''मी कोण ?'' हे कोणीही यथार्थपणे पूर्णपणें जाणूं शकत नाहीत. प्रासंगिकपणे, सापेक्षिकपणें ''मी कोण ?'' हे जग सांगते. पण ''मी कोण ?'' हे कोणालाही समजत नाही. सर्व अभिप्राय वजा करून जे शेवटी सत्य राहते, तोच 'मी'. हेच सत्य. हाच देव. ते आपले स्वरूप. मानवाने केलेल्या ज्या ज्या दैवी कल्पना आहेत त्या सर्व वजा केल्या असतां, जे शिल्लक राहते तोच देव ! घन सत्य ! त्याला योग्य शब्द अवकाश ! शून्य !

'असद्वा इदमग्रे आसीत्, असत् हेच आधी होते.' म्हणजे मी जाणलेले, जाणत असलेले तेव्हां नसते 'न सत् ! ते अ सत् शून्य.'

**नानेंबुद्ध प्रमाण, नीनेंबुद्धु प्रमाण.**
**स्वयवेंबुद्धु प्रमाण, परवेंबुद्धु प्रमाण.**
**प्रमाणेंबुद्धु प्रमाण,**
**गुहेश्वरनेंबुद्धु अप्रमाण !** —**अल्लमप्रभु.**

**भावार्थ :** मी हे प्रमाणं. तूं हे प्रमाण. स्वय हे प्रमाण. पर हे प्रमाण. प्रमाण हे प्रमाण. गुहेश्वर मात्र अप्रमाण.

देव असा आहे-तसा आहे असे आपण सांगू नये. देवाविषयी सांगणे चूक नव्हे. पण आपण जे सांगतो, तेच पूर्ण सत्य असा आग्रह नसावा. जाणण्याची जाणीव घन झाली म्हणजे सत्य देवाचे भान. पण ते शब्दाहून पलीकडले, असत् !

अक्कमहादेवीने देवाला आपला आध्यात्मिक पति मानले. तसे मनोहर वर्णन तिने केले. बाकीच्या लौकिक पतीना चुलीत कोंबले. अल्लमप्रभू त्याच देवाला विश्व-विराट्‌रूपाने पाहतात.

**गगनवे गुंडिगे, आकाशवे अग्घवणि**
**सूर्य चंद्र रिब्बरू पुष्प**
**ब्रह्म धूप, विष्णूदीप रूद्रनोगर.**
**इद्धु गुहेश्वरन पूजे.** – **अल्लमप्रभू**

**भावार्थ :** गगन हाच गुंडा. आकाश हाच अभिषेक. ब्रह्म हेच धूप, विष्णू-दीप, रूद्र नैवेद्य. ही गुहेश्वराची पूजा.

अक्कमहादेवी आणि अल्लमप्रभु यांची देवाविषयी कल्पना कितीही भिन्न भिन्न असली तरी त्यांनी आपली कल्पना खरी असा दुराग्रह धरला नाही. परस्परांना दूषण दिले नाही. ते ज्ञानी होते.

आमचे तसे नाही. माझ्या दृष्टीने मला जसे दिसले किंवा वाटले, तसे तुम्हांला वाटले नाही, तर तुम्ही अज्ञानी. तुम्हाला जसे वाटले तसे मला वाटले नाही तर तुमच्या दृष्टीने मी अज्ञानी. त्यामुळें कलह. संघर्ष. संत अन्योन्य असतात. आपण मात्र त्यांच्या नांवाने एकेक समूह बांधून भांडत राहतो. 'अक्कमहादेवीचे म्हणणे खरे अल्लमप्रभूचे खोटे. अल्लमप्रभूचे म्हणणे खरे. अक्कमहादेवीचे खोटे असा आग्रह धरून आपण भांडत राहतो. त्या संतांच्या दृष्टीने ते परस्परांचे स्नेही. आमच्या दृष्टीने ते परस्पर विरोधी. ते परस्परांना वंदन करतात. आपण मात्र एकजण ज्ञानी दुसरा अज्ञानी असा वाद करतो. ज्ञान येईपर्यंत, सत्य-दर्शन होईपर्यंत हे चालणारच. भगवच्चिंतन आपणांस विश्वदृष्टि देते.

चिंतन हे असे करावे. माझी दृष्टि सोडून, तुमची दृष्टिं सोडून चिंतन करावे. श्रेष्ठ आचार्य, तत्वज्ञानी, तत्वदर्शी, त्या सर्वांचा दृष्टिकोन सोडून त्यांनी निर्देश केलेल्या भगवंताकडे ध्यान द्यावे.

असे भगवच्चिंतन सुरु होते. तुम्ही कोणाचाही उपदेश स्वीकार करा. शंकर, बसव, मध्व, सॉक्रिटीस कोणीही असो, पण अंतिम सत्य विसरू नका.

अल्लमप्रभु आपल्या मनाला उपदेश करतात. गोंधळांत पडलेले मन तर्क वितर्कांच्या भोवऱ्यांत सांपडलेले. म्हणूनच त्या मनाला आदेश. उपदेश. ''तूं इकडे तिकडे कां धावतोस ? विविध कल्पना जालांत का अडकतोस ? तूं स्वतःचे निजरूप जाणून घे. ती केवळ ज्योति. परिपूर्णता. अखंड प्रकाश. तेथे थांब. चिंतन कर. निश्चलता आपोआप लाभते.''

केवळ ग्रंथ. वाचून, उपदेश ऐकून मन स्थिर होत नाही. ते चंचल. सदा

असमाधानी. तळमळ. आपल्या मूळ तत्व विस्ताराला जाणून घेतले तर मन शांत होते. स्थिर राहते. सुज्ञानोदय होतो. दिव्य प्रकाश. भगवच्चिंतनाचे ध्येयच ते.

संत ज्या दृष्टीने पाहतात, ते आपण जाणून घेतले पाहिजे. जगांतील भिन्न-भिन्न वाद, तत्वदर्शन यांचे ज्ञान मिळवावे. शेवटी जेथे चिर-शांति समाधान लाभते तेथे थांबावे. द्वंद्व भाव नाहिसा व्हावा. निश्चिंतता अनुभवाला येते. कोणत्याही मताचा तिरस्कार करूं नको. कोणत्याही मतामध्यें अभिमान धरू नको. सगळी मते सारखीच. मत मौन झाले की सत्य देवाचे दर्शन घडते. शांति लाभते !



## ॥ २० ॥

भगवंताला जाणण्याचे, कथन करण्याचे प्रयत्न हजारो वर्षांपासून होत आहेत. शतकानुशतके भगवंताला जाणणारे या जगांत होऊन गेले. आपणाला भगवंताविषयी जेवढे माहित आहे, तेवढे जगाला समजावून सांगण्याचे प्रयत्न त्यांनी केले. त्यांनी उपयोगिलेली भाषा, त्या वस्तूचे वर्णन करण्याची रीत अत्यंत मार्मिक होती आणि ते आवश्यक होय. भाषा दृश्य जगाचे वर्णन जसे करते, तसेच अदृश्य वस्तूचेही वर्णन करते. या भाषेच्या माध्यमाचा उपयोग संतांनी अत्यंत कौशल्याने केला. सामान्य वस्तूंचे वर्णन करतांना आपण अजागरूकतेने चुकीच्या शब्दांचा उपयोग केला तरी ती वस्तू अनेकांनी प्रत्यक्ष पाहिलेली असल्याने अर्थाचा अनर्थ होत नाही. आध्यात्मिक क्षेत्रांत तसे नाही. पहिली गोष्ट म्हणजे ज्याचे वर्णन करायचे, ती वस्तु अदृश्य. दुसरी गोष्ट अशी की ती आपल्या सहज गमनीं येत नाही. त्या भव्य-अदृश्य वस्तू विषयी भाषा वापरतांना शब्द अधिक नाही-उणा नाही. जेवढे हवे तेवढ्याच शब्दांचा वापर करून भगवंताचे चित्रण आमच्या मन:पटलावर स्पष्ट नसले तरी अस्पष्ट कां होईना उमटविण्याचे प्रयत्न त्यांनी केले. त्यांचे ते तौलनिक बोल म्हणजेच वचन-उपनिषदे.

कधी स्पष्टपणें ते देवाचे वर्णन करतात. तर कधी अप्रत्यक्षपणें त्या वस्तूचे वर्णन करतात. पहिली भाव भाषा. तर दुसरी अ-भाव भाषा. भाव

भाषा परम आध्यात्मिक सत्य तत्वाचे वर्णन लाक्षणिकतेने करते. अभाव भाषा कोणती वस्तु ते परमतत्व नव्हे ते सांगते. पहिल्याला विधिमार्ग दुसऱ्याला निषेध मार्ग म्हणतात.

'इदं' ही वस्तु असे सांगणे म्हणजे प्रत्यक्षपणे ती वस्तु दाखविणे. 'न इदं' ही वस्तु नव्हे असे सांगणे म्हणजे परोक्षपणें वस्तु दर्शविते. ही वस्तु कोणती नव्हे, ते आम्हांला समजावून सांगते. दोन्ही पध्दतींचा उपयोग केला तर वस्तूचे संपूर्ण ज्ञान आपणास होते. कांही जणांना विधि पध्दति आवडते. तर आणखी कांही जणांना निषेध पध्दति आवडते. ज्यांच्या त्यांच्या स्वभावानुसार-आवडीनुसार भाषेची आवश्यकता.

**पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात् पूर्णमुदच्यते।**
**पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ।।**

एका पूर्ण या शब्दाचा उपयोग करून विश्व व विश्वात्मा यांच्या विषयी जेवढे कांही सांगायचे आहे ते सर्व सांगितले आहे. वर्षानुवर्षे तासानुतास सांगितले तरी संपणार नाही. इतका आशय दोनच ओळींत सांगितला आहे. अंतिम सत्याचे खरे पाहतां वर्णन करतां येत नाही. तरी पण ज्ञानी जनांनी केवळ चारच शब्दांत त्याचे वर्णन केले आहे. 'पूर्णमदः' या सागरायेवढ्या खोल अर्थाचा मंत्र रचायला अनुभावीला जीवनभर चिंतन करावे लागले. सत्याचे दर्शन करून घेणे आवश्यक होते. विश्व आणि विश्वातीत वस्तु यांचा संबंध प्रत्यक्ष पाहणे आवश्यक होते. त्या प्रत्येक शब्दावर मन केंद्रित करून शब्दामागील अर्थाचे मर्म जाणून. त्याचा रसास्वाद घेत आनंद मग्न झाल्यास त्या ऋषीने पाहिलेले सत्य आपणांस समजते.

एखादे चॉकलेट गिळून टाकले तर त्याची रूचि समजत नाही. जिभेवर ठेवून ते विरघळतांना निघणारे रस चाखत राहिले, तर त्यांतील सर्व माधुर्य आपल्या अनुभवास येंते. तसेंच मंत्र व वचने केवळ एकदां ऐकून भागत नाही. त्यांना नित्य स्मरणांत ठेवून त्यांचे मनन करावे. ते मनन, त्या पासून उत्पन्न होणारा ज्ञानानुभव रूपी रस आपणास भगवंताच्या उंचीपर्यंत पोहोचवितो.

ज्या संतांविषयीं शरणांविषयी आपल्या मनांत पूज्यभाव असेल त्यांची एकदोन वचनें प्रात:काळी वाचावीत. प्रपंचाला जाग येण्यापूर्वी वाचलेल्या वचनांचे व त्यांच्या अर्थाचे मनन करावे. तो मनन-आनंद मनांत भरून राहिला की त्या दिवसाच्या प्रापंचिक कर्तव्य कर्मांचा आरंभ-करावा. हेच अध्यात्म जीवन होय.

बाराव्या शतकांत शिवशरणांनी अनुभव मंटपाची स्थापना केली. आपणांस झालेले अनुभव त्यांनी सर्व शरणांमध्ये वांटून घेतले. त्यांचा अनुभव श्रीमंत झाला. त्या अनुभवाचा आनंद प्रतिनित्य घेऊन त्यांनी आपले जीवन दिव्य-भव्य बनविले. खऱ्या अर्थानें ते आनंद शरण झाले.

सामान्यपणे शरण-संत उदरभरणासाठी एखादा लहान सहान उद्योग करीत. ते शाळा-कॉलेजांत शिकून तयार झालेले विद्वान पंडित नव्हेत. बलिष्ठ अधिकारी नव्हेत. जळाऊ लांकाडाच्या मोळी विकून, दळण दळून, स्वयंपाक करून, कपडे विणून, शेती करून त्यांनी आपला उदरनिर्वाह केला व चिंतन केले. साधुवेष धारण करून भिक्षा मागून समाजावर भारभूत झाले नाहीत. त्यांचे हृदय अत्यंत निर्मळ. त्यामुळे त्यांना जीवनांतील सत्याचा-देवाचा अनुभव घेतां आला. साध्या-सरळ शब्दांत त्यांनी आपले अनुभव वाचेद्वारे प्रकट केले. तीच वचने होत. ही वचने सुसेव्य, सुश्राव्य व मननीय होत.

शिवशरणांनी उद्देशपूर्वक वचन साहित्याची निर्मिती केली नाही. ते कार्यकर्ते. आत्मानुसंधान करणारे साधक. त्यांना सहज प्राप्त झालेला जीवनाचा अनुभव त्यांनी शब्दांच्या माध्यामांत गुंफला. त्यांचे हात वस्त्र विणण्यामध्ये गुंतलेले तर मन देवरूप वस्त्रांत विणलेले. त्यांच्या वचनांमध्ये देवांबर ! शब्दांचा मागोवा घेत त्यांचा अनुभवांबर विणला जात होता. अध्यात्म आणि जीवन यांत फारसा फरक नसे. आपले जीवन त्यांच्या सारखे पवित्र नव्हे. आम्ही अध्यात्माला जीवनापासून वेगळे केले आहे. शक्य तितक्या कमी वेळांत अध्यात्मिक कार्य करून संपविण्याकडे आपले लक्ष, घाई. भगवद्गीता असो किंवा कोणताही अध्यात्मिक ग्रंथ असो, शंभर वेळां पारायण करण्याचे व्रत आपण करतो. व्रत पूर्ण करणें हाच उद्देश. पारायण, वाचन अत्यंत तीव्र गतीने करतो. साक्षात भगवान श्रीकृष्ण प्रत्यक्ष येऊन ऐकण्याचा प्रयत्न करूं लागला तरी त्याला सुध्दां आपण कोणता श्लोक वाचतो आहोत ते कळणार सुध्दा नाही. कसे तरी शंभर दिवस पूर्ण झाले की तेव्हां उत्सव. शेवटचा पारायणाचा दिवस महोत्सव. गीतेचे ज्ञान झाले म्हणून नव्हे. तर गीताव्रत पूर्ण झाले म्हणून. अशा रीतीने हजार पारायणें केली तरी काय लाभ ? भगवद्दर्शन कोठे ? आध्यात्मिक सिध्दि कशी लाभेल ?

स्कायलार्क पक्षी गगनांत भरारी मारून मेघांच्याही वर जाऊन गाऊं लागला. स्कायलार्य आकाशाचा पक्षी. आपले गाणे गगनांत घुमविणारा पक्षी. गाऊं लागला. एका माणसाने त्याला विचारले.

''कां बरे गातोस ? कोणीही ऐकत नाही ना !''

पक्षी म्हणाला, ''ऐकणाऱ्यांसाठी गाणारे मनुष्य ! भगवंताच्या सुंदर-समृध्द साम्राज्याची आनंदानुभूति माझ्या हृदयांत भरली आहे. ती गान

रूपाने-ध्वनी रूपाने प्रकट होते आहे. माझे गान अन्य कोणासाठीही नाही. माझ्या आनंदासाठी ! विश्वाला याहून अधिक मधुर बनविण्यासाठी मी गातो. मी जोपर्यंत जगतो आहे, तोपर्यंत गातो. अरे मानवा, माझे गान तुझ्यासारखे थांबणारे नव्हे. सतत चालू राहणारे.'' पक्षाचा हा खरा आनंदाविर्भाव.

खडी साखर अत्यंत सावकाश खावी. तोंडात विरघळल्या नंतर तो रस, ती गोडी आपल्या देहाला आणि मनाला व्यापते. तेव्हा खडीसाखरेच्या गोडीचा आनंदानुभव. तसेंच संत-वाणी, शरण-वचनें यांची गोडी मनसोक्तपणे अनुभवावी. हळुवारपणें. सावकाश. तेव्हां आध्यात्मिक आनंद ! उर्मि येते. ती आनंदाची उर्मि अनुभवण्याचे सामर्थ्य आपल्या ठिकाणी नाही असे. नाही. आपणाला सवड नाही. सतत घाई. भगवच्चिंतन मनन केले पाहिजे. केवळ ऐकण्यासाठी नव्हे, पारायण करण्यासाठी नव्हे. भगवच्चिंतन किती दिवस करावे ? या प्रश्नाला अर्थ नाही. सूर्योदय किती दिवस पाहावा ? चांदण्यांत किती दिवस विहार करावा ? शीतल मधुर जलाचा आस्वाद किती दिवस घ्यायचा ? जीवभाव असेपर्यंत चिंतन ! देव चिंतन ! ज्ञानी जनांचा एकेक शब्द आपणांस चिंतन करायला पुरेसा आहे. आतां हा शब्द पहा ! 'हंस' !

'हंस' अत्यंत शुभ्र सत्य वस्तु ! निष्कलंक सत्य-चेतन. त्याला धूळ चिकटत नाही किंवा तो चिखलाने अथवा पाण्याने भिजत नाही. अग्नि त्याला जाळूं शकत नाही. वारा त्याला विचलित करूं शकत नाही. भव्य चेतन ! सुंदर शुध्द. तो हंस. हंस पक्षाचा वास निर्जन प्रदेशांत. मानस सरोवराचा विहार. निःशब्द ! प्रशांत ! सफेद ! शुभ्र ! आंतही आणि बाहेर ही ! व्यष्टि विषयीं विचार केला तर व्यष्टि मनच सरोवर. तेथे पोहणारा चेतन हंस जीवाचा प्रतीक !

विश्वरंगांत समष्टि मनच सरोवर. तेथे पोहणारा चेतन हंस ईश. हे जीव व ईश असे दोन हंस. दोन्ही शुभ्र. ते आहेत म्हणूनच विश्वाला देहाला सौंदर्य-कळा. डोळ्यांनी पहावे. हातांनी कार्य करावे. मनाने कल्पना-भावना करावी. बुध्दीने विचार करावा. त्यासाठी जीव हंस आवश्यक. तो हंस उडून गेला कीं जीवन शून्य.

भव्य प्रासाद. संपत्तीने तुडुंब भरलेला. भोग वस्तूंची रेलचेल. गृहिणी. मुलेबाळे. रात्री दिव्याच्या प्रकाशांत तो प्रासाद कसा उजळून निघतो ! सगळीकडे प्रकाश ! सौंदर्याचा झगमगाट ! खेळकरपणा-खोडकरपणा-रूसवा-फुगवा, मनधरणी सगळे कसे शोभून दिसते. प्रासादांत विहार करणाऱ्यांच्या मुखावर सौंदर्य व्यक्त होत असते. दिवा विझला की ते सर्व वैभव अदृश्य होते. तो हंस असेल तर व्यष्टि, समष्टि सर्व कांही सुंदर, मनोहर ! जीव हंस शुचि-सद् ! ईश हंस वर सत्. दोन भाव-मिती नसलेले अनंत चेतन हेच अंतरिक्ष सद् अथवा व्योम-सद् !

तो हंस सर्वत्र वास करतो. अंतरिक्षांत, आकाशांत, भूमीमध्ये भू-देहांमध्ये, मानव-देवतेच्या अंतरंगात तो सुंदर हंस पोहत असतो. असा भाव धरणें हेंच भगवच्चिंतन.

जीव हंसाचे स्थान म्हणजे भावलहरी मन. त्या मनाला भाववीचि-शून्य केले तर हंस. म्हणजे जीव रूपी हंस भाव मितिचा त्याग करून ईश हंसामध्ये समरस होतो. जीव भावच नसल्याने 'ईश' कल्पनाही विरून जाते. तेव्हा उरतो तो परमहंस. तो केवळ चेतनानुभव. तीच मुक्ति.

हंस साधना ह्य होय. आपल्या मनोक्षेत्रांत, इंद्रिय-क्षेत्रांत, विचार

क्षेत्रांत हंस पोहतो असा भाव धरावा. त्याला ओळखावे. आपल्या सभोवती असलेल्या असंख्य देहामध्यें 'हंस' पोहतो. हे जाणणे म्हणजे हंसध्यान. जगाच्या विस्तारामध्यें, सूर्याच्या उदयामध्ये पावसाच्या वर्षावामध्ये, वाहणाऱ्या वाऱ्यामध्ये हंसगति पाहणे हाच हंसभाव.

अंतरंगात चेतनानुभव करणे जीव-हंस ध्यान. विश्वामध्यें चेतना-अस्तित्व पाहणे ईश-हंस दर्शन. जीवेतर भाव त्यजुनी केवळ हंस (चेतन) पाहणे, परमहंस संधान. एक अंग-भाव. दुसरा लिंग भाव. तिसरा अंग-लिंग समरस भाव; परम हंस स्थिति.

ती स्थिती प्राप्त करून घेतली महान संतांनी. त्यांच्या ठिकाणीं अविद्यादि क्लेश नाहीत. स्वानंद-विहारी ते. झरतुष्ट्र पार्शिया देशाचा संत. त्या संतांचा उपदेश घेऊन एक शिष्य अनुभावी झाला. त्याच्या डोळ्यांत हंस. हृदयांत हंस. सर्वत्र शांति-दर्शन. त्या अनुभवाचा सर्वत्र प्रसार करायला तो निघाला. एक मारेकरी त्याचा वध करायला टपून बसला होता. अरण्यांत तो संत एकटाच निघाला असतां पाठीमागून येऊन त्या मारेकऱ्याने तीक्ष्ण शस्त्राने संताला भोकसले. संत रक्ताच्या थारोळ्यांत पडला. त्याने मारेकऱ्याला आपल्या जवळ बोलाविले. आपण अनुभवलेल्या परमविद्येचा ग्रंथ त्या मारेकऱ्याच्या हाती देऊन संत म्हणाला,

''या अमूल्य ग्रंथामध्यें शांति-विद्या आहे. तूं हा ग्रंथ वाच. शांतीचा अनुभव घे. महान संत हो. आतांपर्यंत मी करीत असलेला हा शांति-विद्या प्रसार यापुढे तूं चालव !'' असे बोलून संताने डोळे मिटले. हातांत ग्रंथ घेतलेल्या मारेकऱ्यामध्ये 'हंस' जागा झाला. त्याचा जीव भाव नाहीसा झाला. तो महानुभावी झाला. 'अहुरा मझ्दा' त्याच्यामध्यें व्यापून राहिला.

हंस विद्या लाभली तर कोणा विषयीसुध्दां द्वेष-मत्सर असत नाही. स्वच्छंद-शुभ्र-हंस हृदय लाभते. चोर खुनी सुध्दां कूडलसंगम (भगवंत) होऊन दिसतात. चोरी करण्याच्या उद्देशाने आलेला चोर सुध्दां महा शिवशरण होतो. हिंसक होऊन आलेला प्रेमळ होतो. हे नीरस तत्वचिंतन नव्हे. सरस, सुंदर अनुभाव शास्त्र. बाह्यांतरंगांत सुरम्य हंस दर्शन.

सगळीकडे अंधार माजला तर, अंतरंग हे एक सरोवर अशी कल्पना करून, तेथे एक हंस पोहतो आहे अशी कल्पना करून, त्या हंसाचे ध्यान करावे. हंस म्हणजे आपणच. मीच तो हंस अशी परिभावना करावी. ही परिभावना दृढ झाली की दिव्य दृष्टि लाभते. तेव्हां डोळे उघडून जगाकडे पहा. सगळीकडे हंस पोहत असल्याचा अनुभव. सर्वत्र शांतता. शुभ्रता. हेच भगवच्चिंतनाचे फळ होय.



# ๑๑ २१ ๑๑

भगवच्चिंतन क्षेत्रांत गुरुचे पात्र अत्यंत महत्वाचे. कोणत्याही धर्माचा अवलंब केला तरी, अदृश्य, अनंततेच्या क्षेत्रांत प्रवेश करतांना माणूस सामान्यपणें विफल होतो. कारण त्याला गुरुचा आसरा नसतो. संतांचे मार्गदर्शन नसते. गुरुचे महत्व अपार. श्रेयोमार्गी सर्वांनी गुरुचा अत्यंत भक्तिभावाने स्वीकार केला आहे. येवढेच नव्हे तर गुरु आणि भगवंत वेगळे नव्हेत. असे मानण्या इतपत गुरुविषयी पूज्य भाव. तैत्तरीय उपनिषदांत म्हटले आहे.

*''आचार्यः पूर्वरूपं अंतेवासि उत्तररूपं।''*

आचार्य पूर्वरूप. शिष्य उत्तर रूप. दोघांमध्ये संधी आत्म-विद्या ! अनुसंधान प्रवचन. ज्याच्यापासून ज्ञान वाहात येते, तो आचार्य. ज्ञान स्वीकारणारा तो शिष्य. हे ज्ञान म्हणजे आत्मविद्या ! ही अमृत विद्या. या ज्ञान प्रवाहासाठी माध्यम प्रवचन !

अरण्यामध्ये आश्रम. प्रशांत वातावरण. सभोवती सुंदर निसर्ग. तेथे त्यांनी काय केले ? सुयोग्य, समर्थ शिष्यांना तेथे नेऊन अमृत विद्येचे सिंचन केले. वैभवाची राहणी त्यांना नको होती. राजे महाराजे विनम्र होऊन दर्शनासाठी आले, तरी त्यांच्या विषयी विशेष आसक्ति नसायची. असे अप्रतिम ज्ञान-

प्रिय गुरु. नि:स्पृह व्यक्ति. जीवनाद्यंत विद्यादान करणारे अनुभावी.

तैत्तरीय उपनिषदांत म्हटले आहे, कांहीही कर. दम, शम, तप कोणतेही आचरण कर पण स्वाध्याय प्रवचन सोडूं नको. उपनिषदाच्या या उपदेशाचे न चुकतां पालन केले आचार्यांनी. श्रेष्ठ आचार्य लाभले, त्यांच्या सान्निधानी निवास भाग्य लाभले तर आपोआप ज्ञान लाभ होतो. वसंत ऋतूचे आगमन झाले की कोकिळेला आपोआप कंठ फुटतो. कोणत्याही संगीत शाळेत शिकायला जायची आवश्यकता नाही.

एका कोकिळेला नुकतेच पंख फुटले होते. अजून गाणे येत नव्हते. मौन होती. वसंत ऋतु अदृश्य रूपाने निसर्गात अवतरला. झाडांना पालवी फुटली. मोहोर आला. सुगंध पसरला. वसंत ऋतु केंव्हा आला ? कसा आला ? कोणालाच कळले नाही. पण कोकिळेला ते जाणवले. तिला वसंताची मादकता भारून टाकूं लागली. ती मदमस्त झाली. तिला आपोआप कंठ फुटला. ती गाऊ लागली. प्रथम निसर्गोन्मादाच्या त्या गीताने सर्वांना धुंद केले. इतके सुंदर कोकिळेचे गायन. तिने कोणती साधना केली नव्हती. तपश्चर्या केली नव्हती. पण वसंत ऋतूच्या स्पर्शाने तिला कंठ फुंटला. साधकालाही असेच आत्मगान स्फुरावे. शिकून ते येत नाही. ज्ञान समागम अंतरंगांतून ते आपोआप स्फुरते. त्यासाठी तपश्चर्येची आवश्यकता नाही. अपार पांडित्याची गरज नाही. गुरु रूपी वसंताचे आगमन व्हावे. तेव्हां ब्रह्मज्ञान सुगंध पसरतो. त्या सुगंधाने धुंद होऊन शिष्याचे श्रध्दा-पूर्ण हृदय गाऊ लागते. आत्मगान.

आनंदोन्मादासाठी-आत्मगानासाठीं गुरु-शिष्याचा पवित्र संबंध अत्यंत आवश्यक. गुरुने विद्या द्यावी. शिष्याने विद्या स्वीकारावी. मातेने बालकाला स्तनपान करावे. बालकाने भरपूर दूध पिऊन संतोष-सुख

अनुभवावे.

ज्याच्या हृदयांत द्वेष नाही. ज्याच्या हृदयांत आशा-आमिष नाहीत. असा महानुभावच गुरु होय. तोच आचार्य. भगवत् क्षेत्रांत प्रवेश करतांना अशा आचार्यांचे सन्निधान अत्यपेक्षणीय.

*मडेकय माडुवडे मण्णे मोदलु.*
*तोडिगेय माडुवडे होन्ने मोदलु*
*शिवपथनरिवडे गुरुपथवे मोदलु*
*कूडल संगम देवनरिवडे*
*शरणर संगवे मोदलु* — *म. बसवेश्वर*

**भावार्थ :** मडके बनवायला मातीची आवश्यकता असते. अलंकार बनवायला सोने आवश्यक. शिवपथ जाणायला गुरुपथ आवश्यक. कूडल संगम देवाला जाणून घ्यायचे असेल तर शिवशरणांचा संग आवश्यक !

माती नसेल तर मडके बनवितां येत नाही. सुवर्ण नसेल तर आभरणें घडविता येत नाहीत. श्रेष्ठ आचार्यांचा संग नसेल तर भगवंताचे सानिध्य लाभणार नाही. इतका शरण संग महत्वाचा.

बृहदारण्यक उपनिषदांत एक कथा. एक माणूस वाटेने चालला होता. त्याच्यापाशी थोडे धन होते. निर्जन वाट. तेथे वाटमारे आले. त्या माणसाजवळील सर्व धन त्यांनी हिसकावून घेतले. त्याला तसेंच न सोडतां त्याचे डोळे आणि हात बांधून त्याला घनदाट अरण्यांत नेऊन सोडले. तेथे कोणीच नव्हेत. भयंकर अरण्य. डोळ्यांना दिसत नाही. हात हलवितां येत नाहीत. अशा परिस्थितीत किती बरे तळमळत असेल तो ! यांतून कसे पार

पडावे ? त्याने देवाची प्रार्थना केली. तेथे एक माणूस आला. अनिमित्त बंधु होऊन आला. करूणापूर्ण श्रेष्ठ ज्ञानी-संत आला. त्याने पाहिले. बंधनातून त्या माणसाची सुटका केली. हात मोकळे झाले. डोळे उघडतां आले. ''या वाटेने जा !'' असे सांगून वाट दाखविली.

जीवन एक घोर अरण्य. घनदाट आणि विकृत. कोणीतरी आम्हांला या अरण्यांत आणून सोडले आहे. आपण डोळे उघडून पाहिल्यानंतर दिसले ते एक घर. पिता, माता, शहर, मागे काय घडले माहित नाही. पुढे काय होणार ? समजत नाही. कोठे जायचे ? कळत नाही. आपण खूप शिकलेले असूं. खूप धन संपादन केले असूं. पण जीवनांत मागचा -पुढचा संबंधच आपणाला समजत नाही. कळत नाही. जाणत्या लोकांशी आपला संपर्क नाही. इतर जन हात आणि डोळे बांधलेल्या अवस्थेतलेच. ते काय मार्गदर्शन करतील ? ते सुध्दां घोर सांसारिक, अरण्यांत हात बांधलेल्या अवस्थेत चांचपडत आहेत. धडपडत आहेत.

अशा स्थितीमध्ये जे आमचे बांधलेले डोळे मोकळे करतील, जे आम्हांला बाहेर पडण्याचा मार्ग दाखवतील; जे आम्ही कोठे आहोत आणि आम्हाला कोठे जायचे आहे ? याचे योग्य मार्गदर्शन करू शकतील तेच आचार्य.

### आचार्यवान् ''पुरूषो वेदः''

ज्यांना असे आचार्य-गुरु लाभतात, त्यांनाच भगवंताची प्राप्ती शक्य होते. रात्री चंद्र हाच दिवा, दिवसा सूर्य हाच दिवा, डोळ्यांत कांति, मनांत ज्ञान ज्योति नसती, तर आम्हाला जग कसे बरे दिसले असते ! बाहेर एक सूर्य तळपतो आहे. आंत ज्ञानरूपी चंद्राचा प्रकाश पसरला आहे. म्हणूनच बाह्य

जगत आणि अंतरंगातील भावना, विचार दिसतात. हा सूर्य म्हणजे आचार्य ! अंतरंगातील ज्ञान म्हणजेच आचार्य. डोळे उघडू शकणारा कोणीही असो, कोणत्याही जातीचा-धर्माचा-पंथाचा असो, घनदाट अरण्यांत आमचे डोळे उघडून, सन्मार्ग जो दाखवतो तो करूणाळु आचार्य ! गुरु ! त्याची जाती, गोत्र, भाषा यांचे काय प्रयोजन ?

आपल्या जीवनांत आचार्याचा प्रवेश झाला की भगवच्चिंतन आपोआप सुरू होते. ग्रीस देशाचा सम्राट अलेक्झांडर अत्यंत शूर. वीर. अत्यंत लहान वयातच त्याकाळी ज्ञात असलेले सर्व जग जिंकण्याची महत्वाकांक्षा बाळगून होता. त्याने जवळ जवळ सर्व जग जिंकले होते. एक मोठा माणूस त्याच्यापाशी आला. त्याने विचारले,

"अलेक्झांडर महाराज, आपण आपले गुरु अरिस्टॉटल यांना कां बरे येवढा गौरव देता ? तुमचे वडीलसुध्दां महाराज. पण त्यांच्याहून अधिक गौरव अरिस्टॉटलचा करता आहांत. कां बरे ? तुमच्या पित्याने तुम्हांला साम्राज्य दिले. तुम्हाला अजेय सम्राट बनविले. खरे तर तुमच्या पित्याचा गौरव केला पाहिजे. त्यांची पूजा केली पाहिजे. ते सोडून एका सामान्य माणसाला, अरिस्टॉटलला कां बरे येवढी पूज्यता ?"

अलेक्झांडर म्हणतो,

***"I obtained from my father a body, a life perishable. But from my preceptor, I obtained the life imperishable. My father brought me to earth from the haven and my preceptor, Aristotle took me from this earth to the haven."***

"पित्यापेक्षा अधिक ॲरिस्टॉटलचा गौरव करायला दोन कारणे आहेत. पित्याकडून मला देह मिळाला. पण हा नाशवंत. अरिस्टॉटल गुरुपासून मी अमर जीवन मिळविले. माझ्या पित्याने स्वर्गांतून मला या पृथ्वीतलावर आणून ठेवले. पण माझ्या गुरुने मला भूमीवरून स्वर्गांत नेऊन ठेवले. आकाशाच्या उंचीवर नेले. कोणाला अधिक पूज्य मानावे ते तूंच सांग !"

भूमीवरून उचलून आकाशा येवढ्या उंच स्तरावर नेणारे आचार्य. जीवनामध्ये अमृतभाव भरणारे आचार्य. म्हणूनच,

***"वरान् प्राप्य निबोधत." "आचार्य वान पुरुषो भव"***

असे अपूर्व आदेश. जीवनांत भगवंत नाही जरी लाभला तरी हरकत नाही. सत्याचा साक्षात्कार घडला नाही तरी चिंता नको. एका महानुभावाचा संग कर. पुरे. आचार्यावान हो. गुरुचा तिरस्कार करून श्रेय मिळवायची इच्छा केली तर ते असाध्य !

माता प्रथम गुरु. घर हीच प्रथम पाठशाळा. जीवनांत प्रवेश करतां क्षणीच शिकविणारे चार पांच जण. आपण एकटेच काय ते शिकणारे. कशी असेल ही शाळा. सर्व मोफत. आई खाऊ घालून-दूध पाजून सांत्वन करून, पाठ देते. अभ्यासाला पुस्तक नाही. पाठ्यक्रम नाही. दहा वर्षे शिकविली तरी न येणारी भाषा माता एका वर्षांत शिकविते. म्हणूनच घर हीच प्रथम पाठशाळा. आई हीच प्रथम गुरु. मोठा झाल्यावर अनेक जण गुरु. लौकिक ज्ञान देणारे. लौकिक जीवनाला आश्रय देणारे. त्या सर्वांविषयी कृतज्ञतेची भावना असूं द्या ! पण जीवन दिव्य-भव्य होण्यास येवढीच विद्या पुरेशी नाही. ८० ते ९० वर्षे आपण जगतो पण तृप्ति नाही. कां बरे ? अशी तृप्तिकला शिकविणारे, समाधानी राहण्याची विद्या देणारे गुरु आपणांस भेटले नाहीत. त्या गुरुना

शोधणे हे आपले पहिले काम. एका ज्ञानी महंताला शोधणे अति अवश्य. घाईघाईने शोधून चालणार नाही. फारच सावधानतेने शोधले पाहिजे.

वराला योग्य वधु मिळावी म्हणून किती शोधले जाते. मनाची तृप्ति होईपर्यंत शोध घेतो. लौकिक जीवनासाठी येवढा शोध; तर मग अलौकिक जीवनासाठी किती बरे शोधावे लागेल ? गुरुला शोधतांना थोडा अधिक समय लागला तरी हरकत नाही. एकदां सुयोग्य व पवित्र जीवनाचे गुरु लाभले की पुरे. जीवन सफल झालेच म्हणून समजावे.

एक वाहती नदी, एक वाढलेला विशाल वृक्ष, उंच पर्वतशिखर, सुंदर पसरलेला निसर्ग, अनंत आकाश हे ही गुरु असणे शक्य, ज्ञानज्योति प्रज्वलित व्हायला जो कोण कारण होईल, तोच गुरु. येवढेच की वस्तु-गुरु यांचेपासून आपण शिकले पाहिजे. मानव गुरुचे तसे नाही. तो आम्हांला आवश्यक असे आत्मज्ञान देतो. म्हणूनच मानव गुरुची महति. असा गुरु लाभला तर मुक्तीची, सत्यदर्शनाची चिंता नको. अल्लमप्रभू ज्ञानी. त्याने मृदंग वाजविला. मायेने नर्तन केले. आमची स्थिति अगदी उलट. माया मृदंग वाजवते. तिच्या तालावर आपण नाचतो. अल्लमप्रभू विरागमूर्ति. मायांतक ! त्याचे एक वचन.

*उपाधिक मनवु, उपाधिरहित मनवु*
*निंदल्लि (ये) निवात वायित्तु. आनंद भाववु*
*बंदु तानळिदु निंदल्लि (ये) निवात वायित्तु*
*लिंगोदय प्रज्वलिसुत्तदे*
*गुहेश्वर (नेंब) लिंगवु ताने यागि.*

या वचनांत आपले वर्णन आहे. संतांचे वर्णन आहे. साधनेविषयी सांगितले आहे. शेवटी आपला अनुभव काय होईल ते सुंदर शब्दांत वर्णन

केले आहे.

उपाधिक मन. आम्हा सर्वांचे मन उपाधीच्या भावनांचे. आमच्या मनांत प्रपंच भरला आहे. बाहेर जेवढा आहे, त्याहून अधिक दाटपणे. तिजोरीतील धन उपाधि. त्या धनाचा भाव आंत आहे. ते उपाधिक. बाह्य धन संसार नव्हे. आंतला भाव संसार !

, पत्नी, मुले-बाळे, घर, अधिकार सगळे बाहेर आहेत. त्यांच्याविषयी ममत्व भाव आंत आहे. बाहेरचे भार नव्हे, आंतले भार. आम्ही मनाची कचरा पेटी-डस्ट-बिन करून टाकले आहे. ज्यांचा संग्रह करू नये त्या सर्वांना त्या कचरापेटींत टाकून दिले आहे. भरून टाकले आहे.

लोकांना जे जे नको असेल ते ते कचरा पेटींत टाकतात. कचरा पेटींत मौल्यवान वस्तु कधी कोणी घालेल काय ? आपल्या घरांतील नको असणाऱ्या सर्व वस्तु तेथे टाकतो. त्या कचरा पेटीला केवढा अभिमान की आपण भरलो आहो. आपण श्रीमंत म्हणून. पण त्यांत काय भरले आहे ? केवळ कचरा. तसेंच आपण हजारो निरूपयोगी विचार मनांत भरून घेतले आहेत. उपयोगी वस्तुसुध्दा कचरा पेटींत टाकून दिल्या आहेत. हे उपाधिक मन. श्रीमंत कचरापेटी. या कचरा पेटींत गीतेचे मंत्रही आहेत. परदूषक विचारही आहेत.

कचरा पेटीत सामान्यपणे टाकाऊ वस्तूच असतात. मनाचे तसे नाही. त्यांत चांगलेही आहे; वाईट ही आहे. सगळेच वाईट अथवा टाकाऊ असते तर टाकून देतां आले असते. सगळे चांगले असते तर न टाकतां ठेवून घेता आले असते. पण तसे नाही. पूर्णपणें टाकून देतां येत नाही नी पूर्ण ठेवून घेता येत नाही. उपाधिक मन म्हणजे असेच. एकप्रकारचे मिश्रण.

उपाधि विरहित मन-उपाधीना टाकून देऊन हलके झालेले मन. रिकामे झालेले मन. मनुष्य गृहस्थाश्रमी असो वा संन्याशी, तो जेथे ज्या स्थितींत. आश्रमांत असेल तेथे निवांत होऊन असावे. म्हणजे मन रिकामे ठेवावे. तेव्हां ते निराभार शांत होते.

मन रिकामे करणे तेवढे कठिण नव्हे. म्युनिसिपालिटीच्या कचरा कुंडीला बूड नसते. ते नुसते उचलले तरी पुरे. ते रिकामे होते. भरायला कित्येक दिवस लागले तरी रिकामे व्हायला एक क्षण पुरे.

आपण लौकिक जन हा भाव सोडून द्यावा. आपण संन्याशी हा भावही सोडून द्यावा. उपाधिक आणि निरुपाधिक हे दोन्ही भाव बाहेर ओतून टाकावेत. हेच निवांत होणे होय, तुम्ही संन्यासी होण्याची गरज नाही. मलाही गृहस्थ होण्याची गरज नाही. आपण ज्या स्थितीत आहोत त्या स्थितीचा भाव-अभिमान त्याग करावा. हीच निवांत स्थिति.

निवांत झाल्यावर आनंद होतो. आनंदाचा भावबिंदु तेवढा उरतो. सगळे रिकामे केल्यावर आनंद होतो. प्रवास करून आल्यावर अंग सगळे धुळीने माखलेले असते. कपडे घाण झालेले असतात. घरी येऊन कपडे काढून टाकून स्नान केले की केवढे समाधान. कां बरे ? धुळीने माखलेले कपडे काढून टाकले म्हणून हा आनंद.

तसेच प्रपंचाच्या धुळीने-घाणीने माखलेले मन धुवून टाकले तर आनंद होतो. या आनंदाचा भावबिंदु फारच सूक्ष्म. आनंदाचा भाव बिंदु तेवढाच उरावा. कां आनंद झाला हे उरू नये. हे मी सोडले. त्यामुळे आनंद झाला हा भाव सुध्दा नको.

''**उळिद्दु निंदल्लि, निवात वायित्तु नोडा!**'' माणसाचे मन रिकामे झाले की केवलानंद. तेव्हां हृदयामध्ये अरूणोदय. अंतरंगात भगवंताच्या आगमनाची चाहूल. तो आध्यात्मिक अरूणोदय. नंतर ज्ञानरूपी प्रज्वलित सूर्योदय.

''अदे गुहेश्वरा नोडा.'' तो ज्ञानरूपी देवच गुहेश्वर, भगवंत. त्या भगवंताचे असे स्वागत करणे हेच भगवच्चिंतन ! अशा भगवंताच्या चिंतनासाठी सर्व प्रथम काम म्हणजे श्रेष्ठ आचार्याला शोधणे. त्याचे शिष्यत्व स्वीकारणे गुरुकडून अन्य कशाचीही अपेक्षा न धरतां आत्मविद्या मिळविणे. तेव्हां आत्मगान ! आत्मानंद !



# ॰॰ २२ ॰॰

चिंतन शेकडो-हजारो वर्षांपासून चालत आले आहे. चिंतन करून अनुभव प्राप्त करून घेतलेल्या अनुभावी, ऋषींनी भगवंतावर जेवढे प्रेम केले, तितकेच या जगावरही केले. पण आपण जसे या जगतावर प्रेम केले तसे त्यांचे प्रेम नव्हते. आमच्या प्रेमाच्या दृष्टीला या जगातील वस्तूच परमार्थ ! पण ज्ञानियांच्या दृष्टीला विषय सर्व भगवंताचा प्रसाद. विषय पाहून संतोष झाला ज्ञानियांना. विषय पाहून त्यावर मोहित झालो आम्ही. ज्ञानी जन भगवंतासाठीच जगले. या दृश्य जगाला, या देह-इंद्रियांना सर्वत्र व्यापून राहिलेल्या विषयांना पाहून ज्ञानियांनी त्यांचा तिरस्कार केला; अशी आपण चुकीची समजूत करून घेतली आहे. त्यांनी तिरस्कार केला नाही. त्यांनी प्रसादीकरण केले. त्यांनी जगाचे जे वर्णन केले आहे, ते ऐकले तर भगवद्भाव उत्पन्न होतो. विषयानुराग उत्पन्न होत नाही. पण आम्ही विषयांचे वर्णन करूं लागलो की भगवद् प्रज्ञा नाहीशी होते. विषयांमध्ये अनुराग, मोह उत्पन्न होतो. त्यांचे वर्णन प्रासादिक. आम्ही वर्णन करतो ते उन्मादक. कारण येवढेच, त्यांनी देवदृष्टीने जगाकडे पाहिले. आपण भोग दृष्टीने विषयांकडे पाहतो.

*इयं पृथ्वी सर्वेषां भूतांना मधु:*

हे जगत् ही पृथ्वी मधु. नयन मनोहर. येथे असलेले शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे मधु. हे विषय वैविध्यपूर्ण. त्याचे प्रकार अगणित. तितकेच रसपूर्ण,

आकर्षक. एकदा त्याचा आस्वाद घेतला तर पुनः पुनः आस्वाद घेण्याची आशा निर्माण होते.

''अस्यै पृथिव्यै सर्वाणि भूतानि मधु''

फक्त जगच तेवढे मधु असे नव्हे. जगांतील सर्व जीव-जंतू या पृथ्वीला मधु. पृथ्वीचे अलंकार जीव जंतू. सस्य असावे. माणसे असावीत. आकाशांत पक्षी विहार करीत असावेत. पाण्यांत मासे पोहत असावेत. भूमंडळात जीव-जंतू सर्वत्र संचार करीत असावेत. ही पृथ्वीची इच्छा. त्यासाठी पृथ्वी तपश्चर्या करते या जीवजंतूना निर्माण करण्यासाठी !

'तपः तप्यत् ।'

पृथ्वी तप आचरते. पूर्वी कित्येक कोटी वर्षापूर्वी या पृथ्वीवर कांहीही नव्हते. पृथ्वीने तप आचरले. कित्येक कोटी वर्षे. पृथ्वीच्या कणांकणांतून एक आशा-इच्छा, जीव-मधु निर्माण करावे ही. स्वतःचा शृंगार जीव-जंतू-मधूने करावा. विज्ञान सुध्दा या गोष्टीची पुष्टि करते.

अंदाजे चार पाचशेहे कोटि वर्षापूर्वी ही पृथ्वी आकाशांत प्रकटली. शंभर कोटि वर्षे पृथ्वीने तप आचिरले. जसे भगवंत. तदैक्षत बहुस्यां प्रजायेय. तशीच भूमी. मी शंभर शंभर... अगणित रूप धारण करावेत. शंभर शंभर रस बनावे, यासाठी पृथ्वीने तप आचरिले. शंभर कोटि वर्षांनंतर प्रथम 'अमिबा' उत्पन्न झाला. भूमि संतोषाने डोलूं लागली. 'अमीबा' सूक्ष्मातिसूक्ष्म. कोटि वर्षापर्यंत त्या 'अमीबा' ला ऊब देऊन, अन्न देऊन त्याची जोपासना केली. ऊन-पावसात, वाऱ्यांत नष्ट होणार नाही याची दक्षता तिने घेतली. तो अणुजीव वाढून पुढे संपूर्ण भूमंडल त्याने व्यापिले. भूमि हिरवीगार झाली. तृप्त झाली,

मधुमय झाली, भूमि सर्व जीवांवर प्रेम करते, सर्वजीव भूमीवर प्रेम करतात. या दोहांच्या परस्पर प्रेमामध्यें मधु-दर्शन.

ऋषीच्या दृष्टीने सर्वच प्रिय, परम प्रिय. आपले प्रेम सीमित. आपले शेत, आपले घर, आपली पत्नी, आपली मुले येवढ्या पुरते सीमित. कारण ? आमची दृष्टि फारच संकुचित. आपल्या घराभोवती एखादे झाड उगवले तरी पुरे, घनदाट अरण्ये नष्ट झाली तरी आपणांस त्याची चिंता नसते. आपला भाव वेगळा. ऋषींचा-संतांचा भाव वेगळा.

या भूमीकडे 'मधु' या दृष्टीने पहावे. या भूमीवर प्रेम करावे. ही भूमि पौर्वात्य आहे. पाश्चिमात्य आहे-अमूक देश-प्रांत आहे म्हणून नव्हे. कोणताही सागर हिंदू नाही, क्रिश्चियन नाही, मुलसमान नाही. सागर म्हणजे सागरच. पर्वत म्हणजे पर्वतच. भूमंडल म्हणजे भूमंडलच. भगवंताचा अद्‌भुत असा मधु-बिंदु.

**यहस्य अस्यां पृथिव्यां.**

मधु होऊन असणाऱ्या या विश्वामध्ये केवळ पृथ्वि नाही दिसली ऋषींना. ज्ञानी जनांना पृथ्वीच्या कणा-कणांत

**"तेजोमयः अमृतमयः पुरुषः ।"**

अत्यंत तेजस्वी काल स्पर्श नसलेले अमृतमय पुरुष तत्व दिसले. शरीरांत तोच तेजोमय, तोच अमृतमय पुरुष. जो पुरुष चेतन मधु मुळांत होता, तोच भव्य भगवंत. या भूमंडलांत आणि या देहांत मधु तत्व. विश्वामधील मधूचा आस्वाद घेतो तो विश्वगत. चेतन देहामधील मधूचा आस्वाद घेतो तो देहगत चेतन ! विश्वामधील मधूचा आस्वाद घेणारा ईश चेतन. देहांतील मधूचा

आस्वाद करतो तो जीव चेतन सर्व कांही मधू आहे या दृष्टीने पाहणारा तो दार्शनिक.

*Here is the heaven.*
*Where the country is big and population small.*
*Where there is more supply of goods*
*than the people use; where the people love their lives*
*more than fashions;*
*where peoples armoury is empty and their*
*grainary is full;*
*where they enjoy the food and simple clothing;*
*Where they are satisfied with their families*
*and they take delight in the*
*small things of life;*
*Where they can live as close neighbours,*
*all those people who are of*
*different races.*

लावोत्से ने या भौतिक जीवनाचे वर्णन 'स्वर्ग' या शब्दांत केले. हे भूमंडल लावोत्सेला स्वर्ग वाटले. तो स्वर्गीय जीवनाचे वर्णन करतो. राज्य-देश मोठा असावा. पण जनसंख्या लहान असावी. आपण कितीही उपभोग घेतला तरी वस्तूंची कमतरता भासूं नये. लोक जीवनावर अधिक प्रेम करणारे असावेत. आहाराचा आस्वाद घेतांना सर्वांना संतोष व्हावा. कपडे विणतांना स्वर्गीय आनंद लाभावा येवढेच नव्हे तर ज्याच्या त्याच्या वाटणीला आलेले

घर, आपली पत्नी, मुले-बाळे, बंधु-बांधव, आप्त-मित्र या सर्वांच्या सहवासांत त्यांचे ह्रदय हर्ष निर्भर असावे. आपण जे काम करतो ती दैवी-साधना-उपासना या भावनेने काम करावे. सर्व जीवांवर मानवांवर समभावाने प्रेम करावे. लाओत्सेच्या दृष्टीने हाच स्वर्ग. एकंदरीत या भूमंडलाचे जीवन ऋषीच्या दृष्टीने मधु. लाओत्सेच्या दृष्टीने स्वर्ग !

विश्व हे मधु ! पण आपल्या अज्ञानाने माणसाने त्याला सीमा घातल्या त्यांत आंबट रस ओतला. द्वेष-राग, भेद दृष्टि यांमुळे विश्वाचे हे सौंदर्य नासून गेले. माणूस सर्व जीवांचा आपल्या सुखासाठी उपयोग करू लागला क्रूरपणे त्यांचा संहार करूं लागला. आपल्या कुळाची श्रेष्ठता प्रस्थापित करूं लागला. ज़ीवन समस्यांनी भरून गेले. दुःखी झाले. या स्वर्गीय मधूला त्याने नरक बनवून टाकले.

लाओत्सेची भूमीवरील स्वर्गाची कल्पना विचार करण्यासारखी आहे. देश विशाल निःसीम असावा. जन कमी संख्येने असावेत. दूध, फळे, भाजी सर्वत्र विपुलपणे लभ्य असावे. अन्न असावे. अन्नधान्याची कोठारे भरलेली असावीत पण शस्त्रास्त्रांची आगारे रिकामी असावीत. किती अद्‌भुत मधुदर्शन हे ! देवाने जेव्हां माणसाला पृथ्वीवर पाठविले, तेंव्हा ही भूमि स्वर्गच होती. मानव भूतलावर आला. आशेच्या भुताचे थैमान सुरू झाले. सर्व समतोल बिघडून गेला.

आतां मानवाने आपले आगार शस्त्रास्त्रांनी भरून टाकले. सर्व विनाशक शस्त्रास्त्रे. मनांत दुराशा. स्वर्गाचे स्वप्न कसे बरे साकारेल ? खरं पाहिलं तर ही भूमि अन्नधान्याचे कोठार. एक बी पेरावे आणि हजारोपटीने

घ्यावे. टाकाऊ केरकचरा भूमीमध्ये टाकावा, रसभरित फळे घ्यावीत. असे हे अन्नाचे कोठार माणसाने रिकामे करून टाकले, आणि त्या कोठारांत विनाशकारी शस्त्रास्त्रे भरून ठेवली.

माणसाने या पृथ्वीतलावर आल्यानंतर या भूमीवर प्रेम करायला शिकायला हवे होते. पण त्याने विषयलालसा वाढविली. कामादि विषयांना आद्य स्थान दिले. हजारो रस, कितीतरी आहार वस्तु. त्यांना देवाचा प्रसाद मानून त्यांचा स्वीकार करून सर्वांना तो वाटून सुखाने जगायला हवे होते. तसे त्याने केले नाही. फळांच्या रसांना आंबवून तो पिऊं लागला. मदांध होऊन नाचू लागला. उन्मत्त झाला. आप्यायमान आहार पदार्थांना बिघडवून सत्वहीन रूचकर पदार्थ बनवून खाऊं लागला. प्रेमाने दिलेल्या साध्या आहाराचा त्याग करून व्यापाऱ्यांनी दिलेल्या खाद्यांच्या मोहांत अडकला. मातेच्या प्रेमाने दिले जाणारे साधे अमृतासारखे अन्न टाकून जिव्हा लौल्याला बळी पडला.

लाओत्से पुढे सांगतो, ''देवाने आम्हांला मौल्यवान वस्त्र नेसवून पाठविले. लाल, पिवळे, पांढरे, काळे वस्त्र. किती सुंदर ! टिकाऊ ! सुखकर ! हात-पाय, नाक, डोळे, कान सर्व त्या देवाची देणगी. सर्वांना समान. राजाला वेगळे डोळे, सामान्य माणसाला वेगळे डोळे असे नाही. सगळे सारखेच समर्थ ! सुभग ! हे रंग, हे इंद्रिय, हे अवयव सर्वांविषयी माणसाने प्रेम बाळगावे. या समर्थ अवयवांचा अभिमान बाळगावा. तेव्हा स्वर्ग प्राप्ती.''

बसवेश्वरांनी सुध्दां, ''माझे पाय खांब, देहच देऊळ, शिर सुवर्ण कलश.'' असे वर्णन केले. त्यांच्या दृष्टीने देह हे देवालय. आंत देव. इतके दिव्य, पवित्र हे शरीर. ज्ञानियांच्या दृष्टीने हे विश्व मधु ! जीवन मधु !

आमच्या दृष्टीने ही भूमि स्वर्ग नव्हे. मर्त्य ! नरक ! आमचे अज्ञान, आमचा स्वार्थ, आमची अति आशा हेच सर्वनाशाला कारण !

पत्नी, मुले-बाळे, बंधु-बांधव संतोष देतात. आपल्या प्रेमाच्या वर्षावाने आमचे जीवन मधुर बनवितात. आम्ही त्यांच्याशी संतोषाने-समाधानाने राहावे. तृप्त राहावे. आपले राहते घर झोपडी असो अथवा भव्य महाल असो महालांत राहणारे जसे आपल्या महालाविषयी प्रेम बाळगतात, तसेच झोपडींत राहणाऱ्या माणसाने आपल्या झोपडीविषयीं प्रेम बाळगायला हवे. हे प्रेम घर बांधते. दगड माती नव्हे.

एका श्रीमंताने एक घर बांधले. भव्य घर, पाच मजली, विशाल प्रासाद, संगमरवरी दगडांत बांधलेला. वास्तु-शांति करून यजमानाने गृहप्रवेश केला. त्या गावांत येवढे सुंदर घर दुसऱ्या कोणाचेच नव्हते. त्यादिवशी पौर्णिमा. स्वच्छ चांदणे. वयोवृध्द यजमान. सर्वांत वरच्या मजल्यावर चढून तेथून त्याने सर्वत्र दृष्टि फिरविली. चांदण्याच्या प्रकाशात सर्व गांव स्पष्ट दिसत होता. आपल्या संगमरवरी महालाकडे त्याने नजर फिरविली. शीतल चंद्रकिरणांत महल न्हाऊन निघाला होता. यजमानाला स्वर्गीय आनंद झाला. त्याने सर्वत्र नजर फिरविली. आपल्या महालाशेजारीच एक झोपडी, वर गवताचे आच्छादन. अठराविश्वे दारिद्र्य त्या झोपडींत सामावलेले. त्या झोपडीमुळे आपल्या सुंदर महालाला कलंक लागला आहे असे त्याला वाटले. पाच मजली भव्य प्रासादाशेजारी अशी चंद्रमौळी झोपडी म्हणजे डाग-कलंक. त्या भव्य प्रासादाचा संतोष शून्य झाला होता. अत्यंत क्षुब्ध अंत:करणाने त्याने शेजारच्या वृध्देला बोलावून घेतले.

शेजाऱ्या पाजाऱ्यांची दळणे दळून उदरनिर्वाह करणारी वृध्दा ती ! पण

अत्यंत समाधानाने राहात होती. तो श्रीमंत तिला म्हणाला.

"ही तुझी झोपडी ना ? या झोपडीने माझ्या भव्य-सुंदर वास्तूची कळाच बिघडवून टाकली आहे. मी ती पाडून टाकणार आहे. तिची किंमत किती ते सांग. पैसे घे आणि जागा सोड."

म्हातारी म्हणाली, "अहो सावकार ! मी हे घर विकायला काढलेले नाही. तुम्ही कितीही पैसे देऊं केलेत तरी ते स्थान तुम्हांला लाभणार नाही. तुम्ही लाख, दहा लाख, कोटि रुपये दिले तरी मी ते घर तुम्हांला विकणार नाही. तुम्ही तो प्रयत्न सोडून द्या !"

तुमच्या महालांत नाही. तसला अमूल्य ठेवा माझ्या झोपडीत आहे. या झोपडींत माझ्या पतीचे प्रेम पसरले आहे. पती देह सोडून कित्येक वर्षे झाली तरी त्याचे प्रेम इथे शाश्वतपणें भरून राहिले आहे. ही झोपडी माझ्या दृष्टीने अमूल्य. इंद्र महाल. देव निलय !

तसे पाहिले तर या झोपडीची पैशांत कांही किंमत नाही. पण या झोपडीत भरून राहिलेले प्रेम मौल्यवान. त्या प्रेमापुढे तुमच्या सर्व श्रीमंतीची-महालाची किंमत शून्य. कवडीमोल.

अहो सावकार, "तुम्ही येवढा संगमरवरी महाल बांधला आहांत; मी माझ्या मोडक्या-तुटक्या झोपडींत सुखाने राहते आहे. तुम्हांला येवढ्या मोठ्या महालांत संतोषाने जगतां येत नाही ना ?"

आम्ही अनेक मजली घर बांधतो. पण संतोष मानणारे मोठे हृदय आपले नाही. आपण सुसंस्कृत नाही. आपल्या घरांत जेवढे आहे; तेवढ्यात समाधान

मानण्याची वृत्ति लाभली पाहिजे. तशी दृष्टि लाभली तर हे भूमंडल स्वर्ग बनून जाईल. आपले शेजारी वेगवेगळ्या मतांचे, विचारांचे असले तरी आपले संबंध फार जवळचे-प्रेमाचे असावेत.

एका वृक्षावर अनेक प्रकारचे पक्षी असतात. एखादा लहान असतो, एखादा मोठा असतो. एखदा पक्षी गातो, एखादा नृत्य करतो... त्या सर्वांना आश्रय तो वृक्ष. ते पक्षी कसे गुण्यागोविंदाने राहतात. ते एकमेकांचा तिरस्कार करीत नाहीत.

अरण्यांत एक ससा होता. भगवंताने त्याला विचारले, ''अरे सशा, तूं किती लहान प्राणी. निरूपद्रवी. क्रूर प्राणी तुझी शिकार करतात. तुला मारून खाऊन टाकतात, तुझी परिस्थिती पाहून मला तुझी दया वाटते. आत्मसंरक्षासाठी तुला कांहीतरी हवे असले तर सांग ! देईन मी.''

ससा म्हणाला, ''भगवंता, क्रूर प्राण्यांना येवढी शस्त्रे असून ही आमच्या येवढ्या मोठ्या संख्येने ते जगलेले नाहीत. आमच्या हाता पायांना तीक्ष्ण नखे नाहीत. डोक्यावर शिंगे नाहीत. पण आमच्या पायांत शक्ति मनांत तृप्ति.'' आमचा देह लहान. अत्यंत वेगाने पळत जाऊन लहानशा जागेंतही आम्ही लपून राहूं शकतो. त्यामुळे आमच्या वंशाचे रक्षण झाले आहे. त्या परिस्थितींत आम्ही समाधानी आहोत. तृप्त आहोत. तूं देऊ केलेल्या कोणत्याही शस्त्राची आवश्यकता आम्हाला नाही. हिंस्र पशूंच्या सानिध्यांतच आम्हांला जगायचे आहे. आम्ही त्यांत संतुष्ट आहोत.''

अशा प्राण्यांना सुध्दा इतरांशी मिळते जुळते घेण्याची भावना आहे. सापासारखा विषारी प्राणीसुध्दा इतर प्राण्यांशी प्रेमाने राहून संतोषाने जीवन

कंठतो. अनावश्यकपणें आक्रमण करण्याचा क्रूरपणा कोणत्याही प्राण्यांत नाही. आम्ही आस्तिक, तुम्ही नास्तिक, आमचा धर्म वेगळा, तुमचा धर्म वेगळा, धर्माच्या दुरभिमानाने संघर्ष. एकमेकांशी प्रेमाने मिळून मिसळून वागायला शिकवत नसतील तर धर्म काय कामाचे ? त्यांचे प्रयोजन काय ?

दोन वेगवेगळ्या धर्मांचे प्रमुख, आपापल्या धर्माच्या रक्षणासाठी त्यांनी घोर युध्द केले भूमंडल जळूं लागले. लाखो-कोट्यावधी जीव मारले गेले. ते दोघे ही धार्मिक पुढारी मारले गेले. दोघेही स्वर्गांत जाऊन देवाला भेटले.

''तुम्ही इकडे कां आलांत ?'' देवाने विचारले.

''भगवान ! तुमच्या रक्षणासाठी, धर्माच्या रक्षणासाठी मी प्राणांची पर्वा न करतां लढलो.'' एक पुढारी म्हणाला.

भगवान म्हणाला, ''माझ्यासाठी तुम्ही युध्द केले ? केवढे कष्ट घेऊन मी जगाला निर्माण केले होते. सुंदर जग. त्या जगालाच नष्ट करून आलांत ना ? तुमचा कोणता धर्म ? माझ्या साम्राज्याचा विध्वंस करून माझे रक्षण करणारा असा कोणता धर्म आहे तुमचा ?''

सर्वांनी हंसत खेळत प्रेमाने राहावे हीच भगवंताची इच्छा असते. आम्ही आपापसांत मारामारी करून एकमेकांचा जीव घ्यायला उद्युक्त होणे; भगवंताला आवडत नाही.

''सकल जीवरिगें लेस बयसुव.'' सकल जीवांचे भले व्हावे ही इच्छा बसवेश्वरांनी व्यक्त केली. सकल म्हणजे कोण ? केवळ लिंगायत ?

''सर्वे जनाः सुखिनो भवंतु !'' सर्व जन म्हणजे कोण ? केवळ हिंदूच

तेवढे काय ?

"शेजाऱ्यांवर प्रेम करा." असे ख्रिस्ताने म्हटले. शेजारी म्हणजे कोण ? केवळ ख्रिश्चन काय ?

सकल म्हणजे सर्व. हिंदु-मुसलामान, ख्रिश्चन सर्व सुखी असावेत ही दृष्टी असली तर मधु-दर्शन.

आपल्या आनंद स्वरूपाचा बिंदू, मधु रूपाने देवाने आकाशांत सोडला. तो बिंदूच भूमंडलांत परिवर्तित झाला. म्हणूनच या जगाला मधु मानून त्यावर प्रेम करावे.

हे जगही आम्हां प्राण्यांना मधु मानून आमचे संरक्षण करते. हे भगवज्जीवन. भगवच्चिंतनाचे असे जीवन घडावे. ही समग्र पृथ्वि मधु. सर्व व्यक्तिही मधूच. तुम्हांला पाहून मला संतोष होत असेल तर मी तुम्हांला मधु.

*"परस्परं भावयंतः श्रेयः परमाप्स्यथ !"*

त्यावेळी तुमचे माझे श्रेय होते. परस्पर श्रेय उत्पन्न झाले की हे जगत् स्वर्ग बनते. स्वर्गप्राप्तीसाठी तळमळायची आवश्यकता राहात नाही. आपले जीवनच स्वर्गीय, दिव्य, श्रेयस्कर बनवून घेतले पाहिजे. ते आपणांस अशक्य नाही. पण चिंतन नसल्यामुळे विफल होते.

आपण शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध यांचा आस्वाद अवश्य घेऊं या. पण तो शब्द-स्पर्श-रूप... दिव्य झाले पाहिजे. अशारीतीने प्रत्येक विषयांत ते दिव्यतत्व भरून त्याचा आस्वाद घेण्याची कला ज्ञानियांना लाभली होती

म्हणूनच ज्ञानी जनांनी जेवढे प्रेम भगवंतावर केले तेवढेच या जगावर केले.

आध्यात्मांत प्रवेश करायचा असेल तर सगळे जग हेय मानावे; अशी आपण चुकीची समजुत करून घेतली आहे. खरे तर आध्यात्मांत प्रवेश करतांच सर्व कांही दिव्य होऊन दिसते. आपल्या सभोवती असलेले घर-दार सर्वत्र भगवंताचा प्रसाद अवतरतो. हा आजचा मधु-बिंदु. भगवच्चिंतन. विश्व आणि या विश्वातील जीव हे दोन्ही मधु-बिंदु होत.



# ൭൭ २३ ൭൭

आपण ज्या जगांत वावरतो, त्या जगांत अत्यंत आकर्षक विषय आहेत. कान, डोळे, त्वचा, जिव्हा यांना गम्य असे विषय या जगात सर्वत्र पसरले आहेत. विषयांना जसे मानवाने आवडीने स्वीकारले तसेच त्या विषयांत भगवंताला पाहिले असते तर शास्त्रांची आवश्यता नव्हती. संत-महंतांनी या जगाला उपदेश करण्याचा प्रश्नच उद्‌भवला नसता. विषय जसे स्पष्टपणे इंद्रिय गोचर आहेत तसा भगवंत सुध्दा स्पष्टपणे दृष्टिगोचर झाला असता तर आपले-जीवन आतां जसे आहे, तसे झाले नसते. विषय जसे मनांत भरून राहिले आहेत तसाच भगवंत भरून राहिला असता तर परिस्थिति वेगळीच झाली असती. असत्य वाचेमध्यें प्रवेश करूं शकले नसते. असत्याने भाव-व्यापले नसते. असत्य विचारांत भरून राहिले नसते. आपल्या सुदीर्घ शंभर वर्षाच्या आयुष्यात विषय सोडून अन्य कांही दिसतच नाही.

''विषयः विनिवर्तंति ।''

विषय दूर झाल्याशिवाय भगवत् भाव प्राप्त होत नाही. भगवत् भाव आल्याशिवाय विषय दूर होत नाहीत. केवढी विचित्र अवस्था ही ! सत्य समजल्याशिवाय असत्याचा प्रभाव दूर होत नाही. आणि असत्याचा प्रभाव असेपर्यंत सत्याचे दर्शन होत नाही. माणूस जोपर्यंत खालीच पाहात राहतो,

तोपर्यंत वर आकाश आहे याची कल्पना त्याला कशी होईल ? ते भव्य विशाल आकाश दिसल्याशिवाय माणसाचे खालीच पाहणे कसे थांबेल ? हे सर्व न सुटणारे कोडे !

हे एक फूल आहे; याविषयीं कोणालाही संदेह नाही. त्यामुळे या विषयांत संदेह उत्पन्न होत नाहीत. पण भगवंताविषयी किती प्रश्ने ? किती समस्या ? किती संदेह ? हजारो वर्षापासून प्रश्न विचारतच आहेत. सांगणारे सांगतच आहेत. ऐकणाऱ्यांना समाधान नाही. आणि सांगणाऱ्याला सुध्दा सांगून संपले असे वाटतच नाही. असे कां बरे व्हावे ? याचे मुख्य कारण विषय-मग्नता. अन्यत्र क्षणभरही लक्ष देतां येऊं नये; येवढी विषय मग्नता.

*बालस्तावत् क्रीडासक्त: तरूणस्तावत् तरुणी रक्त: ।*
*वृध्दस्तावत् चिंतामग्न: परे ब्रह्मणि कोऽपि न लग्न: ।।*

भारत देशांत अद्वैताचा सूर्य होऊन सर्वत्र संचार करून ब्रह्माचा प्रकाश शंकराचार्यांनी सर्वत्र पसरविला, ''पण किती जणांनी त्या प्रकाशाकडे लक्ष दिले ? कोणी नाही.'' म्हणतात शंकराचार्य ! ''बालकांना सांगितले. ते क्रीडासक्त होते. युवकांना सांगितले. ते संसारासक्त होते. वृध्दांना सांगितले. ते चिंतामग्न होते. माझ्या बोलण्याकडे कोणीच लक्ष दिले नाही. ब्रह्म सत्य जाणण्याची आसक्ति कोणीच दाखविली नाही !''

विषय जसे दिसतात, तसे ब्रह्म सत्य कां बरे दिसत नाही ? एक प्रकारचे धुके आपल्याभोवती पसरले आहे. म्हणून आपणांस दिसत नाही. पण दिसत नाही म्हणून ते सत्यच नव्हे असे नाही. सत्य आहे. निरंतर आहे. स्पष्टच आहे. पण आम्हांला दिसत नाही. अंधाराने आपली दृष्टि व्यापून टाकली आहे.

**ऊर मध्यद कण्ण काडिनोळगे**
**बिद्दैदावे ऐदु हेणनु. बंदु बंदु**
**अळुवरु, बळग घनवाद कारण !**
**हेणनू बेयदु, काडू नंददु,**
**बरिमाड उरियित्तु गुहेश्वरा !**

**ऊर मध्यद कण्ण काडु :** डोळ्यांना दिसणारे अरण्य ! या विश्वामध्यें विषय प्रपंच रूपी डोळ्यांना दिसणारे अरण्य पसरले आहे. या अरण्यामध्ये- या संसारामध्ये पांच मढी-शव पडले आहेत. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पांच शव जड विषय. यांच्यासाठी येऊन रडणारे खूप जण. त्यांचा समाज फार मोठा. भूमंडलावर उतरून आलेले सर्वजण या विषयरूपी मढ्यांसाठी परिश्रम करतात. हपापले आहेत त्यांच्या प्राप्तीसाठी, दुःखी होतात, रडतात सर्वजण !

कामिनि-कांचनासाठी हा लोक बिघडला. **'बळग घनवाद कारण'** लहान मोठे सर्वजण कनकादि साठी कातर झाले आहेत. या कनकादि विषयांमध्ये सत्यता नाही इकडे कोणाचेच लक्ष नाही. कां बरे ? सर्वजण विषय व्यथित झाले आहेत म्हणून. आपण या विषयरूपी मढ्यांसाठी रडतो, ते योग्य ? की अयोग्य ? असा संदेह सुध्दा यांच्या मनांत येत नाही. मी रडत असतांना इतर कोणीही रडत नसतील तर मी दुःख करणें योग्य आहे की अयोग्य आहे ? असा संशय उत्पन्न होतो. मी जसा रडतो तसेंच सर्वजण रडत असतील तर कसा बरे संशय येईल ? या प्रपंचाच्या पाठीमागे धांवून आपण दुःखी-कष्टी झालो आहोत. आमच्या सारखे सर्वजण दुःखी-कष्टी आहेत. इंद्रापासून चंद्रापर्यंत सर्वजण या संसाराची आशा धरणारेच. असे

असतांना रडणे चूक आहे असे सांगण्याची शक्ति कोणाला आहे ? सर्वजण बहुपत्निक असतील तर बहुपत्निक पध्दति योग्य की अयोग्य ? हे सांगण्याचे साहस कोण करेल ?

संसार हा विषयांचे मढे. शव. सर्वांनाच दिसते. ते निर्जीव. ते विषय आम्हांला जाणूं शकत नाहीत. पण ते आम्हांला आवडतात. मोह पाडतात. त्याच्या प्राप्तीसाठी केवढी धडपड ? केवढा संघर्ष ? कनक कामिनी आदि जड आहेत, याचा निश्चय आपण करूं शकत नाही.

पैसा कोणाच्याही हाती गेला, तरी तो आपल्या आधीच्या मालकाचे स्मरण करीत नाही. यानंतरचा मालक कोण ? माहीत नाही. चोराने चोरी केली तर त्याच्या खिशांतील पैशाला, 'हा चोराचा खिसा. हे स्थान आपणांस योग्य नाही.' असे समजत नाही. म्हणूनच ते मढे. ते शव ! धनाला 'शव' म्हणून संबोधण्याचे धैर्य संतांना-ज्ञानी जनांना मात्र ! सामान्य जनांना पैसा अत्यंत प्रिय. पैसा म्हणजे परमेश्वर ! तोच परमार्थ !

**''बिद्दैदावे ऐदु हेण !''** पांच शव पडले आहेत. **''बळग बहळ दोड्डु''** सगळेजण विषयांमागून धांवणारेच. ''कनक, कामिनि-कीर्ति'' या तीहींच्या पाठीमागे सगळे जग धांवते आहे. शवाचे बांधव हे !

कनक-कामिनी-कीर्ती यांच्या मागे जग धांवते. या तीहींच्या मागे त्रैलोक. आपण कल्पिलेले देव-देवता हे सुध्दा यांच्या आकर्षणांतून सुटले नाहीत. ''एखादा अलंकार अथवा एखादा छोटासा दागिना आपला नवस बोलणारा भक्त कधी बरे आणून देईल ?'' म्हणून देवता आतुरतेने वाट पहात असतात. भक्त करीत असलेल्या स्तुतीसाठी आणि नवस फेडणाऱ्या भक्तांनी

अर्पण केलेल्या वस्तूंच्या प्राप्तीसाठी या देवता कांहीही वर द्यायला सिध्द असतात. देवतांची ही अवस्था ! तर मग मानवाची काय कथा ? मानव सगळे 'पांचां'चे भक्त. विषय लोलुप. म्हणूनच अल्लमप्रभुनीं आम्हां सर्वांना 'शवांच्या' समाजांत ढकलले. ''हा माझा समाज नव्हे. गुहेश्वर लिंगाचा समाज नव्हे तर विषयरूपी शवाचा समाज !'' म्हणाले.

**'ई हेणवु बेयदु'** येवढे जगांतील सर्व लोक आपल्या प्राप्तीसाठी रडतात म्हणून भाजून, गोड होऊन हे विषयरूपी शव सर्वांना तृप्ति देतील काय ? नाही **'काडु नंददु'** अरण्य विझणार नाही. या जगाची आशा तुटणार नाही. **'बरि माड उरियित्तु गुहेश्वर !'** केवळ आयुष्याची राख झाली. संपूर्ण आयुष्य या विषयांसाठी धांवून व्यर्थ गेले. इकडे विषय प्राप्त होऊन धांवणे सार्थक झाले नाही. तिकडे परमार्थ ही लाभला नाही.

खूप धन संपादन केले. सोने-नाणे घर-दार सगळे सगळे. सर्वांकडून प्रशस्ती, मान, गौरव उघे-चांगभला सगळे कांही मिळविले. पण त्यांच्या प्राप्तीने आशा तृप्त झाली कां ? संतुष्टि लाभली कां ? जीवन पूर्ण झाले कां ? कांही झाले नाही. केवळ आयुष्य गेले. फुकट. अंधारांत. डोळ्यांपुढील अंधाराचा माया-पटल दूर झाला नाही.

***ज्योति कंडा, इरलु कत्तले कंडा !***
***निधान कंडा, इरलु बडतन कंडा !***
***प्रसाद कंडा, कंडोडे प्रळय कंडा !***
***गुहेश्वर कंडा, इढु भ्रांत कंडा !***

अल्लमप्रभूनी आमच्या अवस्थेचे वर्णन केले आहे. या जगामध्यें सत्याची ज्योति पेटली आहे; भगवंताचा प्रकाश प्रज्वलित झाला आहे.

आपणांला कांहीही दिसत नाही. लौकिकाशिवाय अन्य कांही दिसत नाही. या विश्वामध्यें देव आहे काय ? दैवि-सत्य आहे काय ? असा संदेह उत्पन्न होण्यायेवढा दाट अज्ञानाचा अंधार आपल्या दृष्टीला व्यापून राहिला आहे.

**'निधान कंडा इरलु बडतन कंडा'** निधान पाहिले. पण निधान असूनही दारिद्रय पाहिले. विश्वामध्ये अगणित संपत्ति भरून राहिली आहे. कशाचीही कमतरता नाही. जलाशय आहेत. मेघ जल वर्षाव करीत आहेत. सदाबहार अरण्यें पसरली आहेत. कधीही न संपणारे अवकाश पसरले आहे. त्यांत अनेक तेजोराशी चमकत आहेत. निसर्ग केवढा श्रीमंत ! आपण जेथे राहतो, त्या जगांत संपत्ति भरून राहिली आहे ! परंतु आपण मात्र गरीब ! दीन द्रारिद्री.

'प्रसाद' भगवत्कारूण्याची वस्तु. हे सर्व जग म्हणजे देवाने प्रसन्न होऊन दिलेला प्रसाद. आपण सेवन करतो तो देवाचाच प्रसाद. देवाच्या अनुग्रहानेच प्राप्त झालेली ही सुखे ! येवढे असूनही जन्म-मरणाचा फेरा चुकला नाही. प्रसादामृताचा अनुभव आपणांस तृप्ति देऊं शकला नाही. तसे पाहिले तर हे आंतर बाह्य जगत-सर्व गुहेश्वर लिंगच होय. सत्य होय ! पण आमच्या दृष्टीने हे जगत म्हणजे 'भ्रांति' ! मोहमूल !

जेथे 'गरीबी' असे वाटते, तेथेच श्रीमंती पाहावी. जेथे जन्ममरण भय वाटते तेथेच अभयावस्था उत्पन्न व्हावी. जेथे हा भ्रम असे वाटते, तेथेच गुहेश्वर लिंग दिसावे. आमच्या मधला अंधार नाहीसा व्हावा. आंपल्याठिकाणी असलेली भयाची कल्पना दूर व्हावी. येवढेच नव्हे तर आपण ज्याला जगत, जगत् असे म्हणतो, अशा जगांतच गुहेश्वर लिंगाच्या अस्तित्वाचे भान यावे. हे यावे यासाठी जे कांही करावे लागते, तेच 'भगवच्चिंतन' होय.

‘‘विषयः विनिवर्तंते ।’’ विषय निवृत्त होतात. केव्हां ?

‘‘निराहारस्य देहिनः ।’’ विषय आपणांस सोडून दूर जाऊं शकतात. पण विषयानुराग दूर होत नाही.

‘‘रसवर्ज्यं’’ विषयांविषयी अनुराग दूर होणे कष्ट. आपण फार तर पत्नी, मुले, बाळे, घर-दार यांचा त्याग करूं. कोठेतरी दूर जाऊं. पण सोडलेल्या वस्तूंचा रस शिल्लक असतो. विषय दूर झाले तरी रस शिल्लक राहतो.

एका शहरांत एक युवक होता. विशाल घर, सुशील पत्नी. दोनच गोजिरवाणी मुले, भरपूर संपत्ति, बंधु-बांधव, एकदां प्रवचनाला आला. त्याने प्रवचन ऐकिले. त्याच्या मनांत वैराग्य उत्पन्न झाले. घराकडे न जातां तो सरळ हिमालयाकडे निघून गेला. प्रशांत, निर्जन स्थानीं त्याने वास केला. घोर साधना केली. संन्यासी झाला. कित्येक वर्षे लोटली. एकदां तेथे यात्रिक संन्यासी आले त्यांच्यापैकी एक जण युवक होता. तेजस्वी होता. हिमालयांत वास करणाऱ्या जेष्ठ संन्याशाने युवा संन्याशाची विचारपूस केली. तो आपल्याच मूळ गांवचा हे त्याला समजले. त्याने आनंदाने युवा संन्याशाचा आदर सत्कार केला. गांवाविषयी विचारपूस करूं लागला.

‘‘आता तुझा गांव कसा आहे ?’’

‘‘फारच छान !’’

‘‘अमुक या गल्लीमध्यें अमक्या तमक्याचे घर आहे. तुला माहित आहे कां ?’’

‘‘मी ही त्याच गल्लीमध्यें राहतो. आपण विचारता आहांत त्या घरांत

एक फारच सज्जन माणूस होता. तो पत्नि-मुले, घर-दार सर्वांचा त्याग करून हिमालयांत गेला आहे !''

''त्या घरांतील ती मुले आणि ती महिला कशी काय आहेत ?''

तो युवा संन्याशी म्हणाला, ''साधु महाराज, आपण कोण ? ते मी ओळखले. येवढी आसक्ति असेल तर आपण परत घरी जावे हे बरे ! तुम्ही सर्व कांही त्याग करून आला असलांत तरी घराची आसक्ति, तो विषय-रस तसाच उरला आहे.''

'विषयः विनिवर्तंते' दूर गेले की विषय मागे पडतात पण त्या विषयां विषयींचा रस तसाच शिल्लक उरतो. तो जायचा असेल तर 'परवस्तु दर्शन' 'सत्य:ज्ञान' आवश्यक ! त्यासाठी देव-चिंतन. अनंत सत्य असे अमूल्य तत्व आहे. असे ज्ञान झाले तर अज्ञानाचा अंधार दूर होतो. रस सुकतो. चिंतनासाठी दोन गोष्टी आवश्यक. एक सत्संग. दुसरे श्रवण.

अंधार नाहीसा व्हायला सूर्योदय व्हावा लागतो. तसेच मनाची कराळ काल-रात्र संपवण्यासाठी संतांचा संग, शिवशरणांचा अनुभाव आवश्यक होय. संत-संग आपणांस निर्भय बनवितो. अनुभाव वचन श्रवणाने आपण आध्यात्मिकपणे अधिक श्रीमंत होतो.

*''शिवपथनरियलु गुरुपथ''*
*''कूडल संगम देवन अरियलु, शरणसंग''*

बसवण्णांनी म्हटले, ''शिवपथ जाणण्यासाठी आधी गुरुपथ हवा. कूडल संगम देवाला जाणायचे असेल तर शिवशरणांचा संग हवा !''

प्रवचन आणि संतदर्शन फार महत्वाचे. आपण प्रवचन ऐकावे. नियमितपणें, दीर्घकाळ ज्ञानी-अनुभावी शरणांचा उपदेश ऐकावा. ऐकलेले सर्वच शीघ्र फळ देईल असा त्याचा अर्थ नव्हे. ऐकत राहिले की परिवर्तनाचा एखादा क्षण अवश्य येतो. उगाच ऐकत असावे. ऐकण्यांतच शिव शरणांचे, ज्ञानियांचे दर्शन घडते. संत संग घडतो. त्या दोहोंच्या परिणामाने एकदां परवस्तूचे भान उत्पन्न होते. सांसारिक रस आटतो.

शिवशरणांनी अनुभव मंटपाची निर्मिती केली. दररोज नियमितपणें ठराविक वेळी सर्वजण शेकडो-हजारो शिवशरण जमा होत. समूहांत शिव वातावरणाची निर्मिती होत असे. तेथे बसलेल्या अत्यंत सामान्य माणसामध्येंसुध्दा 'देव' भाव उत्पन्न होत असे. सर्वांचे अंतःकरण अनुभावावतरणासाठी सन्नध्द होत असे. प्रापंचिक, मायिक बंधने गळून पडत.

सत्संग फारच सुलभ साधन. एकांतांत घोर तपश्चर्या केली तरी लभ्य न होणारा आनंदानुभव सत्संगाने सहज प्राप्त होतो. सत्संगामध्यें कोण सांगतो ? कोण ऐकतो ? याला महत्व नाही. तेथे असलेला पवित्र परिसर महत्वाचा. सांगणे-ऐकणे हे निमित्त मात्र. परिसर 'शिव' असेल तितके मन उमलते. तेथे ज्ञान-ज्योति प्रज्वलित होते. मुक्तीचा अनुभव उत्पन्न होतो.

सत्संगाचे महत्व फार मोठे.

*''करियनित्तडे ओल्ले*
*सिरिय नित्तडे ओल्ले*
*हिरिदप्प राज्यव नित्तडे ओल्ले*
*निम्म शरणर सूळ्नुडिय ओंदरगळिगे इत्तडे*
*निम्मनित्ते काणा रामनाथा !''*

**भावार्थ :** मला कोणी हत्ती दिला तरी नको. श्रीमंती दिली तरी नको. मोठे राज्य दिले तरी नको. तुमच्या शिवशरणांची प्रासादिक वाणी अर्धा क्षण जरी ऐकायला मिळाली तरी रामनाथा, तुमची प्राप्ति सहज होईल.

आपण येवढे राबायचे-मिळवायचे कशासाठी ? सत्संगाच्या वातावरण निर्मितीसाठी. ज्या वातावरणांत 'मी' हा भाव माझ्या ठिकाणी उत्पन्न होत नाही. 'मी' हा भाव तुमच्या ठिकाणी उत्पन्न होत नाही. असे वातावरणच 'सद्' वातावरण होय. ''मी सांगणारा'' ''मी उपदेशक'' हा भाव माझ्या मनांत उत्पन्न झाला तर तो सत्संग होत नाही. 'आपण ऐकणारे' हा भाव तुमच्या मनांत उत्पन्न झाला तर तो सत्संग नव्हे. सांगणारा-ऐकणारा हा भाव नको. ज्ञान मग्नता अधिक महत्वाची.

सांगणारा 'मी' हा एक माध्यम. ऐकणारे तुम्ही, एक माध्यम ! विश्वनियामक क्रिया चेतनाचे आपण उभयतां-साधन होय. अशी कल्पना केली तर अनुभाव शक्य होतो. 'मी' नसलेले सांगणे-ऐकणे यांमध्ये दिव्य-प्रकाश तात्काळ उत्पन्न होतो.

बसवेश्वरांचे कल्याण येथील अनुभव मंटप वैशिष्ट्यपूर्ण होते. तेथे कांही ठराविक लोकांनी बोलावे, इतरांनी ऐकावे असा नियम नव्हता. सांगण्याच्या प्रसंगी सांगावे. ऐकण्याच्या प्रसंगी ऐकावे.

शून्य सिंहासनारूढ व्हायच्या वेळी अल्लमप्रभू सिंहासनारूढ झाले. अनुभव चालविला. पण त्या सिंहासनाला ते चिकटून राहिले नाहीत. कधीही. जितक्या सहजतेने ते सिंहासनारूढ झाले, तितक्याच सहजतेने सिंहासन सोडून निघून गेले. म. बससेश्वरांनी निर्मिलेला अनुभव मंटप म्हणजे अनुभावी,

ज्ञानी जनांचा सत्संग ! विमल ज्ञानियांचे मिलन ! संमिलन !

अनुभव मंटपामध्ये सर्वांना बोलण्याचे स्वातंत्र्य होते. नूलिय चंदय्य (दोर वळण्याचा उद्योग करीत) एका पध्दतीने सांगे तर आय्दक्की मारय्या (खळ्यांतील भात वेचण्याचा उद्योग करीत.) दुसऱ्या रीतीने सांगे. आपण जसे सांगतो तेच खरे ! तेच ऐकले पाहिजे असा आग्रह अल्लमप्रभूनी नाही धरला. बसवण्णानी नाही धरला. मुक्त वातावरणात. तेथे सर्वजण बोधक होते. सर्वजण साधक होते. जीवनांत अशा अमूल्य सत्संगाची फार आवश्यकता आहे. त्यामुळेंच चिंतन साध्य होते. यामुळेंच चेतनानुभूति. आनंदानुभूति !



## २४

जेथे भेद आहे, अशा वस्तूचे वर्णन करणे सोपे. फूल वेगळे, फळ वेगळे. त्यांचे आकार, वर्ण, गंध सगळे वेग-वेगळे. ही भिन्नताच ज्या त्या वस्तूचे विशेष रूप. फारच चांगल्या रीतीने त्या वस्तूंचे वर्णन करतां येईल. मी तुमचे वर्णन करूं शकेन. तुम्ही माझे वर्णन करूं शकाल. तुमचे माझे देह, भावना, विचार भिन्न-भिन्न. ही भिन्नतांच माझी आणि तुमची विशेषता. ती भिन्नता ओळखणे हेच वर्णन. सामान्यपणे ही विशेषता विश्वव्यापी आहे. आंत ही मनोविश्वाला व्यापून आहे. बाह्यांतर जगत् सविशेष ! वर्णनीय !

माझ्या आणि तुमच्यामध्ये असलेले विशेषांश काढून टाकले तर ते तत्व आधारभूत होऊन राहते ते निर्विशेष होय. तेथे 'मी' नाही 'तुम्ही' नाही. पण ज्याचे वर्णन करतां येत नाही असे अद्वय सत्य आहे ! तेथे विशेषांश नसलयामुळे 'दोन' (द्वय) ही कल्पना शून्य ! ते अ-द्वय !

दोन संख्येमधील विशेषांश काढून टाकला तर जे राहते ते शून्य ! संख्या दोन असल्या तरी शून्य दोन असत नाहीत. सर्व संख्यांचे निर्विशेष तत्व एकैक अथवा अ-द्वैत, शून्य. संख्येला मूल्य. शून्याला नाही. शून्यामध्ये लहान शून्य, मोठे शून्य नाही. आकाशांत असो, भूमंडलांत असो, शून्य ते शून्यच. मोजमापाला वेद्य अशी विशेषता. त्यामध्यें नाही. तो निर्विशेष.

''आपण असे, तुम्ही तसे.'' असे जोपर्यंत आपण वर्णन करतो, तोपर्यंत आपली विशेषावस्था. हे विशेषांशाचे क्षेत्र आपण ओलांडले पाहिजे. तसे ओलांडण्याने आपण दैहिक रूपाच्या पलीकडे जातो. मनाच्या विचारांच्या पलीकडे पोहचतो. 'मी' 'तूं' या भेद भावाच्या पलीकडे पोहोचतो. तेव्हा 'आम्ही' म्हणजे केवळ 'मी' नव्हे अथवा केवळ 'तुम्ही' नव्हे. ते अविशेष सत्य ! ते माझे नव्हे. ते तुमचे नव्हे. ते मीही होय; तुम्ही ही होय ! 'मी' 'तुम्ही' हा भेद नसलेली घन वस्तू !

राम, कृष्ण वेगवेगळे. राम त्रेतायुगांत होऊन गेला. दशरथ पुत्र. सीतेचा पती. अयोध्येचा राजा. लव-कुश यांचा पिता. कृष्ण द्वापर युगांत होऊन गेला. वसुदेवाचा पुत्र, राधा-रमण द्वारकेचा राजा. हजारो मुलांचा पिता. राम आणि कृष्ण यांच्यामधील विशेषांश गळून पडला तर उरतो तो राम मूळ ! कृष्ण मूळ ! तो एक विष्णु; निर्विशेष. विशेष म्हणजे अवतार. निर्विशेष म्हणजे मूळ देव. मी असो, तुम्ही असो, एका दृष्टीने पाहिले तर अवतारच ! म्हणजे विशेषांशच. भेद क्षेत्र अवताराचा. अभेद क्षेत्र, मूळ देव ! अभेद क्षेत्रांत प्रवेश केला तर राम-कृष्णादि नाहीत. मी-तुम्ही नाही. कोठे ? एकाच तत्वांत ! त्यामुळे आपण सर्वजण एकाच वस्तूचे विविध अवतार आहोत. फरक येवढाच, की त्यांना आपल्या निर्विशेषाचे भान आहे. आम्हाला नाही. या अर्थाने पाहिल तर मात्र आम्ही अवतारी नव्हे.

*यदा यदा ही धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।*
*अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहं ।।*

''धर्माची ग्लानी जेव्हा जेव्हा होईल, तेव्हां तेव्हां मी अवतार घेईन.'' असे कृष्ण म्हणाला. पण धर्माची ग्लानी कोणत्यातरी कालखंडात होते असे

नव्हे. सतत, सर्व काल-खंडांत कोठे ना कोठे तरी ग्लानी होते. तेव्हां, तेव्हां तेवढे सुधारण्यासाठी अवतार होतच असतो.

अवतार म्हणजे वरून खाली उतरणे नव्हे. कारण देव वरती आहे; तो खाली नाही असे नव्हे. त्याच्या ठिकाणी वर-खाली हा भेदभाव नाही. वर असेल तर खाली येणे. अवतरणें! 'ईशावस्यमिदं सर्वं' तो सर्वत्र भरून राहिला आहे. प्रत्येक जड-चेतन वस्तूंमध्ये तो आहे. अणू-रेणूंमध्ये. म्हणूनच अवतार म्हणजे मी माझ्या आंतरबाह्य असलेल्या निर्विशेष सत्याचे ज्ञान प्राप्त करून घेतलेले असेन तर माझ्यामध्यें भगवंत अवतरला असा त्याचा अर्थ. आत्मभाव नसेल तर आम्ही सामान्य-जन. आत्मभाव असेल तर अवतारी. एकेका कार्यासाठी आलेले.

''आपणांपैकी कांहीजण एका घराचा उध्दार करण्यासाठी आलेले. कांहीजण एक लहानशा समाजाचा उध्दार करण्यासाठी आलेले. एका देशाचा उध्दार करण्यासाठी आलेले काहींजण.'' असे आपण निश्चितपणे समजून चुकलो आहोत. म्हणूनच, ''आपण नसलो की हे घर चालत नाही.'' असे आपण म्हणतो. ''माझ्या नजरेसमोर माझी मुले असा स्वैराचार करीत आहेत. मी गेल्यावर या घराचे कसे होणार ?'' असे म्हणून आपण दु:खी कष्टी होतो.

याचा अर्थ असा असावा की, ''या घराचा उध्दार करण्यासाठी, या पत्नी-मुलांचे रक्षण करण्यासाठी, या घरांत शांति-समाधानाच्या प्रतिष्ठापनेसाठी, संपत्तिवर्धन करण्यासाठी आम्ही अवतरलो. आम्ही प्रापंचिक अवतारी ! या प्रपंचाचे अवतारी !''

प्रपंचाचे संवर्धन करण्यासाठी आलेले अवतारी वेगळेच आणि दिव्य प्रज्ञा भूमंडळाला अभिव्यक्त करण्यासाठी आलेले अवतारी वेगळेच.

मनःपटलावर थोडीशी धूळ पडली. तशी धूळ पडल्याने निर्विशेषतेचा भाव आला नाही. विशेषताच प्रधान झाली. घर बांधतांना भव्य-प्रशस्त-स्वच्छ असे बांधले तरी कलांतराने तेथे केर-कचरा, धूळ पडणारच. पडतच राहणार. त्याचप्रमाणे जगत्. तेही एक विशाल घरच. कोट्यावधी वर्षांपूर्वी निर्माण झालेले. यात ही जमीन, पाणी, वारा, अग्नि यांच्यामुळे धूळ, मालिन्य होणारच. कोणतही स्थळ सदा स्वच्छ राहू शकत नाही. जेथे जेथे भेद आहे, तेथे तेथे धूळ पडणारच. फरक येवढाच की धुळीचा प्रकार वेग-वेगळा.

गरीबांच्या घरांत धूळ पडते. श्रीमंतांच्या घरांतही धूळ पडते. पापी जनांच्या घरांतही धूळ पडते. पुण्यवान योग्यांच्या आश्रमातही धूळ पडते. जगांत सगळीकडे धूळ पडतच असते. तसेच मनांतही धूळ पडते. विविध व्यक्तींना पाहिल्यानंतर, समाज पाहिल्यानंतर, विभिन्न भावनारूपी धूळ मनांत पडते. मन हे सुध्दां एक घरच. इंद्रिये हे या घराच्या खिडक्या. या खिडक्यांमधून धूळ घरांत येते. बाहेरील धूळ झाडलोट केले की सहजपणें नाहीसे होते. पण आंतील धूळ तेवढ्या सुलभतेने जात नाही. ते कसे झाडून काढावे ? हे ही आपणांस समजत नाही.

*''मने योळगे मनेयोडेयनिद्दानो इल्लवो ?*
*होस्तिलल्लि हुल्लु हुट्टि, मने योळगे रजतुंबि*
*मने योळगे मने योडेय निद्दानो इल्लवो ?*
*तनुविनोळगे हुसि तुंबि, मनदोळगे विषयतुंबि*
*मनेयोळगे मनेयोडेयनिल्ल कूडल संगमदेव !''*

**भावार्थ :** घरात घरचा मालक आहे की नाही ? उंबरठ्यांत गवत उगवले. घरांत केर भरला. घरांत घरचा मालक आहे की नाही ? देहामध्यें खोटेपणा

भरला. मनांत विषय भरले. घरांत घरचा मालक आहे की नाही ? कूडल संगमदेवा !

हे आपल्या घराचे चित्रण महात्मा बसवेश्वरांनी फारच मार्मिक रीतीने केले आहे. उंबरठ्यांत गवत, घरांत धूळ. घरांत मालक असता तर तो जागरूकपणे झाडलोट, साफ-सफाई करत राहिला असता. तर मग उंबरठ्यांत गवत माजले नसते. घरांत धूळ सांचली नसती. बाहेर गवत माजले आहे. आंत धूळ भरली आहे. याचा अर्थ मालक घरांत नाही. अथवा तो जागृत नाही. अथवा तो उन्मत आहे.

देह हेच घर. जीभ आणि हात म्हणजे उंबरठा. त्यांत गवत माजले आहे. बोलण्यांत, हाताच्या कृतींत; खोटेपणा भरला आहे. खूप खूप ! धार्मिक क्षेत्र असो वा सामाजिक क्षेत्र असो, सगळीकडे असत्याचे तण माजले आहे. देव मंदिर असो, मठ-आश्रम असोत, कचेरी असो, शाळा-कॉलेज असो; व्यापारी केंद्र असो, ग्राम असो वा शहर, गल्लीपासून दिल्लीपर्यंत सगळीकडे सत्य नामशेष झाले आहे. खोटपणाचे हिरवेगार तण सगळीकडे माजले आहेत.

आंत सुध्दां तीच स्थिति. तेथे असमाधानाची धूळ. द्वेष मात्सर्याचा कचरा खूप माजला आहे. तो स्व-पर नाशक कचरा. जीवनाचे सौंदर्य नासून टाकणारे तण. अकारण असामाधान. मला पाहिल्याने तुम्हाला आणि तुम्हांला पाहिल्याने मला हर्ष व्हावा. पण तसे होत नाही. तुमच्याकडून कांहीतरी मिळविण्याची मला आशा, ते साधले नाही तर तुमच्या विषयी माझ्या मनांत द्वेष ! संन्यास जीवनांतसुध्दा ही धूळ.

माझ्या बोलण्याची पध्दत तुमच्यापैकी अनेक लोकांना आवडत नसेल. तुम्हांलाही असमाधान. मी उल्लेख करतो. तो बुध्द, बसव, लाआत्से, शंकर

तुमच्यापैकी अनेकांना न आवडणे शक्य आहे.

काय हे आपले जीवन ! अशांत ! धूळ ! धूळ !

हे फूल पाहून डोळे तृप्त व्हावेत. याच्या सुगंधाचा आस्वाद घेऊन हृदय विकसित व्हावे. मी असो, तुम्ही असो परस्परांना पाहून, हे जग पाहून संतुष्ट व्हावे. तुम्ही खूप परिश्रम करून घर, शेत, धन संपादन केलेले साहसी, श्रमवीर ! प्रपंचाच्या व्यवहारांतून सुध्दां वेळ काढून येथे येऊन तन्मय होऊन प्रवचन ऐकता आहांत. तुमचे प्रसन्न मुख पाहून मला समाधान झाले नाही तर माझ्यामध्यें सुध्दां 'घरचा मालक घरांत नाही' असाच त्याचा अर्थ !

''मात्सर्य !'' त्यांनी चांगलीशी चप्पल पायांत घालून रस्त्यांत चालायला सुरूवात केली तर ते पाहून मला ताप होत असेल तर ते मात्सर्य ! मी बसलेले हे मऊ मऊ व्यासपीठ पाहून कोणाला ताप होत असेल तर ती असूया ! मात्सर्य म्हणजे पोटांत पेटलेली आग. कारण नसतांना पेटणारा अग्नि ! कोणाचे तरी भव्य घर पाहिले तर मला ताप ! शेजारच्या शेतकऱ्याने घाम गाळून मोत्यासारखे पीक घेतले तर ते पीक पाहणाऱ्याच्या पोटांत सहन न होण्यासारखी तळमळ ! आग ! आपोआप आपल्या घरांत पडते म्हणून त्याला बसवेश्वरांनी 'धूळ' असे म्हटले आहे.

इतिहासाच्या प्रत्येक पानांत पाहा ! मात्सर्याच्या कथा ! किती अद्‌भुत कथा ! रामायण, महाभारतांत शेकडो कथा ! मात्सर्याने भरलेल्या. त्या केवळ भूत काळांतल्या कथा नव्हेत. वर्तमान आणि भविष्यांत सुध्दा त्याच कथा. सार्वकालिक कथा ! आपल्या सर्वांच्या जीवन गाथा !

दरवाजांत उगवलेले खोटे पणाचे तण निपटून काढावे. मनांतील

जळमटे-धूळ झटकावी. हे कार्य करण्यासाठीच तर भगवंताने साधु संतांना, शिवशरणांना या भूमंडलावर तर पाठविले नसेल ? संत महंत वाऱ्याच्या झुळकीप्रमाणे आपल्या घराभोवती, आपल्याभोवती संचार करूं लागले की आपल्या मनांत, आपल्या अंगणांत सांचलेली धूळ आपल्या अमृतमय वाणीने, करूणार्द्र दृष्टीने झटकून टाकतात. इंद्रियरूपी खिडक्यांतील केरकचरा झटकून टाकतात. स्वच्छ करतात.

' महावीर आला. अनुरागाची धूळ झटकून, विरागाचा सुगंध जगांत पसरून गेला. बुध्द आला. दुराशा झाडून गेला. बसवण्णा आला, उच्चनीच भेदभाव नष्ट करण्याचा प्रयत्न करून गेला. आचार्य शंकराने अज्ञानाची धूळ झटकून टाकली. ''किल्मिष पसरण्याचे कारण म्हणजे समंजस पणाचा अभाव. सत्य, वस्तू योग्यरीतीने न पाहणे.'' असे शंकर म्हणाले.

माणसाने जगाकडे नीट निरखून पाहिले असते तर त्याच्या मोहजालातून मुक्त राहिला असता. सिगारेटच्या पाकिटावर छापलेले नीट वाचले असते. त्याचा अर्थ समजून घेतला असता तर सिगारेट ओढायचा प्रसंगच आला नसता ! वाचतां येत असूनही वाचण्याचा प्रयत्न केला नाही. वाचूनही वाचले नाही. ***Injurious to some-body's health*** असे वाचले. सगळीकडे असेच. ज्ञानदृष्टीचा हा निमेषच सर्व कल्मषांचे प्रधान कारण !

आपले ज्ञान नेत्र उघडले नाही. मिटलेले. त्यामुळे जगत् दिसले तरी जगायचे सत्य दिसत नाही. उदा. ''आहार पदार्थांत भेसळ करूं नये'' हे आपणांस फारच चांगल्या रीतीने ठाऊक आहे. पण हा नियम विकत घेतांना. आपण विकतांना नव्हे. चोरी, निंदा, असूया, वाईट ! आमच्यासाठी नव्हे. इतरांसाठी. म्हणूनच आचार्य शंकर, महात्मा बसवेश्वर आदिनी 'ज्ञान' रूपी

झाडू आणून जगाचे अंगण झाडून स्वच्छ केले. हजारों मनांतील जळमटे झटकली. कांही मनें स्वच्छ झाली. पण लाखो मने-घरे तशीच राहिली. अजून राहिली आहेत. आपला झाडू येथेच टाकून देऊन ते अंतराळांत विलीन झाले.

ते झाडू जेथे पडले, तेथेच पडून आहेत. कोणीही ते झाडू उचलून घेऊन त्यांनी आपले घर-मन स्वच्छ केले नाही. आपण आवाहन करतो, ''बसवा, तूं या जगतावर पुन: अवतरून ये. अत्यंत आतुरतेने तुझ्या आगमनाची वाट पाहतो आहोत; तूं नाही आलास तर आम्हांला त्राता नाही.'' अशी प्रार्थना आपण करतो. पण त्यांचा ज्ञानरूपी झाडू घेऊन अज्ञान झाडून टाकण्यास तयार नाही.

ते शंकराचार्य, ते महात्मा बसवेश्वर आपले विचित्र वर्तन पाहून विचारतील, ''आम्ही आमचे झाडू मजबूतपणें बांधून ठेविले आहेत. त्यांचा उपयोग कसा करावा हे सुध्दां प्रात्यक्षिकाने दाखविले आहे. तुम्ही कां बरे त्यांचा उपयोग करूं नये ? तुमच्या आळशीपणाला पाहून आम्हाला तुमची दया येते.'' असे तर म्हणणार नाहीत ?

जगाच्या साधु-संतांचा उपदेश, शिवशरणांची वचने म्हणजे अज्ञानाची धूळ झाडणारे झाडूच ! घ्या ते उचलून ! निरखून पहा त्यांच्याकडे. कसा त्यांचा उपयोग करायचा ते ! आंत बाहेर सगळीकडे झाडलोट करून अंतर्बाह्य स्वच्छ करून घ्या !

''तूं स्वत:ला सुधार ! जग आपोआप सुधारते.'' युरोपियन चिंतकाचा हा उपदेश ! आमच्यापैकी अनेक लोकांना आमच्या देशांतील संतांचा उपदेश आवडत नाही. परदेशांतील चिंतकांचे वचन त्यांना प्रमाण ! आमच्या देशांत

उत्पन्न होणारा कापूस ! मँचेस्टरचा शिक्का मारलेले कापड आम्हांला अत्यंत प्रिय. आमच्या संतांचा उपदेश आंग्ल भाषेच्या वाऱ्यावर स्वार होऊन आला तर स्वीकारार्ह ! कसेही कां असेना ? आपले जीवन स्वच्छ झाले तरी पुरे !

दीप प्रज्वलित झाला होता. तेव्हां आपण झोपलो. आठ-दहा शतके वाट पाहून दिवा विझला. आपण झोपलो. आमची वाट पाहून पाहून कंटाळून ते निघून गेले. ते नाहीत असे स्वप्नांत पाहून आपण चडफडलो. बसण्णा, अल्लमप्रभु, बुध्द आपल्या काळांत नाहीत म्हणून. बुध्द, महावीर, अल्लमप्रभूसारखे लोक आजच्या काळांत नाहीत काय ? कोणत्याही काळी, सर्वकाळी असतातच. पण हेच ते ! असे ओळखतां येत नाही. बसवण्णाने मादरस मादलांबिकेच्या पोटीच जन्म घ्यावा काय ? ते कसे शक्य आहे ? संत, शरण, ऋषींची कमतरता आहे काय ? पण हे संत-ऋषि असे पाहण्याची स्वच्छ दृष्टि कोणाला लाभली आहे ? स्वच्छ हृदय कोठे आहे ?

हृदयांतील द्वेष, मात्सर्य, खोटेपणा काढून टाकून भगवंताकडे पाहिले तर निर्विशेष भगवंताचे दर्शन होते. शिवशरणांच्या वचनांचे सहाय त्यासाठी आवश्यक. संतांची वाणी उपयोग करून आमचे घर, आमचे मन स्वच्छ करून घ्यावे. ज्याक्षणीं हृदय निर्मळ होईल, त्याचक्षणीं त्याठिकाणी असलेला जीव निर्विशेष होतो. त्या निर्विशेषतेने अखंडतेचे भान होते. ती अखंडता म्हणजेच भगवंत ! असे भगवत् अवतरण आपल्या मनांत व्हावे यासाठीच हे चिंतन !



## ၈၈ २५ ၈၈

आपल्या सभोवती पसरलेले हे अनंत जग अत्यंत संकीर्ण. या जगाला जाणण्यासाठी आपण खूप प्रयत्न करतो. डोळे, बुध्दि वगैरे समर्थ साधनांचा उपयोग करतो आहोत. तरी पण या संकीर्ण जगाला संपूर्णपणे जाणून घेणे शक्य झाले नाही. आपण जेवढा विचार करूं लागलो तेवढी गहनता वाढत जाते. वरवर पाहतां सगळे स्पष्ट झाल्याप्रमाणे भास होतो. म्हणूनच या जगाचे हे रूप पाहून कांही संतांनी या जगाला 'मायिक' असे म्हटले. याचा अर्थ जगत् असत्य आहे. असे नव्हे. हे जग असेच आहे असे निश्चितपणें सांगतां येत नाही. असाच त्याचा अर्थ.

न्यूटन एका झाडाखाली बसला होता. झाडावरून एक फळ खाली जमीनीवर पडले. न्यूटनने प्रश्न केला, "खाली कां पडले फळ ?" हजारो वर्षांपासून फळे जमीनीवर पडतच होती. पण ती खाऊन टाकण्या पलीकडे कोणी विचार केला नाही. कारण तसे फळ झाडावरून खाली जमीनीवर पडणें सहज, स्वाभाविक, सामान्य असे सर्वांना वाटले. हजारो वर्षापासून कोणी बुध्दिवंत झाला नव्हता काय ? होते ! अनेक मोठेमोठे विद्वान, घन पंडित होते. चिंतक होते. तरी पण कोणाला हा प्रश्न सुचला नाही. न्यूटन एक सामान्य युवक. फळ झाडावरून खाली जमीनीवर पडतांच तो चिंतन करूं लागला !

*Why the fruit should fall to the ground ?*

*Why it should not fly away in to the sky ?*

"फळ खाली जमीनीवरच कां पडावे ? वर आकाशांत कां जाऊं नये ?" त्याचे उत्तर जीवनभर देण्याचा प्रयत्न केला. विश्वाचे एक रहस्य उलगडले. द्रव्य राशींचे सभोवती आकर्षक वलय असते हा आपणांस पूर्वी माहित नसलेला सिध्दांत त्याने शोधून काढला. आपणां कोणालाही न दिसलेला सिध्दांत त्याला उमगला. त्याच्या शोधामुळे आपणांस संतोष झाला. नंतर आपणांस हे आधीच माहित होते या अविर्भावाने आपण वर्तन करतो आहोत. न्यूटनने लावलेल्या गुरुत्वाकर्षणाच्या शोधासाठी जसे प्रश्न विचारले तसे प्रश्न आपण सुध्दां विचारू शकतो. पण आपणांस तसे प्रश्न सुचले नव्हते. इतकेच ! म्हणूनच आपणांस सगळे स्पष्ट असल्याप्रमाणे भास होतो. प्रश्न विचारू लागलो. तर सर्व अस्पष्ट ! क्लिष्ट वाटते ! जगत् काय आहे ? हे संपूर्णपणे सांगता येत नाही. म्हणून ही माया !

हा माणूस भला, तो वाईट. असे आपण सहज निर्णय करतो. मागचा पुढचा विचार न करतां. सत्या-सत्यतेचा शोध घेण्याआधीच निर्णय देऊन टाकतो. सत्याची परिक्षा घेतली तर आपला निर्णय टिकत नाही. व्यक्तीचे अंतरंग-बहिरंग आपल्याला संपूर्णपणे जाणून घेता येत नाहीत. असे असताना आपला अभिप्राय कसा सत्य होईल ? व्यक्ति अथवा समाज यांविषयी वरवर पाहून आपण आपले मत बनवितो. अंतरंग जाणत नाही. जग अत्यंत संकीर्ण. अत्यंत लहानशी वस्तू सुध्दां रहस्यच. आपणांस न समजणाऱ्या असंख्य गोष्टी आहेत. आपणांस दिसते अत्यंत अल्प. न दिसणारे अपार !

विश्व नुसतेच संकीर्ण नव्हे. परिसंकीर्ण ! अत्यंत संकीर्ण ! सगळेच

रहस्यपूर्ण. अद्‌भुत ! शंभर किलोचे ओझे खांद्यावर घेऊन चार पावले चालणे केवढे कष्टाचे काम !

आकाशांत प्रचंड भाराच्या वस्तू-प्रचंड काय सूर्य तरंगत आहेत. भ्रमण करीत आहेत. कोणालाही संपूर्णपणें या जगाचे ज्ञान झाले नाही. या जगाचे आपणास संपूर्ण ज्ञान झाले आहे असे म्हणतां येत नाही. अजिबात ज्ञान नाही असेही नाही. अल्प-स्वल्प ज्ञान झाले आहे. बरेचसे अज्ञान आहे. दिसते, दिसत नाही. असे अद्‌भुत विश्व हे ! पण समस्त विश्वाचे ध्येय म्हणजे केवळ मानवी जीवनकल्याण, या भ्रमांत आपण आहोत. आपण केंद्र-बिंदु ! आणि संपूर्ण जग आपल्या भोवती फिरते आहे ! केवढा 'अहं' कार हा ! सर्व कांही आपल्यासाठी ! सूर्य-चंद्र, वारा, आकाश सगळे कांही आपलीच जाहगीर ! या भ्रमांत असलेला मानव आपल्या वर्चस्वाच्या प्रतिष्ठापनेसाठी संघर्ष करतो आहे. या जगाच्या वस्तूंच्या रचनेकडे लक्ष नाही. माझे लक्ष तुमच्याकडे, अन तुमचे लक्ष माझ्याकडे. विश्वाकडे कोणाचेच लक्ष नाही.

रेडियमचा शोध मादाम क्यूरी यांनी लावला. ते एक अद्‌भुत संशोधन होते. त्यांना नोबेल पारितोषकासारखे जगांतील श्रेष्ठ पारितोषक मिळाले. हे पारितोषक घेऊन जगांत मिरविल्या नाहीत मादम क्यूरी. या खेड्यांतील घरांत जाऊन राहिल्या होत्या. वर्तमान पत्राचे प्रतिनिधी त्यांची मुलाखात घ्यायला त्यांच्या त्या खेड्यांतील घराकडे गेले. नोबल पारितोषक मिळविलेल्या विज्ञानी-विदुषी हातांत कुदळ घेऊन आपल्या बागेत खणत होत्या. साधे कपडे धुळीने माखलेले. निगर्वी स्वभाव !

एखादे छोटेसे पारितोषक अथवा प्रशस्ति लाभली की आपण गांवभर त्याचे प्रदर्शन करीत हिंडतो. कोठे आपण ? आणि कोठे मादाम क्यूरी ?

वार्ताहराने मादाम क्यूरीच्या साधनेंची प्रशंसा केली आणि जगासाठी संदेश मागितला.

''व्यक्ति पेक्षां विश्वाविषयीं अधिक आसक्ति असूं द्या !'' येवढाच संदेश त्यांनी दिला. ''मी महान नव्हे ! जगत् महान ! मी नसले तरी आणखी कोणी तरी संशोधन करील. माझ्याबद्दल जाणण्याची आसक्ति असण्यापेक्षां जगाला जाणून घ्यायची आसक्ति तुमच्या मनांत असूं द्या !''

'मृत्यू' भूमिकेला सिध्द बनवितो. नवीन जीवन त्यांतच विकसित होते. केरकचऱ्याच्या उकिरड्यांतून एखादी वेल उगवते. जीवन फुलते. मेलेल्या वस्तू मधूनच नव जीवन फुलते. बीज मरते. त्या बीजाच्या मृत्यूच्या अंतरंगातून एक महान वृक्ष फोफावतो. हा विश्वाचा चमत्कार ! जीव विकास ! मृत्यूतून जीवन ! जीवनभर मरण ! दोन्ही एकमेकांना पूरक ! जीवन नसलेल्या मरणाला अथवा मरण नसलेल्या जीवनाला या विश्वस्तरावर अर्थ नाही. अशाप्रकारचे जीवन रचतांही येत नाही. समजा मी मेलो नाही, तुम्हीही मेले नाहीत. फूल मेले नाही. फळे मेली नाहीत. सस्य मेले नाही. प्राणीसुध्दां मेले नाहीत. कोणीही मेले नाही तर आहार कोण होणार ? एक उत्पन्न व्हायचे असेल तर दुसरे गेले पाहिजे. आजोबा जातो आणि नातू घरांत येतो. आजोबाचे जाणे आणि नातवाचे येणे हे परस्परांना पूरक आहेत.

आपल्या पूर्वीचे सर्वजण गेले आहेत म्हणून तर आपणांस राहायला, जगायला अवकाश आहे. आलेले सर्वजण येथेच राहिले असते तर आपण कोठे राहायचे ? कसे ? तुमच्या लहानशा घरांत तुम्ही, तुमची पत्नी आणि एक किंवा दोन मुले ! छोटा संसार-सुखी संसार ! त्याऐवजी तुमचे आई-वडील, आजोबा-आजी, पणजोबा-पणजी सगळे सगळे घरांतच असते तर

काय झाले असते. कल्पना तरी करवते का ?

मृत्यूनेच जीवन ! दुःखांतून सुख उत्पन्न होते. हे जगच अद्‌भुत ! ते सदा रहस्यमय ! या जगाचे परिज्ञान नसल्यामुळेच आपणांस हे रहस्यमय वाटत असावे. हे जग असे असावे-तसे असावे; अशी कल्पना करतो. एकदां हे रहस्य उलगडले की सगळे बरोबर आहे हे पटते. सुखही योग्यच. दुःखही योग्यच ! डोके दुखी नसती तर आपण जगू शकलो नसतो. पोटदुखी नसती तरी जगलो नसतो. पोट दुखल्यामुळेंच पचनक्रियेंत कोठेतरी बिघाड झाल्याची जाणीव आपणांस होते. ती देहाची सुचना ! देहाची सर्वांना समजणारी भाषा ! "मला बरे नाही." असेच ते सांगते. त्याने तसे सांगितले नसते तर देहांत काय झाले ? हे आपल्या गमनास आले नसते. त्यामुळे पुढे फारच त्रास झाला असता. आगीने भाजणे अथवा पोळणे, भुकेची बाधा, जखमेच्या वेदना, जाणवतात म्हणूनच सुरक्षितपणे जगणे शक्य झाले आहे. सृष्टि फारच शहाणी आहे. जीवनासाठी जे जे हवे ते ते सर्व कांही रूपित झाले आहे.

प्रथम जडवस्तू ! त्यामध्ये शेकडो प्रकारच्या विविध रचना ! त्यांमधूनच जीव स्पदंन ! तो जीव विकसित होऊन मानव निर्माण व्हायला कोट्यावधी वर्षे लागली. मानव जन्माला आल्यानंतर मानवीय मनाचा विकास ! अद्‌भुत चमत्कार ! तो देह-विकास ! तसाच मनो-विकास. हा मनो-विकास पूर्णत्वाला पोहोचला की देवदर्शन ! आत्मानुभव ! असत्य, अज्ञान यांना थारा देणारे मन सामान्य ! विषयांच्या आकर्षणाला ते सहजपणे बळी पडते. तेच मन स्वच्छ होऊन ज्ञानाच्या प्रकाशांत न्हाऊन निघाले तर सत्य-प्रेम त्या मनामध्यें प्रवेश करतात. मनाचे भाव-दळ उमलतात. चितवृत्ति विकसित होतात. तेव्हां देव भाव ! भगवद्दर्शन !

चित्तवृत्ति फुलायला अनेक जन्म जावे लागतात, असे नाही. याच जन्मामध्ये ते साध्य होते. वाल्मिकी, संत नामदेव, उरिलिंग पेद्दि वगैरे संत आणि शिवशरण याची उदाहरणे. सामान्य व्यक्तित्वाचे, बालपणी व्यसनाधीन झालेले गांधी कांही दशकामध्येंच महात्मा पदाला पोहचले. इतक्या वेगाने त्यांच्या मनाचा विकास झाला. सत्याची अपूर्व अनुभूति त्यांना लाभली होती.

''तप, स्वाध्याय, ईश्वर प्रणिधान यांमुळे कसलेही मन असले तरी त्याचा विकास होतो.'' असे पातंजल मुनींचे मत आहे. मनाचा विकास होण्यासाठी तपश्चर्या केली पाहिजे. कष्ट उपसले पाहिजेत. त्रास दुःख सहन केले पाहिजे. अनंत अडचणी येतात. लोकांकडून अडथळा होतो. नको ते शब्द ऐकायला मिळतात. या सर्व परिस्थितींत मन शांत ठेवायचा प्रयत्न केला पाहिजे. तेच तप. मन तप्त होत असेल तर ते तप नव्हे. ताप होण्यासारख्या परिस्थितींत ताप न होण्यासारखे राहणें हेच तप ! वागणे, बोलणे, विचार, भाव यामध्यें सहनशीलता असेल तर ते पूर्ण तप होय !

सहनशीलता तपाचे एक रूप तर 'अभिप्सा' हे तपश्चर्येचे दुसरे अत्यंत महत्वाचे रूप. ती म्हणजे हृदयाची अदम्य अभिलाषा. ही अभिलाषा तीव्र झाली तर उत्पन्न होणारी आंतरिक 'उष्णता' म्हणजे तप !

नेपोलियन कोवळ्या वयांत मिलिटरी शिक्षण घेत होता. त्यावेळी देशाचा सेनापती तेथे आला. विद्यार्थी रांकेने शिस्तीने उभे होते. सेनापतीने प्रत्येक विद्यार्थ्याला विचारले. ''मोठा झाल्यावर तू कोण होशील ?''

कोणी म्हणाला, ''मी सैनिक होईन.'' कोणी म्हणाला, ''मी कॅप्टन होईन.'' कोणी म्हणाला, ''मी जनरल होईन !''

नेपोलियन सर्वांत बुटका. शेवटी उभा होता. अगदी गरीब. त्याला सुध्दां तोच प्रश्न विचारला. नेपोलियन म्हणाला, ''मी संपूर्ण युरोप खंडाचा सम्राट होईन !''

ही कसली अभिलाषा ! काय ही अभिप्सा ! त्याचा अणु-रेणु चक्रवर्ती बनूं इच्छित होता. ही अभिलाषा म्हणजे त्याचे आंतरिक तप ! आपल्या अभिप्सेच्या पूर्ततेसाठी त्याने अपार कष्ट झेलले. खूपच साधना केली. हे त्याचे बाह्य तप. या बाह्य तपाचे फळही त्याला लाभले होते. सगळे जग त्याच्याकडे आश्चर्य चकित होऊन पाहूं लागले. कांही वर्षातच तो अजेय चक्रवर्ती झाला होता.

आपल्या ठिकाणीं द्विविध तपश्चर्येचा अभाव. तपश्चर्या असती तर आपल्या देशाची ही अवनती झाली नसती. जवळ जवळ शंभर कोटी जनसंख्या ! विशाल देश, निसर्ग संपदा, सुपीक जमीन, संपूर्ण स्वातंत्र्य येवढे सगळे असूनही दारिद्र, अज्ञान, अतिलोभ, अप्रामाणिकपणा, व्यसनाधीनता, नीच मनोभाव, स्वार्थांधता ! आपण हे सर्व दुर्गुण टाकूं शकतो. भव्य, समृध्द सत्वपूर्ण भारत निर्माण करू शकतो. असे बोलण्याचे धैर्य सुध्दां आपल्या ठिकाणी नाही. आपणामध्ये कार्पण्यदोष ! अभिप्सा तपाचा हा अभाव. गांधी एकटाच. किरकोळ शरीरयष्टि. रिकामे हात. अर्ध नग्न देह. पण अद्‌भुत संकल्पशक्ति ! सत्य-प्रेमाचे सामर्थ्य. आंत तुडुंब भरून राहिलेली 'अभिप्सा'. ''चले जाव !'' त्याने आदेश दिला. त्या बोलण्यांत मंत्र शक्ति ! तपोबल ! कोटि-कोटि जनांना प्रेरणा दिली त्या मंत्राने. त्याचा परिणाम ? ज्या ब्रिटिश साम्राज्याचा सूर्य कधीही मावळत नव्हता, त्या ब्रिटिशांचे पलायन ! गांधीसारखा एक तपस्वी आपल्या भारताला नवचेतन देऊ शकेल !

पहिले तप ! दुसरे स्वाध्याय ! ज्ञानी, महाबल, सत्वशील, अनुभावि

साधु-संतांचा, शिवशरणांचा उपदेश श्रवण करून अंतरंग भरून घेणे, हाच स्वाध्याय !

तिसरे ईश्वर प्रणिधान ! केवढेही प्रचंड साहस केले तरी शेवटी ही सगळी देवाची कृपा ! मी काय करू शकतो ? मी त्या भगवंताचे साधन मात्र ! कर्ता करविता तोच. तो करूणामयी. आपल्या सर्व महासाधना, त्याच्या कृपेचेच फळ ! हा भाव असेल तर तो 'प्रणीधान' !

या तीन्हीचा संगम म्हणजे क्रिया-योग ! याने मनोविकास. तपाने मन सबल होते. स्वाध्यायाने परिशुध्द होते. ज्ञान परिपूर्ण होते. ईश्वर प्रणिधानाने 'निरहंकार' वृत्ति होते. भगवंताचा स्वीकार करण्याचे सामर्थ्य लाभते. असे मनच विकसित मन होय ! उमलेले मन !

रविंद्रनाथ टागोर महाज्ञानी. गीतांजली अमर कृति ! त्यांत रवींद्रांचा अध्यात्माचा प्रकाश पाहावा. किती सुंदर कथा !

''मी तुझ्या पदतलीं बसलो आहे. तुला माझी एकच प्रार्थना ! माझे जीवन एक बांसरी बनव. माझे ह्रदय तुझ्या मधुर काव्य गायनाने भरू दे ! माझ्या सरळ जीवनांतून तुझे अमर संगीत उमटूं दे !''

रवींद्रांचा हा क्रियायोग त्यांना ऋषि बनवितो. त्यांचे मन विकसित झाले. विशाल झाले. भगवंताचा स्पर्श त्या मनाला लाभला आहे. आपले जीवन ही एक मुरली बनावे. बांसरीमध्ये पाहू जातां कांही नाही ! पोकळी ! त्या बांसरीतून-मनांतून भगवंत दिव्य निनाद करतो. तो निनाद म्हणजेच चिंतन !



# २६

देव 'तत्व' सर्वांच्या अंतरंगामध्ये व्यापून राहिलेले तथ्य ! त्याला आंतही आणि बाहेरही पाहिले संतांनी ! शिवशरणांनी ! अखंडाचे परिज्ञान त्यांना झाले. भेद केवळ वर-वरचा ! केवळ बाहेरून देखावा. आपले तसे नव्हे. सत्य न जाणणाऱ्या आपल्या दृष्टीला, मनाला केवळ भेद तेवढा दिसतो. उदा. हा देह आपलाच. देहाच्या अणुरेणूंत आपणच व्यापून राहिलो आहोत. पण आपणांस त्याचे ज्ञान कोठे आहे ? उजवा पाय श्रेष्ठ ! डावा पाय कनिष्ठ ! उजवा पाय पुढे ठेवले तर शुभ. डावे पाऊल प्रथम ठेवले तर अशुभ ! डावा असो, उजवा असो, दोन्ही पाय आपलेच ना ? असे असूनही आपल्याच एका अंगाविषयी हा शुभाशुभ भेद कां ? हा भेदच आपले जीवन छिन्नभिन्न करून टाकतो. डोके आपले. डोक्यांतील केसही आपलेच ! काळे असले काय ? किंवा पांढरे असले काय ? तर मग पांढऱ्या केसांचा तिरस्कार कां बरे करावा ? काळ्या केसात एखादा पांढरा केस दिसला तरी तो निपटून कां टाकावा ? आपल्या स्वतःच्या देहांतच येवढा भेद मानणारे आपण, बाह्य जगांत किती भेदभाव करूं याची कल्पनाच केलेली बरी ! सगळे दिवस सूर्याचे त्याच्यामध्ये सुध्दां आपण भेद करतो. एक दिवस शुभ. एक दिवस अशुभ !

वैविध्यपूर्ण होऊन दिसणाऱ्या विश्वांत एक मूळ वस्तु आहे. तिकडे लक्ष दिले तर अखंडतेचे, अभेदाचे दर्शन. अभेदाचे दर्शन झाल्यावर भेद दिसत

नाही असे नव्हे. दिसला तरी तो वरवरचा ! आंतरिक रीतीने पाहूं जाता भेद नाही. अशी दार्शनिकाला खात्री असते. वैज्ञानिकाला हैड्रोजन, ऑक्सीजन, कार्बन हे वेगवेगळे दिसले तरी त्या सर्वांना असणारी महामूलशक्ति एकच आहे, हे त्याच्या सदा लक्षांत असते. माहित असून भेद करणें वेगळे. माहित नसल्याने भेद करणें वेगळे तसेच विश्वाच्या महामूल वस्तूला ओळखून शरण, संत, महंत त्याची अनंतता पाहतात. त्या मूळ वस्तूमध्यें 'मी' 'तू' हा भेद नाही !

*तनु नष्ट. मन नष्ट. नेनह नष्ट.*
*भाव नष्ट. ज्ञान नष्ट–इंती*
*पंचनष्टदोळगे ना नष्टवादेनु*
*आनष्ट दोळगे नी नष्टवादे*
*कलिदेवर देवा एंब नुडि*
*'निःशब्दं ब्रह्म उच्यते' एन्नुत्तिद्दितु.*

**– माडिवाळ माचिदेव**

**भावार्थ :** तनु नष्ट, मन नष्ट, जाणीव नष्ट, भाव नष्ट, ज्ञान नष्ट या पंच नष्टामध्यें तूं नष्ट झालास. ही उक्ति कलिदेवर देवा, 'निःशब्दं, ब्रह्म उच्यते' हेच सांगते.

तनुभाव, मनभाव, बुध्दी-भाव नाहीसा झाल्यावर 'मी' हा भाव नाहीसा होतो. मी हा भाव नाहीसा झाला तर भगवंता, 'तूं' हा भाव कोठे असेल ? 'मी' नाही. 'तू' नाही माझ्यामध्यें तूं व्यापून आहेस. तुझ्यामध्ये 'मी' व्यापून राहिलो आहे. असे अद्वय दर्शन करून घेतल्यावरही संत देह, मन, बुध्दि यांमध्ये प्रवेश करतो. दैहिक, मानसिक, बौध्दिक भेद पाहतो. फरक.येवढाच की हा

भेद वरवरचा असतो.

आपण मात्र व्यक्ति-व्यक्ति मध्यें जाति-भेद मानतो. मुग्ध बालक प्रसन्न मुख, आंत-बाहेर एकरूप. फुलांसारखे जीव, पण त्याच्यामध्यें सुध्दां उच्च-नीच भेद मानतो. हा उच्च नीच भेद कोठे आहे ? कोठे दिसतो काय ? तुम्हांला पाहिले-मला पाहिले तर जाति दिसते कां ? नाही. कोणीतरी सांगितले. आपण त्यावर विश्वास ठेविला. 'जाति सत्यस्य सत्य.' असा आपण निश्चय केला. आपला भ्रम आपणांस सत्य होऊन राहिला आहे.

'पंचक आले, शुभकार्य वर्ज्य !' असे म्हणतात. हे पंचक कोठून आले ? कोठे गेले ? कां ? ते काय आहे ? याचा विचार आपण करीत नाही. अंध विश्वास येवढा बलिष्ठ !

तुझ्या राशींत शनीचा प्रवेश झाला आहे. आतां तुला साडेसाती लागली. तुझा कष्ट-काल आला असे ज्योतिषांनी सांगितले आपण आपले स्वच्छ जीवन घाण करून घेतले. खरे पाहतां भेद-भ्रम हाच आम्हांला शनि. तो शनि केवळ साडेसात वर्षेच नव्हे तर शंभर वर्षे सतावतो. अशा भ्रमांचे निरसन करणें हीच सत्यविद्या ! विचार न करणें हाच प्रपंच. मानसिक गोंधळ. आपल्या सभोवती पाहिले तर सम-दर्शन, सहज-दर्शन. समाधान झाले तर तो धर्म. भेद-भाव वाढून डोके तापत असेल तर तो अधर्म !

संतांनी मूळ वस्तु जाणली. कधी ? जेव्हा मायक्रोस्कोप, टेलिस्कोप नव्हते तेव्हा. गणिताचा येवढा अद्‌भुत विकास झाला नव्हता तेव्हां. श्रेष्ठ वैज्ञानिकांनी जगाविषयी येवढे ज्ञान संपादन केले नव्हते तेव्हां. सिध्दांत शोधून काढले नव्हते तेव्हां. केवळ डोळ्यांनी पाहून, विश्वाची अनंतता, सत्याची

परिसूक्ष्मता जाणून अनुभव घेतला. विश्वाचेआदि आणि अंत्य यांमध्ये अंतभूर्त तत्व त्यांनी ज्ञानचक्षूंनी पाहिले. ते तत्व म्हणजे पोकळी ! शून्य !

डोंगरायेवढ्या उंच लाटा जेथे निर्माण होतात, विलीन होतात. तोच सागर. किनाऱ्यावर बसून फक्त लाटांकडेच ध्यान देणाऱ्या माणसाला सागर दिसत नाही. सागर पहायला डोळे हवेत. लाटांच्या पलीकडे, आंत पाहण्याची दृष्टि हवी. नाहीतर फक्त लाटाच दिसतील. तसेच, जगाकडे पाहतांना केवळ विविध वस्तु-व्यक्ति रूपी लाटाच दिसत असतील तर सत्यरूपी सागर दर्शन होणार नाही. संतांना सत्यरूपी सागराचे दर्शन होते. आपणांस भेद रूपी लाटांचेच दर्शन घडते. संतांना जसे संसार-जीवन दिसते तसे ते आपणांस दिसत नाही. आपणांस जे दिसते, ते त्यांच्या दृष्टीने सत्य नव्हे.

***नलिनी दलगत जलमति तरलं***
***तद्वत जीवितमतिशय चपलं***
***विध्दि व्याध्यभिमानग्रस्तं***
***लोकं शोकहतं च समस्तं. (भ. गो. ४)***

प्रभात काळीं, कमळदळांवर दंव बिंदू मोत्यांप्रमाणे रत्नांप्रमाणे चमकत असतात. वाऱ्याच्या झुळुकीने कमळदळ डोलत असते. अत्यंत तरल असे ते दंव बिंदू केव्हा गळून पडतील याचा नेम नसतो. मानवी जीवनसुध्दां असेच अस्थिर. आधी व्याधीनी ग्रस्त. समस्त जग अशा अत्यंत अस्थिर अशा जीवनाला चिकटून राहूं पाहते. या अस्थिर जीवनाचा केवढा अभिमान जीवाला ! दंव बिंदूची चपलता व तरलता त्याला जाणवत नाही. दंवबिंदूची अस्थिरता समजली तरी दंवबिंदु गळून पडायचे थांबले असे नाही. ज्ञान झाले आणि नाही झाले तरी जीवन गळून पडायचेच. पण जाणून जगणारे संतुष्ट

असतात न जाणतां जगणारे असंतुष्ट होऊन जगतात. जीवनांत आधि-व्याधि अभिमान सर्व कांही असायचेच. त्यांना संपूर्णपणे निपटून टाकतां येत नाही. जीवन ही फूलांची शेज नव्हे. "**मुळ्ळिन हासिगे कळ्ळिय घनरस**" जीवन ही काट्यांची शेज. रूईचा चीक !

जीवन कोणाचेही असू द्या फूल-कांटे असायचेच बुध्द, बसवण्णा, महावीर सर्वांच्या जीवनांतही कांटे होतेच. दगड धोंडे होतेच. हजारो संकटे. लहानांना लहान आतंक, थोरांना थोर आतंक, निरातंक हे स्वप्नातच ! अजिबात संपत्ति-व्यसन नसलेल्या संन्याशाला सुध्दां अधि-व्याधि सुटल्या नाहीत. अभिमान हा स्थूलपणे सूक्ष्मपणें सर्वांचे मन व्यापून राहिला आहे.

मी कितीही तत्वबोध करीत असलो तरी मी बोलत असतांना कोणी तरी "पुरे बस करा ! थांबवा !" म्हणून टाळ्या वाजविल्या की मन व्यग्र होते. अभिमानाला धक्का पोहचतो. आंतरिक ताप वाढतो. हा ताप सहन करणें. कष्टाचे ! तो रोष निराशा, दुःख या रूपांत व्यक्त होतो.

शंकराचार्यांच्या तात्विक दृष्टिला दिसलेले हे जीवनाचे स्वरूप ! हेच जीवनाचे सत्य !

ज्ञानेश्वरांनी अत्यंत कोवळ्या वयांतच भगवद्‌गीतेवर रसाळ भाष्य लिहिले. ज्ञानेश्वरी ! संपूर्ण महाराष्ट्र त्या ग्रंथाला गौरवाने मिरवतो आहे. त्या ग्रंथांत अनुभव-अनुभाव ओथंबून वाहतो आहे. वाचक सहृदय असेल तर ज्ञानेश्वरी वाचून त्याला हर्षोद्रिक होतो. येवढा महान ज्ञानेश्वर ! ज्ञानियांचा राजा. पण जोपर्यंत ज्ञानेश्वर महाराज जिवंत होते, तोपर्यंत, समाजाने त्यांचा छळ केला. त्यांना बहिष्कृत केले. देवाने ज्ञानेश्वरांना जवळ केले पण समाजाने

वाळीत टाकले. भगवंताचे प्रेम सहज लाभेल. पण समाजाचे प्रेम लाभणे कठिण ! सामान्य माणूस असो, महात्मा असो, अनेक संकटे झेलावी लागतात.

ज्ञानेश्वरांच्या वडिलांनी संसारत्याग करून संन्यास स्वीकारला होता. नंतर पुनः ते गृहस्थ झाले. समाजाच्या दृष्टीने ते घोर पाप. त्या पापाचे प्रायश्चित त्यांच्या मुलांना भोगावे लागले. मुले केवढी ज्ञानी ! निवृत्तिनाथ, सोपानदेव, ज्ञानेश्वर-मुक्ताबाई ! अशा ज्ञानी संताना ! संन्याशाची मुले म्हणून समाजाची हेटाळणी-तिरस्कार भोगावा लागला. अशा ज्ञानीजनांना सुध्दा समाजाच्या कोपाला बळी पडावे लागते. ताप सहन करावा लागतो. तर मग आमच्या सारख्या सामान्य लोकांची काय कथा ?

ज्ञानीजन निगर्वी असतात. म्हणून ते समाधानाने जीवन कंठतात. आमच्याठायीं अभिमान-गर्व-ताठा अधिक ! त्याला आघात झाला तर दुःख अनुभवतो. सर्वांमध्ये सुध्दां हा अभिमान भरून राहिला आहे. तो अभिमान आपणांहून थोर व्यक्तिसमोर व्यक्त होत नाही. आपणांहून लहान असे आपण ज्यांना समजतो, त्यांच्या समोर तो व्यक्त होतो. या अभिमान रूपी मनोरोगाने आधुनिक माणूस पछाडला गेला आहे. कोट्यावधी रुपये खर्च करून मनुकुलाचा नाश करणारा अणुबाँब त्याने बनविला. हा त्याच्या उन्मादाचा अतिरेक होय. एकीकडे शांतीचा जप करतो. जीव रक्षण संघ बनवितो. प्राणिदया संघ बनवितो. या सर्वासमवेतच सर्व संहारक बाँब बनवितो. हे निरोगी मनाचे लक्षण नव्हे. राष्ट्राची संपत्ती जनतेच्या अन्नोत्पादनासाठी, वस्त्रोत्पादनासाठी, निवास व आरोग्य रक्षणासाठी, शिक्षणासाठी खर्च करायचे सोडून संपत्तीचा फार मोठा भाग विनाशक शस्त्रास्त्रांसाठी नष्ट करणें याचा अर्थ मानव मनौवैफल्याने पीडित झाला आहे.

एखादा गरीब मजूर, घरी पत्नी-मुले... खाणारी चार सहा तोंडे पंधरावीस रुपये रोज कमावतो. रोजच्या रोज कमाई झाली नाही तर बायकामुलांना उपाशी राहण्याची पाळी येते. येवढे असूनही हाती पैसा आला की बायका मुलांची आठवण त्याला राहात नाही. खूप दारू ढोसून मदोन्मत्त होऊन बायका मुलांना मारहाण करतो. त्याला मनोरूग्ण म्हणावे ? कीं काय म्हणावे ?

कोणी पैसा कमावण्यांत येवढा निमग्न होतो की, वेळेवर जेवण नाही, झोप नाही, आरोग्य बिघडले तरी पर्वा नाही. हे लक्षण कशाचे ? मनोरूग्णाचेच ना ?

महिना आठ-दहा हजार रुपये पगार मिळवूनही वाम मार्गानें लाखो रुपये कमविण्याची आशा करणारे मनोरोगीच ना ? ते ही असमाधानीच.

पशु-पक्षांना दैहिक व्याधि आहेत ते खरे ! पण त्यांना मानवांप्रमाणे मनोव्याधि नसाव्यात. पक्षी आनंदाने गात आकाशांत विहार करतात. त्यांचे गायन ऐकून वृक्षवेलीसुध्दां आनंदाने डोलतात. फळे खाऊन पक्षांना, गाणे ऐकून वृक्षवेलींना स्वर्गीय आनंद लाभत असावा, कारण येवढेच की त्यांच्या ठिकाणी अत्यहं नाही. अति-लोभ नाही. भविष्याची मोठ मोठी स्वप्नें नाहीत मानापनाचा ताप नाही. त्यांची मैत्री सहज. आनंदही सहज.

एका जंगलांत कित्येक वर्षे पाऊस पडला नाही. मोठा दुष्काळ, वृक्षवेली पाण्याविना सुकून जाऊ लागल्या. एक पक्षी दिवसभर इकडे तिकडे संचार करून संध्याकाळी एका विशिष्ट झाडावर आश्रय घेत असे. ते झाड पक्षाला म्हणाले, "मित्रा, आतां येथे दुष्काळ पडला आहे. मला पाणी नाही मिळत. येथून पुढे मी तुला गोड फळे देऊं शकणार नाही. तुला आश्रय देऊं शकणार

नाही. तुला जिकडे पाणी मिळेल, अन्न मिळेल, आश्रय मिळेल तिकडे निघून जा. मी आतां लौकरच मरणार आहे. तूं ही जागा सोड. दूरवर जा. सुखाने रहा !''

पक्षी म्हणाला, ''मित्रा मी तुझा आसरा घेतला. तुझी गोड फळे चाखली. तुझी मैत्री अनुभवली. तूं आता देवाघरी जाणार आहेस. तुझ्या शेवटच्या घटके पर्यंत मी तुझ्याजवळ राहीन, माझे मधुर संगीत ऐकवीन तुझ्या मृत्यूचा क्षण जवळ आला म्हणून काय झाले ? मी गाईन. तू आनंदांत तन्मय होऊन माझे गाणे ऐक. तुझ्या मरणाच्या वेदना विसरून तूं संतोषाने मर !''

अरूणोदयाच्या समयीं पक्षाचे गाणे ऐकतां ऐकतां झाड मरून गेले. पक्षी गात गात दूर उडून गेला. त्याला वाटेत एक संत भेटला त्याने पक्षाला विचारले,

''तुझा मित्र मरून गेला तरी तूं गातोच आहेस. तुला तुझ्या मित्राच्या मरणाने दुःख झाले नाही काय ?''

पक्षी म्हणाला, ''संत महाराज, जोपर्यंत जीवन आहे, तोपर्यंत संतोषाने जगावे, जेव्हा झाड मरण पावले तेव्हां त्याचे स्मरण माझ्या मनांत राहिले. तोही संतोषाचा अनुभवच होय ! मी पक्षी. आनंद हे माझे जीवन. गाणे हे माझे ब्रीद ! आतां माझ्यासभोवती बहरलेला वसंत ऋतु. मित्र-विरह आता मित्र-प्रेमांत परिवर्तित झाले आहे. मी गाऊं नको तर काय करूं ?''

त्या पक्षाच्या ठिकाणी अति अनुराग नाही की अति द्वेष नाही. मनुष्य-मात्र रागादींमुळे दुःखी कष्टी झाला आहे. आधि-व्याधि अभिमान ग्रस्त ! शोक-हत !!

या जगातील वरच्या थरांतील, खालच्या थरांतील सर्व लोक शोक-ग्रस्त झाले आहेत. आमच्या व्यथा कधी न संपणाऱ्या कथा ! या व्यथा आपले संपूर्ण जीवन गिळू पाहात आहेत. कारण आपण मानसिक रोगी आहोत. मन निःशक्त बनले की लहान मोठ्या वेदना आपले डोके खातात. सामाजिक संबंध अस्तव्यस्त होतात. कोणीही एकमेकांशी मिळते जुळते घेत नाही. जीवन नीरस होते. शोक सर्वांना व्यापून टाकतो.

शोक परिहार करून घेणे हेच भगवच्चिंतन. हे देवचिंतन. शीतल चांदणे आल्हादकर ! वेदना दुःख शमन करण्याची शक्ति भगवच्चिंतनांत ! चांदण्यांत आपण काहीही न करता उगाच बसून राहिलो तरी त्या परिसरातील प्रशांति आपोआप आपल्या ठिकाणी प्रवेश करते. तसेच चिंतन म्हणजे सत्य-सौंदर्य. शांति सागरांत देहभान विसरून जाते. आनंद आपोआप लाभतो. अमृतवृष्टी ही !

एकदा एका बालकाला तीव्र इच्छा झाली की ''देवाला पहावे !'' तो एका देवळाकडे गेला. दार बंद होते. दार वाजविले. दार उघडले नाही. दुसऱ्या देवालयाकडे गेला. तो जाईपर्यंत दरवाजा बंद झाला. तो जेथे जाईल, तेथे दार बंद ! निराश होऊन तो एका झाडाखाली बसला. निराशेने तो आंसू ढाळू लागला. तेथे थंड वाऱ्याची झुळुक आली.

''कां रे बाळा रडतोस ?'' वाऱ्याने विचारले.

बालक म्हणाला, ''मला देवाला पहायचे आहे. पण सगळ्या देवळांची द्वारे बंद आहेत.''

वारा म्हणाला, ''तूं कशाला चिंता करतोस ? मी दरवाजाच्या आंत

नाही. मी दरवाजाच्या बाहेर आहे. मी बंधन रहित. मला बंधन मुळींच आवडत नाही. पूजाऱ्यांनी दार बंद केले आणि मी बाहेर राहिलो. मी आतां तुझ्याजवळ मंद वाऱ्याच्या झुळकीच्या रूपाने आलो आहे. डोळे उघड. रडणे थांबव. माझा अनुभव घे. आनंदात राहा !''

देव आणि देवाचे स्मरण आनंदपूर्ण. बालकाचे मुख विकसित झाले. सभोवती ज्ञानाचे नव किरण त्याला दिसले. अरुणोदयच. आकाशाचा गडद निळा रंग ! मंद वारा ! आभाळा येवढा उंच डोंगर ! त्या बालकाला तेथे भगवंताचे दर्शन घडले. हृदय हर्षाने पुलकित झाले. पाहिलेले रूप, ऐकलेला शब्द, झालेला स्पर्श सगळे कांही दिव्य !

सामान्य गोष्टीमधूनच देवाचा अनुभव मिळतो. आईने प्रेमाने वाढलेल्या अन्नांत आणि पंचतारांकित हॉटेलांत विकत घेतलेल्या अन्नांत फार मोठा फरक आहे. दिसायला सगळे अन्न सारखेच. पण मातेने प्रेमाने वाढलेल्या अन्नाची अद्‌भुत गोडी सहृदयीच जाणे. तसेंच या दृश्य जगांतच सहृदयी साधक अदृश्य देवाचा अनुभव येऊं शकतो. आधि-व्याधि यामध्ये असून सुध्दा भगवत्प्रसाद अनुभवतो. अशी दिव्य कला आपणांस लाभावी म्हणूनच हे भगवच्चिंतन.



## ൌൌ २७ ൌൌ

भगवंताचे वर्णन 'स्वयंभू' असे करतात. 'स्वयंभू' शब्द फारच अर्थपूर्ण. जगांतील सर्व वस्तूंचे परीक्षण करून पाहिले तर येथे असलेली कोणतीही वस्तु 'स्वयंभू' नव्हे. आपल्या आपण उत्पन्न झालेली नव्हे. आपोआप आहे असे नव्हे. एखादी वस्तु असायला त्याला आधारभूत दुसरी वस्तु असावी लागते. वस्तूच्या अस्तित्वाला ज्या वस्तूची आवश्यकता असते, ती वस्तु तयार वस्तूच्या आधीची अवस्था असते. या वस्तूला आपण कारण वस्तु म्हणतो. घट (मडके) निर्माण होण्यापूर्वी माती होती. आहे. मडके आपोआप निर्माण झाले नाही. ते निर्माण व्हायला एक दुसरी वस्तु आवश्यक. ती वस्तु म्हणजे माती. त्या मातीला मडके (घट) बनण्यापूर्वी सुध्दां अस्तित्व आहे. त्या मातीच्या अस्तित्वावर घट दिसूं लागला. येवढेच नव्हे तर घटाचे अस्तित्व असायचे झाले तर माती आवश्यक. म्हणजे घट (मडके) आपले अस्तित्व मातीच्या अस्तित्वांतून मिळवितो. मातीचे अस्तित्व वजा केले तर घटाचे अस्तित्व सुध्दा शिल्लक राहात नाही. मातीला आपले स्वत:चे अस्तित्व आहे. घटाला नाही. म्हणून घट स्वयंभू नव्हे. ''मला कशाची आवश्यकता नाही. मी स्वतंत्रपणे असणें शक्य आहे.'' असे घटाने स्वप्नच पाहावे. प्रत्यक्षांत ते शक्य नाही. हाच नियम सर्वत्र लागू होतो. या जगांतील सर्व वस्तु. दुसऱ्या वस्तूने बनलेल्या असल्यामुळे त्या सापेक्ष, अ-स्वयंभू, अ-स्वतंत्र !

माती, पाणी, अग्नि, वारा आणि आकाश यांचा समूह हे जग ! यापैकी माती स्वतंत्र नव्हे. पाणी स्वतंत्र नव्हे. अग्नि, वारा, आकाश हे स्वतंत्र नव्हेत. हे सर्व आकाशात आहेत. आकाश सुध्दां स्वतंत्र नव्हे. काल, देश आणि वस्तु परस्परांशी निगडित आहेत. त्यांना वेगवेगळे करतां येत नाही. यांचा महासमूह म्हणजेच हे विश्व. या विश्वांत अगणित विविध वस्तु. अनंत वाटणाऱ्या या महाविश्वाला 'व्याकृत' म्हणूं या ! म्हणजे विस्तार. या व्याकृत विश्वाला आधार होऊन अव्याकृत महाकारण तत्व आहे. त्या तत्वाच्या परम आश्रयामध्यें हे विश्व नांदते. कोटी कोटी वर्षे. विश्वाचे अस्तित्व त्या मूळ तत्वांतून निर्माण झाले. ती मूळ वस्तु परमाधार. सर्वाधार, तेच 'देव', 'सत्य', 'मूल तत्व' ते 'स्वयंभू' स्वतंत्र, ब्रह्म. याच्या अस्तित्वासाठी विश्वाची आवश्यकता नाही. हे निरपेक्ष सत्य ! मडके फुटले तरी मातीचे अस्तित्व आहेच. त्याचप्रमाणे विश्व नाश पावले तरी ते परतत्व चिरंतनपणें असते.

मी या जगांत स्वतंत्रपणे जगूं शकत नाही. मी जगण्यासाठी काल, देश, वस्तु पाहिजेत. माझे दैहिक अस्तित्व, मानसिक अस्तित्व असे आहे. भौतिक अस्तित्व बाह्य जगांतून आले. म्हणूनच माझे असे जे आहे ते 'स्वयंभू' नव्हे. ते दुसऱ्यावर अवलंबून असलेले सापेक्षिक वस्तु संचय.

आपले असे कांहीच नाही. माझा देह पंचभूत समूह.आपली विद्या-बुध्दि प्रकृति दत्त ! आपल्या भावना, आपले गुण क्रिया, शक्ति सौंदर्य हे सर्व निसर्गजन्य. आपणांस लाभलेले सर्व कांही सृष्ट. त्यांच्या आश्रयाने पुष्टपणें वाढलेला 'मी' 'अहं' सृष्टच. देहादि पासून 'मी' आणि 'माझे' वजा केल्यानंतर स्वतंत्रपणे जे कांही शिल्लक राहते ते सत्यच 'स्वयंभू'. मी सुंदर नव्हे की कुरूप नव्हे. माझे शरीर सुंदर अथवा कुरूप. मी बाल, युवक अथवा वृध्द

नव्हे. माझा देह बाल, युवक अथवा वृध्द ! मी सद्गुणी अथवा दुर्गुणी नव्हे. माझे मन सद्गुणी अथवा दुर्गुणी ! मी शहाणा अथवा मूढ नव्हे. माझी बुध्दि तशी. असे चिंतन करणें म्हणजे स्वयंभू अनुसंधान !

हा देह जगांतील अनेक वस्तूंच्या अस्तित्वावर अवलंबून असतो. तसेंच जीव सुध्दां देहादींवर अवलंबून असतो; आपल्या भौतिक अस्तित्वासाठी ! जीव हा सुध्दां तत्व संघातांमध्ये दिसणारे चेतन. त्यामुळें जीवाचे अस्तित्व तत्वसंघातांवर अवलंबून असते. जीवाला स्वतंत्र असे अस्तित्व नाही. जेव्हां तत्वसंघात वजा करतो तेव्हा 'मी' ला अस्तित्व नाही. तत्वसंघात नाहीसे झाले म्हणजे उरलेले विमल चेतन त्या परम मूल अस्तित्वांत विलीन होते. ती परम वस्तू स्वयंभू ! ते स्वयंभू माझे व तुमचे मूल स्वरूप. मी, मी असा वृत्त्यात्मक प्रज्ञा रूप 'अहं' नव्हे. ते भाव रूप ! अहं नाहीसा झाला तर तेथे भरून राहते ती परवस्तु !

ही अहंभाव वस्तु म्हणजे जीव. या विश्वामध्ये कोणतीही वस्तू जीव नाही. जीवाची नव्हे. जीवापासूनही नव्हे. सर्व कांही संघात जन्य ! सर्वकांही परम स्वयंभू तत्वावर दृग्गोचर होते. ही जाणीव झाली की माणूस समाधानी होतो.

जनक महाराजांच्या दरबारात अष्टावक्र मुनी आले. त्यांचा वाकडा तिकडा देह, वाकडी चाल पाहून सर्वजण हंसू लागले. ज्ञानी, अज्ञानी, राजा, प्रजा हे सगळे हंसू लागले. त्यांची उपहासाची दृष्टी आणि त्यांचे हंसणे पाहून युवक अष्टावक्राला राग नाही आला. तो सर्वांहूनअधिक हंसू लागला.

राजाने विचारले, ''या सभेतील विद्वान तुमच्या वक्र देहाला पाहून हंसले. पण आपण का हसलात ?'

"ज्याला पाहून हे विद्वान हंसले, तेच पाहून मी हंसलो. ज्याला पाहून त्यांना हसू येते, ते पाहिल्याने मलासुध्दा हंसू येते. माझ्या हसण्याचे दुसरे कारण असे की, ज्याला पाहून हंसू येते तोच 'मी' असे समजून हंसणाऱ्या या तथाकथित विद्वानांचे अज्ञान पाहून मला हंसू येते. म्हणून मी हंसलो !"

अष्टावक्र मुनींचे हे ज्ञान आणि तशी मन:स्थिती केवढी अद्‌भुत साधना ! केवढे समाधान होते मुनींना ! कोणी स्तुती केली तरी त्याने हुरळून जात नाही. कोणी निंदा केली तरी त्याचे दु:ख नाही. जग म्हटले की येवढे असणारच ! आपली इच्छा असो वा नसो, कोणी स्तुती करणारच. कोणी निंदा करणारच. आपल्या विषयी एक-दोन चांगल्या गोष्टी आणि एक दोन वाईट गोष्टी ! रस्त्याने आपण जात असतो, पाहतो, एखादा माणूस आंधळा असतो. त्याला आपण 'आंधळा' म्हणतो. आम्ही तो शब्द उच्चार करतांच त्या व्यक्तिला ताप होतो. कां बरे ? आपणच 'आंधळे' अशी त्याची दृढ समजूत असते. म्हणून त्याला ताप होतो. एखाद्या डोळस माणसाने तो शब्द ऐकला तर आपण आंधळा नव्हे अशी त्याची खात्री असल्याने तो 'अरे आंधळ्या' या संबोधनाकडे लक्ष देत नाही. आपलेही तसेच. लोक कांहीतरी म्हणतात, ते आपल्याला रूतते. दु:ख देते. आपण नसलेल्या अशा देहादि विभिन्न स्थानी राहून व्यवहार करीत असल्याने सुख, दु:ख अनिवार्य ! बंधन अनिवार्य ! या बंध मुक्तीसाठी स्वयंभू साधना.

"मी कशावर सुध्दा. अवलंबून नाही. माझे अस्तित्व सर्व तंत्र स्वतंत्र !" असे अनुसंधान असावे. रामासारखा अवतारी पुरुष. पण,

"घराबाहेर गेलेल्या पत्नीला घरांत घ्यायला मी कांही राम नव्हे !"

असे परटाचे अविचारी बोल ऐकून रामाचे हृदय घायाळ झाले.

सीतामाता सामान्य स्त्री नव्हे. लक्ष्मीचा अवतार. जगन्माता ती. तिच्या चारित्र्याविषयी रामाची खात्री असून सुध्दा जनानुरागासाठी रामाने तिला अग्नि दिव्य करायला भाग पाडले होते. तरीसुध्दा संशयाचा धूर पसरला. राम दुःखी कष्टी झाला. त्याने परमपवित्र सीता मातेचा गर्भिणी अवस्थेत त्याग केला. सीतामाता अखेरपर्यंत दुःखातच तळमळत राहिली. शेवटी भूमी दुभंगून आपल्याला पोटात घेईल तर बरे असे तिला वाटले. त्यातच, तिचा शेवट ! सीतेच्या दुःखाने व्याकुळ होऊन रामाचाही शेवट !

परटाच्या निंदेला रामाने एवढे महत्व दिले म्हणून रामायणाचा हा शोकांत.

''परीट अज्ञ ! आपले व सीतेचे जीवन दैवी-अवतारी, परटाला आपणां उभयतांची महती कशी समजेल ? असा विचार करून रामाने तिकडे लक्ष दिले नसते तर रामायण दुःखांत झाले नसते. तात्विकपणे आपल्या अमृतास्तित्वाच्या भानामध्ये राम राहता तर कदाचित रामायण घडलेही नसते. अथवा कोणी समजतात तसे रामाने केवळ जगाला दाखविण्यासाठी तसे वर्तन केले असावे.''

पण आपण खरोखर या संसारात गुरफटलो आहोत. कोणीतरी अज्ञानाने अथवा दुष्ट पणाने एखाद्या स्त्रीच्या चारित्र्याविषयी संशय व्यक्त करून त्यांचे जीवन उध्वस्त केल्याची उदाहरणे खूप आढळतात. सर्वांना सर्व वस्तु सर्व काळी एकाच प्रकारे दिसत नाहीत. एकाक्षणी माझा देह कोणाला सुंदर दिसेल तर दुसऱ्याक्षणीं अन्य कोणाला कळाहीन वाटेल. माझे वागणे कोणाला आवडेल कोणाला आवडणार नाही. हे सर्व जाणून घेतले तर. ''मी खरोखर स्वयंभू, स्वतंत्र. मी कशातच बध्द नाही. मी कशावरही अवलंबून

नाही.'' या भावनेने जीवन कंठू लागलो तर आपण समाधानाने जगूं शकू !

देह नाहीसा होतो. भावना नाहीशा होतात. विचार नष्ट होतात. पण 'मी' मात्र स्थिर ! चिर ! शाश्वत ! भाव स्थिर असेल, परम सत्याचा अंश आपण ! ही कल्पना मनांत रूजली तर ताप व्हायचा प्रसंगच येत नाही.

बुध्द प्रसन्न-प्रशांत. तो जिकडे संचार करी, तिकडे विरक्ती, वितराग यांचा झंझावात येत असे. हजारो तरुण तरुणी ''बुध्दम शरणम गच्छामि। संघम शरणम गच्छाम़ी ॥'' असे म्हणत बुध्दाचे अनुसरण करीत असत.

एकदा बुध्द आम्रवनात झाडाखाली बसला होता. त्याचा उपदेश ऐकून अनेकांच्या ह्रदयात परिवर्तन झाले. श्रोतृवर्गात अनेक राजे, सामंत, श्रीमंत, सामान्य जन, सर्व प्रकारचे लोक होत. एक युवक उभा राहिला. बुध्दाला वंदन करून म्हणाला, ''मला तुमच्या धर्मात घ्या !''

बुध्दाने विचारले, ''कोण तूं ?''

तो म्हणाला, ''मी क्षत्रीय !''

बुध्द म्हणाला, ''क्षत्रियांना या धर्मात प्रवेश नाही.''

दुसरा एकजण उभा राहिला, त्यानेही बुध्दाला वंदन करून विनंती केली,

''मला तुमच्या धर्मात घ्या !''

बुध्दाने त्यालाही तोच प्रश्न विचारला, ''कोण तूं ?''

''मी ब्राह्मण !'' तो युवक म्हणाला.

''ब्राह्मणांना इथे प्रवेश नाही.'' बुध्द म्हणाला.

आणखी एकजण पुढे आला. बुध्दाला वंदन करून म्हणाला,

''मला तुमच्या धर्मात घ्या.''

बुध्दाने विचारले ''कोण तू ?''

तो म्हणाला, ''मी वैश्य !''

''या धर्मात वैश्यांना प्रवेश नाही !'' बुध्द म्हणाला, ''क्षुद्रांनाही या धर्मात प्रवेश नाही !''

अनेक युवकांना बुध्द धर्म स्वीकारण्याची उत्सुकता लागून राहिली. बुध्दाने त्या सर्वांना तोच प्रश्न विचारला. ''कोण तूं ?'' कोणी म्हणाला श्रीमंत, कोणी म्हणाला मी गरीब, कोणी म्हणाला मी विद्वान पंडित ! कोणी म्हणाला मी अशिक्षित अडाणी ! बुध्दाने या सर्वांनाही प्रवेश नाकारले.

शेजारी बसलेल्या आनंदाने विचारले, ''भगवन् ! येवढे सगळे लोक आपल्या धर्मात येण्याची इच्छा करीत आहेत. आपण ब्राह्मणादि सर्व वर्णीयांना श्रीमंताना, गरीबांना, शिक्षित आणि अशिक्षितांना प्रवेश नाकारता आहात. तर मग आपण कोणाला प्रवेश देणार आहात ?''

तेवढ्यात एकजण पळत धापा टाकित बुध्दांपाशी आला. साष्टांग नमस्कार करून म्हणाला, ''भगवान, मला तुम्ही आपल्या धर्मात घ्या !''

बुध्दाने विचारले, ''कां ?''

''मला निर्वाण प्राप्त करून घ्यायची फारच इच्छा आहे. अनेक

वर्षापासून मी आपली वाट पहात होतो. आज मला हे भाग्य लाभले. तुमच्या चरणांशी आलो. मजवर अनुग्रह करा !''

बुध्दाने विचारले, ''कोण तूं ?''

तो म्हणाला, ''गेली कित्येक वर्षे तुमचेच स्मरण करीत राहिलो. मला कांहीच आठवत नाही. मी कोण ? हेच मी विसरलो. मला निर्वाण द्या !''

बुध्द म्हणाला, ''तुला निर्वाण कधीच मिळून गेले आहे. पण मी विधिवत् निमित्त मात्र तुला दीक्षा देतो !''

जे कोणीच नाही-काहींच नाही, त्याला निर्वाण क्षेत्रांत प्रवेश ! आपण ब्राह्मण-क्षत्रिय असे जे समजतात त्यांना हा धर्म लाभत नाही. सकल-भाव-त्याग केलेले लोकच निर्वाणाचे अधिकारी.

जे कोणीच नव्हेत, त्यांना 'स्वयंभू' क्षेत्रांत प्रवेश ! निद्रेंत प्रवेश करायचा असेल तर मी असला, मी तसला, हे विसरले पाहिजे. मी मालक, मी सेवक हा भाव नाहीसा झाला तर निद्रा ! तशीच ''भगवन्निद्रा !''

मंत्रयोग हठयोग लययोग
भक्तियोग मेले निंदु
राजयोग मेले नडिवुदु काणिरे
योगातीतं मनोतीतं भावातीतं निरंजनं
सर्व शून्यं निराकारं परमानंदमव्ययं
एंदुदागि शिवजीव लिंग प्राणि शिवयोग वेंबुदे ऐक्य.
महालिंगैक्यर निलव अनुमानिगळेत्त बल्लरू कूडल संगमदेव !

**भावार्थ :** मंत्रयोग, हठयोग, लययोग, भक्तियोगावरराहून राजयोगावर राहून, योगातीत, मनोतीत, भावातीत, निरंजन, सर्वशून्य, निराकार, परमानंद, अव्यय अशा शिव-जीव, लिंग-प्राणी शिवयोग हेच ऐक्य. महालिंगैक्यांची अवस्था संशयी जनांना कशी समजेल कूडलसंगम देवा ?

मंत्रयोग, लययोग, हठयोग व त्यांनतर राजयोग. या सर्वांच्या पलिकडे, जाऊन विलीन झाला कोठे ? जेथे शिवभाव, जीवभाव, लिंगभाव, प्राणभाव नव्हता, तेथे थांबला. तो शिवयोग. हीच शिवसमरसता.

**मंत्रयोग** ! म्हणजे स्पंदनांचा अनुभव घेणे. मधुर स्पंदन. ॐकार स्पंदन. सोऽहं स्पंदन अथवा कोणते ही मंत्र-स्पंदन !

शब्द आणि ध्वनी रूपाने अनुभव आला तर तो बाह्य मंत्रयोग. अंतरंगात भावरूपाने त्या स्पंदनांचा अनुभव आल्यास तो अंतरंगाचा मंत्रयोग ! अत्यंत पवित्र भावना निर्माण करणाऱ्या स्पंदनांमध्ये मग्न होणे हाच मंत्रयोगाचा मूळमंत्र होय.

**लययोग** ! नाद, बिंदु, कला यांमध्ये मन लीन करणें हाच लय योग !

**हठयोग** ! देहाच्या कणाकणामध्यें प्राण व्यापून आहे. हे दैहिक प्राण ! विश्वामध्यें पसरलेले विश्व प्राण ! दैहिक प्राणशक्ति ऊर्ध्वमुख करून अनंत विश्वाच्या प्राण शक्तीमध्यें आवाहन करून प्रतिष्ठापिली तर तो हठयोग !

**राजयोग** ! एखादी पवित्र वस्तु पाहात असतां त्या वस्तुमध्यें मन मग्न झाले तर तो बाह्य लय योग ! त्या वस्तूचे अनुसंधान करीत असतां त्या वस्तूला प्रकाशमान करणाऱ्या प्रकाशाकडे ध्यान दिले तर ते सांख्यतारा !

त्या वस्तू-प्रकाशक प्रकाशाच्या ज्ञानामध्ये चित्तेकाग्रता निर्माण झाली तर ते सुध्दां सांख्यतारा होय. इष्टलिंगाचे दृष्टि अनुसंधान करीत असतां मग्नता झाली तर तो लय योग ! त्या लिंगाला दाखविणाऱ्या प्रकाशामध्यें व लिंग प्रकाशक प्रकाशामध्यें आणि त्या सर्वांचे ज्ञान करून देणाऱ्या जाणिवेच्या ज्योतीमध्यें मन मग्न झाले तर ते सांख्यतारा होय !

मनामध्यें बिंबलेल्या लिंगामध्ये मग्नता उत्पन्न झाली तर तो आंतरिक लय-योग. त्या आंतरलिंग मूर्तीला प्रकाशमान करणाऱ्या, दाखविणाऱ्या प्रज्ञा ज्योतीमध्यें तल्लीनता लाभली तर ते **'मध्य तारा'** ! मनांतील सर्व कांही विलीन झाले म्हणजेच सर्व भाव आणि विचार तरंगांना शांत केल्याने ते मन अमनस्क होते. निश्चल ! निःशब्द होते. अशा अमनस्क मनाला प्रकाशमान करणाऱ्या जाणिवेच्या अनुभूतीमध्ये तल्लीन झाले तर ते **'अमनस्क तारा'** होय. या तीन्ही पासून होतो तो राजयोग. **पुरुष-प्रज्ञायोग** !

शिवयोग, मंत्रयोग, लययोग, हठयोग, राजयोग यांची वलयें ओलांडून गेले असतां तनु, मन, भाव नाहीसे होतात. तेव्हा ध्यान करणारे आपण मनाच्याही **स्वात्मास्तित्वांत** थांबतो. तेथे जीव-शिव भेद नाही. देह-प्राण-मन भाव नाही. तेथे विमल शांति ! ती शिवयोगाची अंतिम अवस्था ! त्या शिवयोगांत 'स्वयंभू' अवस्था आहे. 'स्वयंभू' प्रज्ञा आहे. ती प्रज्ञानुभूती मिळवून जगात व्यवहार केला तर बंधन नाही ! भार नाही ! निरभार जंगम अवस्था ती ! तेथे सहज जीवन !

अध्यापन करताना अध्यापक, व्यापार करताना व्यापारी, उपचार करताना वैद्य, ज्या त्या कामात ती भाषा, ते वर्तन. तो व्यवहार थांबता क्षणीच 'मी' 'माझ्यामध्ये' असणे हाच शिवयोग !

मी गुरु केव्हां ? उपदेश करताना तेवढाच. या वेदिके वरून उतरतांच. 'मी' 'मीच'. गुरु नव्हे ! उपदेशक नव्हे ! अशी सहज अवस्था प्राप्त झाली तर 'शांती' ! नाहीतर तो संसार होय !

फार मोठा ऑफिसर सर्वजण सलाम करतात. येतां, जातां, बसतां, उठतां. पण हे खरे नव्हे. निवृत्त होतांच दुसऱ्या क्षणी शिपाई सुध्दा उपेक्षा करतो. तेव्हा तसेच होते. आतां असेच आहे. त्यासाठी वाईट वाटून घ्यायचे कारण तरी काय ? ती लोकांची चूक नव्हे. हे जगाचे सामान्य सत्य. हे ज्ञान नसेल तर ती आपली चूक ! आपला मोठेपणा, गौरव दुसऱ्यावर अवलंबून राहू लागला तर ताप होणारच. आपण कोणत्याही अधिकारात असो वा निवृत्त झालेलो असो. आपण ते काही नव्हे. आपण 'स्वयंभू सत्य' ! हा भाव दृढ झाला तर आनंदच आनंद ! तो सुख-दुःखाच्या पलिकडचा. ही अवस्था ज्याने प्राप्त करून घेतली तोच योगी होय. भगवन् स्वयंभू आहे. या चिंतनातून हा योग होतो.

बसवण्ण, अल्लम, तुकाराम हे सर्वजण किती सहजपणें कांहीही डोक्याला ताप करून न घेता कशाचाही त्याग न करता, शांत शांत जीवन कंठून गेले !·



## २८

वस्तूला अनेक पैलू, अनेक मुखे. कोणीही वस्तूकडे पाहिले तर सर्व मुखे दिसत नाहीत. एका दृष्टीकोणातून एक पैलू, एक मुख दिसेल. कधी कधी ते एक  मुख सुध्दा विपर्यस्त होऊन दिसेल. माणूस जिज्ञासु. वस्तुचे समग्र ज्ञान मिळविण्यासाठी प्रयत्न करणारा प्रथम मनुष्य त्या वस्तूला अति जवळून पाहण्याचा प्रयत्न करूं लागला. नंतर वेगवेगळ्या दृष्टीकोणातून त्याने ती वस्तु पाहिली. त्यानंतर त्या वस्तूच्या अंतरंगात प्रवेश करण्याचा प्रयत्न त्याने केला. त्याला जे दिसले ते असे-प्रत्येक वस्तूला तीन अंग, एक अंग 'काल' मध्ये पसरले. एक अंग 'देश' मध्ये पसरले. एक अंग 'भाव' मध्ये. अशा रीतीने बहुमखी वस्तूच्या महासंचयाला त्या प्रथम ऋषीने 'विश्व' हे नांव दिले. अत्यंत अन्वर्थक नांव !

असंख्य वैविध्यतेने नटलेल्या विश्वाला समग्रपणे पाहतां येत नाही, याची जाणीव त्याला झाली. त्यामुळे त्या विश्वाला समग्रपणे जाणण्याचा प्रयत्न सोडून देऊन, जे जाणले असता, सगळे विश्व जाणल्याप्रमाणे होते, त्या वस्तूच्या शोधात तो निघाला. त्या ऋषीने जे सांगितले ते शतशः सत्य. विश्व असो अथवा एखादी वस्तू असो, पूर्णतः जाणतां येत नाही. घरचा यजमान घरांतच जन्मून लहानाचा मोठा होतो. कित्येक दशके तो घरांतील माणसांच्या संगतीत असतो. पत्नी-मुले यांच्यासाठी खूप कष्ट उपसतो. येवढे असूनही

त्याला आपल्या घरांतील सर्वांचा स्वभाव, त्यांचे अंतरंग संपूर्णपणे जाणतां येत नाही. कितीही शहाणा, ज्ञानी असला तरी ते शक्य नाही. असे असतां आपण सर्व कांही जाणतो असे समजणे भ्रमच !

विश्वाच्या स्वरूपाचा निश्चित निर्धार करण्याचा प्रयत्न करणाऱ्या चिंतकाने विभिन्न तत्वज्ञान मांडले. कोणी या विश्वाला सत्य म्हटले, कोणी असत्य म्हटले. कोणी मिथ्या (माया) म्हटले. एका पाश्चात्य तत्वज्ञान्याने 'जाणतां येणे अशक्य.' 'विश्व अज्ञेय आहे.' असे म्हटले आहे. विश्व समजले असे भासते. पण तो आभासच ! विश्व केवळ विविध मुखी आहे, असे नव्हे. तर क्षणा क्षणाला ते बदलते. 'इदम् इत्थं !' असा निर्धार करणे कठिण !

वैज्ञानिक संशोधन करीतच आहेत. प्रारंभी त्यांना वाटले, वस्तूचे मूळ रूप अणु एखादी घन वस्तु असावी. त्यानंतर तो अणु इलेक्ट्रॉन, न्यूट्रॉन, प्रोटॉन यांनी युक्त आहे, असा शोध लागला. अगदी अलिकडे अणुमध्ये फक्त तीनच अंश नसून त्यांत कित्येक उपांगे असल्याचे आढळून आले आहे. एवढेच नव्हे तर अणु म्हणजे एक शक्तिपुंज असे त्याना आढळून आले. अजून अंतिम निर्धार व्हायचा आहे.

हे सर्व जाणून ऋषि विश्वाला जाणून घ्यायचा नाद सोडून स्वतःचे स्वरूप जाणण्याचे प्रयत्न करूं लागला. अंतरंगात डोकावून पाहूं लागला. अद्‌भूत ! बाह्य जगाहून क्लिष्ट, विवैध्यपूर्ण, क्षणिक असे भाव, विचार, कामना इत्यादींनी भरलेले मनोजगत त्याला आढळले. हे मनोजगत् अद्‌भुत. अत्यंत अस्थिर !

बाह्य जगत् मनोजगता एवढ्या तीव्र गतीने बदलत नाही. आज पाहिलेले

घरदार उद्याही तसेच असते. मनोजगत तसे नाही. या क्षणी प्रेमाचा प्रवाह असेल तर दुसऱ्या क्षणी द्वेषाने भरलेला आढळून येतो.

प्रारंभी ऋषीला बाह्य जगत जाणण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा आंतर जगत जाणणे सोपे आहे असे वाटले. पण अंतरंगात डोकावून पाहात असतां, दिसून आले की, आंतर विश्व जाणणे बाह्य जगत जाणण्या येवढे सोपे नाही. बाह्य वस्तू, मोजतां येते, स्पर्शाने जाणतां येते, वजन करतां येते. पण आतील वस्तू वजन करता येत नाही, मोजता येत नाही, की धरतां येत नाही. एवढेच नाहीतर कोणताही भावतरंग क्षणा-दोन क्षणाहून अधिक काळ एकाच रीतीने नसतो. असे हे मन जाणायचे कसे ? विचार करून त्याने निर्णय घेतला की बाह्य जगत जाणण्याचा प्रयत्न करायला नको, की आंतर जगत जाणण्याचा प्रयत्न करायला नको. या दोहोना जाणण्याचा प्रयत्न करणारा जो 'मी' आहे, त्या 'मी' ला प्रथम जाणून घ्यावे, असा त्याने विचार केला. बाह्य जगाला जाणण्याचा प्रयत्न करणारा, तो भौत संशोधक, आंतर जगत जाणण्याचा प्रयत्न करणारा तो मनोवैज्ञानिक, ऋषि त्या दोन्ही क्षेत्रां पलिकडे असणाऱ्या आत्म क्षेत्राच्या संशोधनांत गुंतला तो आत्म संशोधक ! तो शोधीत शोधीत बाह्य जगत व मनाचे भाव जगत यांना अतीत (पलिकडे) अशा अवस्थेस पोहोचला. तेथे 'मी' होता. आणखी काहींही नव्हते. ही एक जाणीव. केवळ अस्तित्व ! ते अव्याकृत ! ते सत्य ! शब्दांना न गवसाणारे स्थिर तत्व ! तेथे सर्व काही शांत होते. कालसुध्दा. ऋषि, अमृत, सत्य, मंडल प्रवेश करता झाला. त्या स्थितीविषयी त्याच्या मुखातून उद्गार निघाला.

"द्रष्टा द्रशि मात्रः । शुध्दः । आत्मप्रत्ययानुपश्यः ।"

बाह्य जगत् दृश्य ! मी द्रष्टा. पाहणारा ! हे दृश्य जगत दिसण्यासाठी

मन असायला पाहिजे. मनामध्ये त्या दृश्य वस्तूचे चित्र उमटते, ती वृत्ती मनाचे तरंग ! त्या मनामध्ये उमटलेले चित्र मी पाहतो. मनांत उमटलेले चित्र पाहणारा मी द्रष्टा ! वृत्यात्मक मनामध्ये असलेले चेनत ते. उदा. फूल बाह्य दृश्य ! त्याचें मानसिक चित्र, आंतरिक दृश्य ! त्या दोन्ही दृश्यांचे ज्ञान होते ना ते 'प्रतिभान'. ते असलेले चेतनच 'द्रष्टा' जाणणारी वस्तू ! ज्ञान असलेले तत्व ! तोच 'मी'. तोच नित्य ज्ञानरूप. जाणिवेची अंतर्ज्योति ! ऋषीने जाणलेले. द्रष्टा वस्तु. केवल दृशि; जाणिवेची घन वस्तु ! हे त्याने जाणले होते.

द्रष्टा केव्हां ? दृश्य असेपर्यंत मात्र ! पाहून घेणारी वस्तू असे पर्यंत 'पाहणारा' हा भाव ! दृश्य ही तसेच. द्रष्टाभाव असेपर्यंत दृश्य ! हे दोन्ही परस्परावलंबी. सापेक्ष कल्पना. डावे, उजवे, वर-खाली वगैरे असल्याप्रमाणे. हे सापेक्ष क्षेत्र ओलांडून त्यापुढे जाऊं पाहणारा ऋषि. दृश्य भाव नाहीसा झाला तर काय शिल्लक राहते याचे कुतुहल. दृश्य वस्तूंना त्याने लपविले. तेव्हा बाह्य जगत दृष्टिआड झाले. आतले जगतही नाहीसे झाले. तेव्हा सर्व रिकामे, मोकळे झाले होते अंतरंग ! दृश्य द्रष्टा दोन्ही कल्पना विलीन झाल्या होत्या. मनामध्ये काहींही नव्हते. रिकामे झाले होते मन. त्या रिकाम्या मनालाच 'अमन' म्हणतात. त्या अमनामध्येच जाणीवेचा प्रकाश ! दुसरे दृश्य नव्हते. केवळ चेतन प्रकाश ! हे दृश्य नव्हे. द्रष्ट नव्हे. तो केवळ दृशि. ऋषीने तो अनुभव घेतला. अनुभवी झाला ! संत्यदर्शी ! सत्यसाक्षात्कारी झाला ! महाप्राज्ञ झाला. केवढा अद्भूत शोध त्याचा !

या प्रथम ऋषीचा अप्रतिम अनुभव सांसारीक जंजाळात सापडलेल्या आपणाला कसा बरे भाव गम्य होईल ? मुंबई सारख्या शहरात मोठ्या रस्त्यावर आपले एक छोटेसे घर ! रात्रंदिवस हजारो वाहनांचा संचार. विपरीत

ध्वनि ! ध्वनि मालिन्यांत; अशा शहरांत जीवन कंठणाऱ्यांना 'निःशब्दता' हा अनुभव कसा येईल ? आपली स्थिती अशीच आहे. केवळ ध्वनि मालिन्य नव्हे. शेकडो भाव मालिन्यांत घर करून जगणाऱ्या आम्हांला त्या अनंतदृशि मौनाचा अनुभव कसा येईल ?

जपान देशांत एक सर्वश्रेष्ठ तत्वज्ञानी गुरु होता. त्या गुरुसन्निधी एक साधक आला. सत्य ज्ञान करून घेण्यासाठी. त्याने अनेक वर्षे खूप खूप प्रयत्न केले. कित्येक वर्षे उलटली तरी त्याला सत्य दर्शन झाले नव्हते. हे दुःख त्याला जाचत होते. तो गुरुपाशी राहात होता. सत्य दर्शनाच्या क्षणाची आतुरतेने वाट पाहात होता.

गुरु महाराजानी एकदां त्याला पाण्याने भरलेले मडके देऊन पलिकडच्या मठांत पोहोचवायला सांगितले. शिष्य दोन्ही हातांत पाण्याने भरलेले मडके घेऊन निघाला. रात्रीची वेळ. आकाशांत चंद्र. मडक्याच्या पाण्यांत सुंदर चंद्रबिंब पहात तो निघाला. वाटेंत अडखळला. मडके फुटले. पाणी सांडले ! पाणी नाही ! चंद्र नाही ! सगळे रिकामे ! शून्य ! त्या रिकाम्या क्षणी त्याला सत्य दर्शन झाले. मन मोकळे ! रिकामे ! शून्य ! त्यामध्ये पाणी नव्हते. चंद्र नव्हता. पाहणारा द्रष्टा नव्हता. केवळ 'मी' ! कांहीही नसलेले अस्तित्व ! तेच निर्वाण ! 'नाही' याचे दिव्य दर्शन त्याला घडले. त्या 'नाही' ला प्रकाश देणारे दिव्य सत्य दर्शन त्याला घडले होते.

आमची घागर किती वेळा फुटली असेल ! वाचून वाचून पुस्तके फाटून गेली. पूजा करून मूर्ती झिजून गेली आहे. वन वन भटकून भटकून तीर्थक्षेत्रे उजाड झाली आहेत. तरीही आपणाला सत्य दर्शन घडले नाही. सत्य दर्शनाच्या क्षणाचा आपण उपयोग करून घेतला नाही.

तुळसीदास अनेक अडथळ्यांना न जुमानतां पत्नीपाशी गेला, पत्नीने विचारले, ''या भयानक रात्री तुम्ही कां आलांत ? माझ्यावर एवढा मोह धरण्या ऐवजी देवावर धरला असता तर तो निश्चितच तुम्हाला प्रसन्न झाला असता !'' त्याच क्षणी तुळसीदासाचे डोळे उघडले. तो संत झाला. अशा घटना प्रत्येकाच्या जीवनांत कोणत्या ना कोणत्या तरी रीतीने घडतच असतात. पण तुळसीदासाने जसा त्या क्षणाचा सदुपयोग केला तसा आपण कोठे करतो आहोत, कोणीही कांही ही म्हटले तरी आपण कोठे मनाला लावून घेतले ?

किती वेळा आपल्या हातून पाणी सांडले नसेल ? पण या घटनेचा पाणी सांडण्याच्या प्रसंगाचा आत्मसाक्षात्कारासाठी उपयोग करून घेण्याची मानसिक सिध्दता आपणास कोठे लाभली आहे ? तशी सिध्दता असती तर एका क्षणाला आत्मसाक्षात्कार झाला असता. काडी पेटायला कितीसा वेळ लागतो ? आपण घर्षण होऊ न देता. काडी आगपेटीच्या बाजूवर हळुवारपणे दिवसभर फिरवत राहिलो तरी काडी पेटायची नाही. तसेंच अभिप्सा नसेल तर शंभर वर्षे आपण ग्रंथ वाचत राहिलो, प्रवचन ऐकत राहिलो तरी काय उपयोग ?

सत्य शोधायचे ते बाहेर नव्हे. तसे बाहेर शोधले तर ते सांपडणे कठिण. ते तर शोधणाऱ्याच्या अंतरंगातच आहे. दिसणाऱ्या वस्तूंच्या पलिकडे, बाह्य जगांत अथवा भाव जगांत ते सत्य शोधणाऱ्याची दृष्टि स्वतःकडे नसते. शोध थांबला तर सत्य अनुभवाला येईल. गुप्त मंचण्णा यांचे वचन पहा.

**मार्तंडन किरणदंते, स्फटिकद घटदंते,**
**होद्दियू होद्ददंते, इद्दू इल्लदंते,**
**कंडू काणदंते, केळियू केळदंते इप्प**

**सुळिव जंगम मूर्तिय कंडु**
**नमो नमो एंबे नारायण प्रिय रामनाथा !**

**भावार्थ :** मेघाच्या इंद्रजाला प्रमाणे, मयूराच्या निद्रेप्रमाणे मार्तंडाच्या किरणाप्रमाणे पांघरूनही न पांघरल्याप्रमाणे, असूनही नसल्याप्रमाणे, पाहूनही न पाहिल्याप्रमाणे, ऐकूनही न ऐकल्याप्रमाणे संचार करणाऱ्या जंगम मूर्तीला पाहून नमो नमो म्हणतो. नारायण प्रिय रामनाथा !

मराळ म्हणजे मेघ. अरूणाचा सुवर्ण वर्ण त्याला लेपतो. भूमीवर उभे राहून पाहणाऱ्या कवीला भावोन्मादाने देहभान विसरायला लावील असा रंग विन्यास ! मेघांचे हे इंद्रजाल. पण ते सर्व पाहण्यापुरते तेवढेच. मेघमंडलाला जाऊन पाहिले तर तेथे शोधून कांहीच सांपडायचे नाही.

मार्तंड किरण. सूर्य रश्मि ! तेही सर्वत्र पसरतात. सर्व वस्तु तेव्हां गोचर होतात. उदा. गुलाबाचे फूल. सूर्याचे किरण गुलाब पुष्पावर पडले तरच ते आपणांस दिसते. पण आश्चर्याची गोष्ट अशी की आपण गुलाबाचे फूल पाहिलेच नाही. त्या फुलावर पडून परावर्तित झालेल्या सूर्य किरणांना आपण पाहिले. याहून अधिक सूक्ष्मपणें सांगायचे तर आपण गुलाब ही पाहिला नाही अन् परावर्तित सूर्य किरणही पाहिले नाहीत. त्या किरणांनी आपल्या डोळ्यांतील दृक्.पटलावर 'रेटिनावर' केलेल्या परिणामाची संवेदना अनुभवली. केवढे विचित्र आहे हे ! आपण सूर्यकिरण पाहिले. ते काय आहेत ? याचा शोध घेऊं जातां आपण ते किरण पाहिलेच नाही. ते केवळ प्रोटॉन स्पंदन होत. न दिसणारी कंपने ती. तरी पण पाहिल्याचा भाव !

स्फटिकाचा घडा. दुधाने भरला तर तो पांढरा दिसतो. पण स्फटिक

पांढरे नाही. ते पारदर्शक ! स्फटिकाला स्वत:चा असा रंग नाही. जो आपणांस दिसतो, तो स्फटिक कलश वर्ण नव्हे. दुधाचा वर्ण. पण आपणांस भ्रम होतो. स्फटिक कलश वर्ण पाहिल्याचा. दिसले ते काय ? याचा शोध घेऊं जातां तो वर्ण तेथे नाहीच.

या दृष्टांतामध्ये सांगितलेल्या तीन गोष्टी, पाहूनही न पाहिल्याप्रमाणे, पांघरूनही न पांघरल्याप्रमाणे; असून नसल्याप्रमाणे ! केवढे मार्मिक दृष्टांत हे !

त्याप्रमाणें जंगम ! ''प्रपंच पांघरूनही न पांघरल्याप्रमाणे. या जगांत असूनही नसल्याप्रमाणे, सर्व पाहूनही न पाहिल्याप्रमाणे, ऐकूनही न ऐकल्याप्रमाणे !'' गुप्त मंचण्णाने बसवेश्वरांचे वर्णन केले ते असे. बसवण्णांच्या सभोवती धर्म-समाज-प्रपंच पसरला होता. हजारो अतिथि रोज त्यांच्या घरी असायचेच. त्या सर्वांमध्यें असून सुध्दां नसल्याप्रमाणे, सर्व चांगले वाईट पाहून-ऐकून परिश्रम करून सुख, दु:ख अनुभवून सुध्दां निर्लिप्त राहणाऱ्या बसवण्णांचे वर्णन गुप्त मंचण्णाने प्रपंच पांघरलेला जंगम असे केले. ही बसवण्णांची थोरवी ! पारमार्थिक महासाधना ही ! भक्तीचे पीक तरारले ते बसवण्णांमुळेंच या शब्दांत बसवण्णांचे वर्णन अल्लम प्रभूनी केले.

बसवण्णांच्या निर्लिप्त जीवनाचे वर्णन या वचनांत केले आहे. त्यांचे निर्लिप्त असे अद्भुत जीवन.

*''दृष्टा दृशि मात्र: ।''*

दृशि अवस्था प्राप्त झालेला माणूस या जगांत कसा नांदतो ? अनुपश्य:, मनाबरोबर मन होऊन बुध्दिबरोबर बुध्दि होऊन ''शुध्द: आणि

प्रत्ययानुपश्य:'' त्या परिशुध्दतेची अनुभूति प्राप्त करून घेऊन तो ज्ञानी. महानुभावी ! आपण जसे वर्तन करतो, तसेच तोही वर्तन करतो. प्रत्ययांच्या द्वारे तो पाहात असतो. मनाच्या वृत्तींच्या द्वारे जगाचा अनुभव घेत असतो. पण तो ''दृशि मात्र:'' दृशि मात्र होऊन, साक्षी होऊन जगतो.

दृशि अनुभूति ज्याला लाभली तो द्रष्टा, ऋषि ! तो मन: प्रत्ययांच्या, वृत्तींच्या द्वारे जगांत व्यवहार करतो. पण अंतरंगात अत्यंत निर्लिप्त ! निरामय असतो. बहिरंगांत तो प्रपंचाचा भार वाहतो. अंतरंगात त्याच्यावर कसलाच भार नाही. बहिरंगांत तो लौकिक होऊन असतो. अंतरंगात तो नसतो. बहिरंगात तो सर्व कांही पाहतो. अंतरंगात पाहात नाही. बहिरंगात स्तुति निंदा ऐकतो. अंतरंगात ऐकत नाही. अंतरंगात प्रशांत... महामौन !

अंतरंगात जीवन्मुक्त ! बहिरंगात कर्मयोगि ! हे अत्यंत मधुर असे भगवत्-चिंतन ! अशा जीवनमुक्त जीवन साधनेसाठी चिंतन ! आजच्या या चिंतनाचे नांव **'दृशि चिंतन.'**



## ೲ २९ ೲ

आपल्या सभोवतालच्या वस्तु, आणि त्यांचे सौंदर्य पाहिले असतां एक गोष्ट व्यक्त होते. प्रामुख्याने नजरेंत भरते. या जगांतील प्रत्येक वस्तु उत्पन्न होते. नाश पावते. ही वस्तु केव्हां उत्पन्न झाली ? केव्हीं ही वस्तु नाश पावेल ? हे आपण निश्चितपणे सांगू शकतो ! कां बरे ? ती वस्तु सीमित असते म्हणून. जनन-मरण, आदि-अंत यांमध्ये जीवन-अस्तित्व ! जीवन आदि पासून प्रवाह आरंभ-अंताकडे अनंत सत्याकडे, शून्याकडे प्रवास !

आपला देह ही तसाच ! जन्मतो, वाढतो, जगतो, नाश पावतो. अति अधिक म्हणजे शंभर वर्षे ! यौवनाच्या चढत्या श्रेणींत म्हातारपण आणि मरणाचे भान नसते. तरुण वयांत माणूस स्वप्ने पाहतो. 'लाथ मारीन तेथे पाणी काढेन.' ही धमक अंगात असते. कोणतेही काम अशक्य वाटत नाही.

सम्राट नेपोलियन म्हणत असे, ***"Impossible is a word which can be found in the Dictionary of fools."*** माझ्या शब्द कोशांत अशक्य हा शब्द नाही ! असेल दुसऱ्या कुणातरी मूर्खाच्या डिक्शनरींत. दैव दुर्विलासाने त्याच्या जीवनांतच तो 'असाध्य' शब्द दृढमूळ होऊन राहिला. सेंट हेलेना येथील बंदीखान्यांतील त्याचे जीवन केवढे निराशेने भरलेले. तो आंसू ढाळू लागला. दुःखी झाला. ज्या माणसाला असाध्य हा शब्द माहित नव्हता, त्या

माणसाला अंतकाळी स्वातंत्र्य सुध्दा नसावे ? खाणे-पिणे, कपडे, बोलणे-चालणे सर्व बाबतींत बंधने ! संपूर्ण युरोपावर राज्य करण्याची स्वप्नें पाहणाऱ्या; त्याची अर्ध्याहून अधिक पूर्ति अनुभवलेल्या नेपोलियनची ही अवस्था ! तर मग सामान्यं जनांची काय कथा ?

आपल्या यौवनावस्थेंत संपूर्ण जगाचे चित्र बदलून टाकण्याचे क्रांतिकारक स्वप्न माणूस पाहतो. देहांत रग असते. मनांत अमित उत्साह असतो. जन्माचे ऐलतीर माहित असते. मृत्यूचा पैलतीर दिसत नसतो. मध्यम वयानंतर पैलतीर दिसूं लागतो. मरणाची चाहूल लागते. तेव्हां स्वप्ने नि:शक्त होतात. दिसली तरी थोडक्यांत आपला पसारा आवरतात.

जे जे कांही जन्मले त्याचा अंत होतोच. जेव्हा अंत दिसायला प्रारंभ होतो, तेव्हा पूर्वीचा उत्साह साहस उरत नाही. शेवटी जगापासून निवृत्त होण्याच्या अवस्थेला माणूस पाहोचतो. देहाला जसा हा नियम लागू होतो. तसाच सृष्टीतील प्रत्येक वस्तूलाही हा नियम लागू पडतो. संपूर्ण विश्वालाच आदि आहे. अंतही आहे. मध्यंतरी हे विश्व गोचर होते. हे विश्व जीवनाचे चित्र. या जीवन चक्रांत जे तत्व सांपडलेले नाही, ती वस्तु म्हणजेच देव ! म्हणजे ती वस्तु एकाच विशिष्ट काळांत उत्पन्न झाली नाही, ज्याला बाल्य, यौवन, वार्धक्य अशा अवस्था नाहीत, ते कांही कोणत्याही रीतीने सुध्दा नष्ट करता येत नाही, तेच देवतत्व. भगवंताच्या विषयात तो कधी जन्मला ? कधी त्याचे लग्न झाले ? तो कधी मरेल ? या प्रश्नांना मुळीच अर्थ नाही.

माझ्या देहाला आदि आहे. अंत ही आहे. मनाला सुध्दा आदि अंत आहे. पण याच देहात आणि मनात असणारा 'मी' हा प्रज्ञा तत्व जो आहे, तो मात्र आदि अंता विरहित आहे. त्याला आयुष्य नाही. काळाचा परिणाम

नाही ! तो 'देवांश'. देहामध्ये असल्याप्रमाणे परिणाम पावणाऱ्या समस्त जगांत सुध्दां तो स्थिरपणे आहे. तोच ईश ! तोच देव ! तो अनादि अनंत. तो वास करून राहिलेले जग आणि देह तेवढेच कलिल ! मिश्रण ! काल निबंधित समूह ! येथे विविध वस्तु, व्यक्ति, जीवजंतू, राम-रावण, पापी-पुण्यवंत, सत्यवान-लबाड, बुध्दासारखे, अंगुलीमाल सारखे, मारक तारक ! सर्वजण येथे आहेत ! हे कलिल !

कलिल म्हणजे एखाद्या शहराच्या सांदिकोपऱ्यांतून वाहात जाऊन ोवटी एक मोठा प्रवाह होतो ना ? तसे ! त्या पाण्यांत काय नाही ? हजारो ाखो घरांतील मालिन्य ! सर्व धर्मियांनी, सर्व जातीपंथाच्या लोकांनी उपयोग केलेले पाणी ते ! गढूळ ! हजारो वासनांचे मिश्रण ! कित्येक रूचींचे मिश्रण ! कित्येक दृष्टीभाव, विचारांची जत्रा ! जगत् सर्व संकलन असल्याने त्याचे स्वत:चे असे वैभव त्याला आहे. त्याचे स्वत:चे आगळेच सौंदर्य ! आगळीच कुरुपता ! कलिल मार्मिक शब्द ! आपल्या सामान्य ग्रामीण भाषेत सांगायचे तर ती 'घाण'.

जग आहे, हे असे आहे; असे समजले तर माणूस शहाणा होतो. कांही असले तरी, कांही झाले तरी तो फारसे डोके बिघडवून घेत नाही. अगदी टोकाला जाऊन जगाविषयी तो टीका करीत नाही. चिखलांत, घाणींत हात हालविला; पायाने ढवळून काढले तर काय लाभणार ? हात घाण ! पाय घाण ! मनाला घाण ! म्हणूनच 'जगाचा वाकडेपणा सुधारण्याचा प्रयत्न तुम्ही कां करतां ? आपापले मन सुधारा !'

***जगद डोंक नीवके तिद्दुविरी ? निम्म तनुव संतैसिकोळ्ळि. निम्म निम्म मनव संतैसिकोळ्ळि*** असे बसवेश्वर म्हणतात.

जगापासून निवृत्त होऊन राहायला हे एक वाक्य पुरे ! यांत स्वच्छ करणार तरी काय ? किती स्वच्छ करायचे ? आपणांस जगण्यास आवश्यक तेवढेच ! एक तांब्याभर अथवा घागरभर पाणी घ्यावे. ते उकळावे. फिल्टर करावे व प्यायला त्याचा उपयोग करावा. हा सुलभ उपाय ! आपल्या शहरांत कोठे कोठे काय काय आहे ? काय काय चालले आहे ? ते शोधायचा प्रयत्न करू नयें. आपणांला जेवढे हवे; तेवढे आणावे. स्वच्छ करावे. भोजन करावे. अनुभवावे. हे 'ललित' जीवन. कोणा कोणाचे काय काय विचार आहेत ? हे डोक्यांत घालून घेतले, तर आपले डोके सुध्दा 'कलिल' होऊं लागते. याचा अर्थ कोणाचाही विचार ऐकून घेऊं नये, असा नव्हे. आपणांस जेवढे विचार पटतात हितावह वाटतात तेवढेच घ्यावे ! उरलेले विसरावे !

आपण पाश्चात्य राष्ट्रांना जातो. त्यांना मांसाहार सामान्य ! बीअर-वाईन-व्हिस्की सर्वमान्य ! त्यांच्या समोरच बसून, या वस्तू समूहातच बसून जेवायचा प्रसंग आपणावर येतो. आपण संपूर्ण शाहाकारी ! दारूला स्पर्श करणे हे सुध्दा पातक आमच्या दृष्टीने. तर मग अशा प्रसंगी काय करावे ? त्या पाश्चात्यांचा खरपूस समाचार घेऊन, त्यांच्याशी भांडून उपाशी जायचे ? त्यांचे परिवर्तन करायचे ? सोपे नाही ! शक्य नाही ते ! आपणांस एकच मार्ग उरतो, तो म्हणजे त्यांना पाहून सुध्दा न पाहिल्याप्रमाणे करून आपले आवडते शाकाहारी खाद्य व पाणी यांचे सेवन करावे. आपली आहार पध्दति श्रेष्ठ ! त्यांची वाईट. हीन. अशा वादाला जाणें यांत कसला शहाणपणा आला आहे ? आपण युरोप निवासी नव्हे. प्रवासी ! विविध देश पाहून परत येऊन त्या देशांचे कलावैभव, जीवन वैभव, विज्ञान साधना यांचे कौतुक करावे येवढेच !

***कलिलस्य मध्ये अनाद्यनंत***
***विश्वस्त स्रष्टारमनंत रूपम् ।।***

कलिल स्थिर नव्हे, शाश्वत नव्हे ! त्याला आदि अंत आहे. त्या कलीलामध्येच आदि अंत नसलेली दिव्य अनंत वस्तु आहे. ती वस्तु म्हणजे सत्य ! ते अचिंत्य रूप. ते 'भगवंत' विश्वाचा स्रष्टा !

सूर्य प्रकाशामुळे समुद्राच्या पाण्याची वाफ होऊन आकाशात वर जाते. तेथे मेघ बनून भूमीवर येऊन मेघ स्वेच्छेने वर्षाव करतात. नद्या नाले भरभरून वाहतात. सर्व कार्ये सुरु होतात. ही सृष्टि ! ही आकाशाची, सूर्याची-जलाची सृष्टि ! सूर्य प्रत्यक्षपणे या कार्यांत भाग घेत नसला तरी आकाशाच्या सन्निधानी हे कार्य चालते म्हणून आकाश स्रष्टा ! आकाश प्रत्यक्षपणे भाग घेत नसले तरी आकाशाच्या सन्निधानांत हे कार्य चालते. म्हणून आकाशाला स्रष्टा म्हणतात. तसेच भगवंत ! त्याच्या सहज सन्निधानात जग निर्माण होते म्हणजे तो या जगाला कारण ! सन्निधान कारण !

दैहिक ऐंद्रियिक श्रमाने निर्माण करण्याच्या कर्म कारणाहून, इच्छा शक्तीने निर्माण करण्याच्या संकल्प कारणाहून, हे सन्निधान कारण वेगळे आहे.

'क्ष' आहे म्हणून 'अ,ब,क' कार्ये होत असतील तर 'क्ष' हे 'अ,ब,क' यांच्यासाठी सन्निधान कारण ! परमात्मा आहे. त्याच्या सन्निधीमध्ये जगत हे रूप धारण करते. या अर्थाने देव हा विश्व स्रष्टा ! तो अनंत. पाहण्याचे सामर्थ्य आणि साधन असते तर त्याला कोणत्याही रूपांत पाहता येईल. एखाद्या वस्तूमध्ये भगवंताला पाहता येते, एखाद्या वस्तूमध्ये भगवंताला पाहता येत नाही असे नाही. अनेक संतांनी भगवंताला दगडांत पाहिले, मातींत पाहिले, लाकडांत पाहिले. डोंगर, पाणी, आकाशांत पाहिले. सर्व वस्तूंत पाहिले.

गोल्लाळेश्वर बालक ! श्रीशैलाला जाणाऱ्या यात्रिकांच्या हाती चार पैसे देऊन आपणांसाठी शिवलिंग आणायला त्याने सांगितले. यात्रिक विसरला. परत येतांना गोल्लाळेश्वराला पाहून; त्याने शिवलिंग आणायला पैसे दिले होते; हे आठवून त्या यात्रिकाने तेथेच पडलेली एक शेळीची लेंडी उचलून घेतली. "श्रीशैलहून आणलेले पवित्र लिंग ते हेच." असे सांगून ती लेंडी त्याला दिली. गोल्लाळेश्वराला ही लेंडी आहे, असे ओळखले नसेल का ? शेळ्या-मेंढ्यामध्येच तो वावरलेला होता. हातांत लेंडी होती हे खरे ! पण त्याकडे पाहण्याची दृष्टि बदलली होती ! साक्षात भगवंतच हा ! असे समजून त्याने त्या लेंडीची आराधना केली आणि त्याला भगवंत प्रसन्न झाला.

भगवंताला पाहण्याची शक्ति अंतरंगाला आहे. अशी शक्ति ज्यांना लाभली त्यांना पत्नीमध्ये, पतीमध्ये, मुलां-बाळामध्ये भगवंताचे रूप दिसले. तुच्छ वाटणाऱ्या वस्तूंमध्ये सुध्दा अनेकांनी भगवंताला पाहिले. भगवंत येथे आहे, तेथे नाही. हे भगवंताचे रूप, हे भगवंताचे रूप नव्हे. असे माणसाने समजू नये. ज्या डोळ्यांना भगवंत दिसतो त्यांना सर्व समानच.

'विश्वस्य एकं परिवेष्टितारं !' एकैक अशा देवाने समस्त जगत आच्छादिले आहे. तो नसलेले, त्याचा स्पर्श नसलेले स्थान नाही. जगत्-मिथ्या-माया असूं शकेल. असत्य असूं शकेल. पण सर्वांचे अधिष्ठान तो देव आहे. सत्य ! सत्य !! नित्य तो !! असत्य जर कांही असेल तर देवाने त्याला सुध्दा आधार दिला आहे.

निसर्गात सत्यालाच अस्तित्व आहे. असत्य बोलणाऱ्या अप्रामाणिक माणसांत सुध्दा सत्य आहे. सत्य ही भूमि ! असत्य ही सावली. भूमीच नसेल तर सावली कोठून येईल ? असत्याला स्वतंत्र अस्तित्व नाही. चार दिवस

असत्य जगले तरी सत्याच्या आश्रयांत जगते.

''ज्ञात्वा एवमुच्चते सर्व पाशैः'' सत्य (देव) सर्वाधार, सर्वरूप, व्यापक. हे समजले तर तो सर्व पापमुक्त होतो. माणसाला बंधनात टाकणारे पाश फारच सूक्ष्म. तो पाश म्हणजे आशा !

*आशा पाश शतैर्बध्दाः काम–क्रोध परायणः ।*
*इहं ते कामभोगार्थवन्यायेनार्थसंचयान् ।। भ.गी. १६–१२*

मनुष्य अनेक पाशांनी बध्द झाला आहे. लहान आशा असोत अथवा महान आशा असोत. दोन्ही बंधनकारक ! वस्तू व्यक्ति जवळ असे पर्यंत बंधन समजून येत नाही. त्या वस्तू पासून दूर होताना बंधनाचा प्रत्यय येतो. उदा. सिगारेट ओढणे. अनेकजण असे समजतात की आपणास सिगारेटचे व्यसन नाही. गंमत म्हणून सहज आपण सिगारेट ओढतो. असेच आपण प्रतिपादन करतो. पण सिगारेट ओढायला मिळाली नाही तर त्या सिगारेटचे आकर्षण किती आहे. याचा प्रत्यय येतो.

धर्मराजाला द्यूताचे आमंत्रण द्यायला विदुर आला. धर्मराजाला द्यूताचे एवढे व्यसन की द्यूताचे नांव ऐकले तरीं त्याचे हात फासे टाकायला शिवशिवत. विदुराने केवढा समजावयाचा प्रयत्न केला.

''महाराज आपण धर्मानुरागी ! हिताहिताची परिक्षा करून परामर्श करून हे द्यूताचे आमंत्रण स्वीकार करा !''

पण त्याचे काय ? धर्मराजाचे मन सारासार विचार करण्यास, भविष्याकडे दृष्टिक्षेप करण्यास मुक्त नव्हते. धर्मराजाला न कळतच द्यूताच्या व्यसनाने बांधून टाकले होते. अत्यंत सूक्ष्मपणे बांधून टाकले होते. जुगार

खेळणे आपणांस योग्य नव्हे. ते धर्माचरणही नव्हे, असे सांगण्याइतके ते मन मुक्त नव्हते. त्याचा परिणाम काय झाला ? महाभारत !

आपण मानसिक रीतीने अशक्त आहोत. व्यसनाधीन आहोत. दोन-तीन इंच सिगारेट आपणास इतके बांधून टाकू शकते तर मग सत्तर इंच माणसे, शेत घरदार, किती गाढ पणें बांधू शकणार नाहींत ?

''ज्ञात्वा देव मुच्चते सर्व पाशैः'' जेव्हां भगवंताचे चिंतन होऊ लागते तेव्हां सर्व आशापाश तुटून पडतात. मनुष्य विमुक्त होतो. ही विमुक्त अवस्था. सर्व आशा तोडून टाकण्याची शक्ति भगवत् चिंतनात आहे. कलिल वाटणाऱ्या जगांत सत्य शाश्वत वस्तु. कालाची परिमिति नसलेली वस्तू आहे. त्या वस्तूच्या स्मरणांतच जीवन कंठले तर कलिलाचे बंधन उत्पन्न होणार नाही. बंधन असले तरी ते तुटून जाईल ही मुक्ति स्थिति. तेव्हा जग आपणास आप्यायमान होऊन दिसते, जीवन सहज हर्षपूर्ण होते.

समजा तुम्ही वृध्द आहांत. तुमची मुले तुमच्या वचनांत नाहीत असे समजा. त्याचे दुःख कां करायचे ? युवक वृध्दांच्या आज्ञेत असणे विरळच. तुम्ही युवक असतांना ज्यांच्या आज्ञेत होता, तशाच प्रकारच्या लोकांच्या आज्ञेत ते आतां आहेत. ही जगाची रीत आहे. असे समजून असावे. आपले सांगणे त्यानी ऐकले तर ठीक ! नाही ऐकले तरी ठीक ! कसेही असले तरी समाधानी असावे. चिंता कशाची ? कोणत्या प्रयोजनासाठी ? विश्वाचे रूपरंग समजले नाही तर चिंतेचे भार वाहात जगतो ! भार-ताप अनुभवतो. जाणले तर भार रिकामा. चिंता दूर पळते. जीवनाचा प्रवास हलका, सुखकर. असे विमल जीवन कंठण्यासाठी भगवच्चिंतन.



## ३०

चिंतनाचा आज समारोप होत आहे. वैयक्तिक चिंतनाचा समारोप नव्हे हा ! सामुहिक चिंतनाचा समारोप ! चिंतन जीवनाच्या आद्यंत चालावे जसा श्वासोच्छ्वास तसे चिंतन ! श्वासोच्छ्वास जेवढा जीवनास आवश्यक, दैवी जीवनाला चिंतन तेवढेच आवश्यक ! श्वासोच्छ्वास दैहिक आरोग्याचे रक्षण करतो, तर चिंतन आत्मिक समाधान देते. या आत्मिक संतोषाच्या पार्श्वभूमीवर भौतिक विषयांचे सहज अनुभव घेतल्यास विषयानुभव आपणांस बध्द करीत नाहीत.

शब्दादि विषय, त्यांना इंद्रियाद्वारे अनुभवणे हेच जीवन ! हे अनुभव आपणांस बांधून टाकण्याची शक्यता आहे. तसे होऊ नये ना ? त्यासाठी भगवच्चिंतन ! जी वस्तु सत्य आहे तिचा अनुभव घेणे हेच भगवच्चिंतन !

एक संत रस्त्याने चालला होता. वाटेत त्याला एक सुंदर घर दिसले. त्याला संतोष झाला. तो पुढे निघाला.

दुसरा एक सामान्य माणूस. त्याच रस्त्याने आला. त्यानेही ते सुंदर घर पाहिले. आपलेही तसले सुंदर घर असावे, असे स्वप्न त्याने पाहिले. त्या स्वप्नांच्या पूर्ततेसाठी आपल्या संपूर्ण जीवनातल्या सुखाची त्याने आहुती दिली. आपल्या अशा स्वप्नांतच तो बध्द झाला.

संत मुक्त. सामान्य मानव आशाजीवी, बध्द ! कारण ? संत भगवच्चिंतक, संसारी माणूस विषय चिंतक !

*निम्मल्लि नीवु तिळिदु नोडिरे अन्यविल्ल काणिरेण्णा !*
*अरिवु निम्मल्लि तद्गत वागि इदे*
*अन्यभावव नेनेयदे तन्नोळगे ताने*
*एच्चत्तरियलु बल्लरे तन्नल्लि तन्मय*
*गुहेश्वर लिंगवु.*

**भावार्थ :** तुमच्यामध्ये तुम्ही जाणुन पाहिले तर अन्य असे कांहीच नाही. जाणीव तुमच्यांत तद्गत होऊनच आहे. अन्य भाव न आठवतां आपल्या अंतरंगातच आपण जागृत असूं तर आपणामध्यें तन्मय अशा गुहेश्वर लिंगाला तुम्ही जाणूं शकाल !

भगवंताला जाणण्यासाठी कोठेही जायला नको. शास्त्रांचे अति अध्ययन नको. देह विनाशक मन:स्वाध्यहारक तपश्चर्येची आवश्यकता नाही. तुमच्या अंतरंगातच सत्य अंतर्भूत आहे. देह मन यांच्यामध्येच, त्यांना विलक्षण असा देव लपला आहे. आपल्या अंतरंगातच खोल बुडून त्याला शोधावे. भावरूपी तरंग दूर सारून त्या देवाचा अनुभव घ्यावा. तेथे भेद नाही. गुरुशिष्य कल्पना नाही. दृश्य-द्रष्टा भाव नाही. त्याचा अनुभव घेणे हाच महा चमत्कार ! असाध्य ते साध्य ! भेद विश्वाच्या प्रभावाला बळी न पडणारी स्थिति !

जपान देशांत एक संत उपदेश करीत होता. श्रोतृवर्ग उपदेशामृतात डुंबत होता. तल्लीन झाला होता. त्या संताचे मधुर बोल ऐकताना देहभान

विसरले होते. त्याठिकाणी एक सिध्द साधक आला. त्याने पाहिले कितीतरी लोक मंत्रमुग्ध होऊन ऐकत आहेत. तो मत्सराने पेटून उठला.

"तुला काय समजते म्हणून तूं उपदेश करीत आहेस ! तूं एक शतमूर्ख आहेस, तुझ्या अंगी दैवी सामर्थ्य असेल तर एक चमत्कार करून दाखव !"

तो संत म्हणाला, "मला कांही माहित नाही. मला चमत्कार माहित नाही. हवे तर आपण चमत्कार करा !"

सिध्दी साधक नदीच्या ऐलतीरावर उभा राहिला, पैलतीरावर त्याने आपल्या शिष्याला उभे केले. त्या शिष्याच्या हातांत एक कागद दिला. इकडे गुरुने एका कागदावर कांही मजकूर लिहिला. पैलतीरावरील शिष्याच्या हातावरील कागदावर ते उमटले होते. हजारो जणांना आश्चर्य वाटले होते. सर्वजण आनंदातिरेकाने हर्षोद्‌गार काढू लागले, "खरा गुरु हाच !" असे त्यांना वाटले. त्या सिध्दाला आनंद झाला. तो आढ्यतेने संताला म्हणाला, "आतां तुझी पाळी ! चमत्कार करून दाखव नाहीतर उपदेश सोडून दे."

संत म्हणाला, "मी लहान सहान चमत्कार करूं शकतो. उदा. भूक लागली तर मी जेवतो, तहान लागली तर मी पाणी पितो. तूं जशी माझी भर्त्सना केलीस तसे जन माझी निंदा नालस्ती करूं लागले की मी तत्क्षण क्षमा करतो. विसरून टाकतो. माझ्या दृष्टीने अन्न व पाणी हा देवाचा प्रसाद ! मी तो स्वीकारतो. निंदा नालस्ती सामान्य घटना, ती देवाची इच्छा समजून ते मी विसरतो. जणू कांही घडलेच नाही इतक्या सहजतेने !"

हे दिव्य जीवन सहज-सामान्य जीवन ! असे जीवन जगणे हाच दैवी चमत्कार ! मी बोलतो, तुम्ही ऐकत आहांत, या दोन्ही क्रियेमध्ये 'मी'

भावस्पंदन होणार नाही. इतक्या सहजतेने मग्नता झाली तर तो दैवी चमत्कार. प्रवचन संपल्यानंतर सांगितलेले ऐकलेले सर्व कांही, आणि सांगणाऱ्या मलाही पूर्णपणे विसरून जाणे हा सुध्दा दैवी चमत्कारच ! ''कोणी कोणी ऐकले, मी काय काय सांगितले ? हे कांही ही न आठवता मी गेलो तर तो खरा प्रवचन चमत्कार ! जीवनामध्ये देणे घेणे, मिळविणे, उपयोग करणे अनिवार्य ! पण ते सर्व जेवढ्यास तेवढेच असावे. ते आपल्या अंतरंगाला व्यापून राहू नये ! जीवनाच्या अखेरच्या क्षणापर्यंत ते शिल्लक राहू नये. हेच निराभार जीवन ! निश्चित निरामय जीवन ! हेच भगवच्चिंतनाचे प्रतिफळ होय ! परिणाम होय !''

आपण सर्वजण सुशिक्षित आहांत, सुसंस्कृत आहांत. मी तुम्हाला वेगळे काही सांगितले असे नव्हे, तुमचे मनोगत, तुमची मनीषा माझ्यामार्फत अभिव्यक्त झाली इतकेच. आपणा उभयतांमधील सद्‌भाव सद्‌चिंतनाचे कारण होय.

पूर्वकालीन अनुभावी जनांनी चिंतनाला फारच महत्व दिले. तैत्तरीय ऋषी म्हणतो, ''दम शम साधना कर, सत्य कारूण्य यांची कास धर. योग आराधना कर, स्थूल सूक्ष्म कोणतीही साधना कर. गृहस्थ अथवा संन्यास जीवन जग ! पण एकमात्र विसरू नकोस, ते म्हणजे स्वाध्याय प्रवचन !''

संपूर्ण आयुष्यभर दररोज स्वाध्याय-प्रवचन चालावे. आपण एकट्यानेच आचरिले तर तो स्वाध्याय ! चार सह्रदयी जनांसमवेत केले तर ते प्रवचन. निदान दिवसांतून एकदां तरी ! शिवशरणांनी अशाच पध्दतीने अनुभाव आचरिला. नित्य ! नित्य ! कायक; कायका नंतर अनुभाव ! अर्चन ! अर्चनेबरोबर अनुभाव चिंतन ! त्यामुळे त्यांचे जीवन देव-प्रसाद झाले. प्रपंच

परमार्थ दोन्ही वेगवेगळे नव्हेत. दोन्ही एकच ! स्वाध्याय-प्रवचन समवेत क्रियाशील सत्यशील जीवन !

सत्य एकदां स्वीकार केल्यानंतर ते एखाद्या क्षणापुरते सीमित झाले तर कसे ? सकाळी एक तास सत्य बोलायचे; नंतर व्यवहार ? ती सत्याची साधना नव्हे. परमार्थ चिंतन ही तसेच. तेही कालपरिमित असून चालत नाही. संपूर्ण जीवनांत ते व्यापून राहिले पाहिजे. शांतिसमाधानाने असणे हाच परमार्थ असे समजून वर्तन केले तर आपण कोणतेही कार्य केले तरी ते समाधान संपूर्णपणे नष्ट होऊ नये ! या चिंतनाचा उद्देशही तेवढाच आहे. सत्याच्या परिभावनेने माझे तुमचे जीवन व्यापून टाकावे, उजळून टाकावे.

सत्याचे चिंतन अध्यात्म ! त्या अध्यात्माचा आपण समारोप करूं नये. वैयक्तिक जीवनांत हे अध्यात्म रूढ झाले पाहिजे हाच चिंतनाचा समारोप. हे समूह चिंतन आज संपले तरी वैयक्तिक चिंतन अव्याहतपणे चालावे. ते कधीही संपू नये.

श्रीरामकृष्णाश्रमाचे प्रमुख परमपूज्य श्री सोमनाथानंदजी आज येथे आले आहेत. त्यांच्या अध्यक्षतेमध्ये या ज्ञान यज्ञाची सांगता होत आहे. वयोवृध्द. सत्तर ऐंशी वय असेल त्यांचे ! इतका सुदीर्घ काळ अन्य कशाचेही चिंतन न करता उपनिषदांच्या चिंतनामध्ये त्यांनी आपले संपूर्ण जीवन वाहिले. त्यांच्या पवित्र अध्यक्षतेखाली समारोप होत आहे हे विशेषच.

आपले परमपूजनीय जगद्गुरु श्री शिवरात्री देशिकेंद्र महास्वामी महाराजांचे सानिध्य या समारंभाला लाभले आहे, श्री स्वामीजी, अंतरंग-बहिरंग शुध्द असलेले. लाखो भक्तवृंद त्यांना लाभला आहे. शेकडो संघ

संस्था. लक्ष्मी-सरस्वती त्यांच्या हातांत आहेत. पण त्याविषयी कसलाही भाव नाही. निरभिमान म्हणजे निरभिमान ! ज्ञान निष्ठा अगाध ! अनुभव साधना निरंतर ! त्यांना जवळून जाणून घ्यायची संधि लाभली. बोलणे मित-मधुर औदार्य. जाती मत वगैरे भेन न जाणणारे हृदय ! खऱ्या अर्थाने गुरु ! यांच्या अनुग्रहाच्या सावलीमध्ये यांच्या आश्रयाखाली शैक्षणिक क्षेत्र विकसित झाले आहे. साहित्य फुलले आहे. जीवन पावन करणाऱ्या दिव्यत्व देणाऱ्या आध्यात्मिक कार्यक्रमांना श्रींचे विशेष पोषण लाभले आहे.

आपण सर्वजण नित्य नेमाने या ठिकाणी आलांत. या ज्ञान यज्ञामध्ये सहभागी झालांत. आपण बहुश्रुत, जाणते, अनुभव अभिव्यक्ति यांमध्ये थोर. आतांच आपल्यापैकी तीघा विद्वानांची भाषणे ऐकली. सारासार निरूपण करण्याची अद्‌भुत कला. विनयपूर्ण भाषा. आध्यात्मिक औन्नत्य जाणून हर्षित होणारी साधना. आपणां समवेत एक महिनाभर राहण्याची संधि मला लाभली. याचा मला अभिमान होतो. आपणांस पाहून, आपले बोलणे ऐकून मला खूपच शिकायला मिळाले.

आतां परमपूज्य श्री इम्मडि शिवबसव स्वामीजी विषयी सांगायचे आहे. ते खऱ्या अर्थाने विद्वान ! निश्चल मनोभाव असलेले अंतर्मुखी. अनुभावी. बोलणे स्पष्ट. मधुर हृदय. अभिनिवेशाला तिळमात्रही स्थान नाही. 'श्रीं' चा स्नेह संग लाभाला हे भाग्यच होय.

अनेक साधुसंत, गुरु रोज या ठिकाणी आनंदाने श्रवण करायला आले. म्हैसूर शहरांत आगाध ज्ञानसाधक आहेत. गाढ अध्ययन, सखोल चिंतन, अन्वेषण. सर्वजण भरलेल्या घागरीप्रमाणे, ज्ञानपूर्ण !

आपणां सर्वांना पाहून भारत देशाच्या अप्रतिम विद्येचे दर्शन घडले. मेधा दर्शन आणि अनुभावदर्शन प्राप्त झाले.

परम पवित्र सकल गुरुवृंदांना आणि आपणां सर्वांना अनंत वंदन !





# पूज्य श्री. सिध्देश्वर स्वामीजी

विजापूरच्या श्री. ज्ञानयोगाश्रमाचे पूज्य 'श्री' बालपणींच भगवंताच्या शोधांत, लिंगैक्य वेदांत केसरी श्री. मल्लिकार्जुन महाशिवयोगी यांचे सांनिधि आले. पू. श्री. मल्लिकार्जुन महाशिवयोगीश्वरांनी, शिवयोग साधने बरोबरच, वेद, आगम, उपनिषदें, योगसूत्र, भगवद्‌गीता, वचनशास्त्र इत्यादींच्या ज्ञानाचा अमोल ठेवा श्री सिध्देश्वरांच्या हातीं सुपूर्द केला.

तत्वज्ञान विषयांत एम. ए. पदवी संपादन करून श्री सिध्देश्वर स्वामीजीनी जगतांतील सर्व धर्मग्रंथांचे सखोल अध्ययन केले. सर्व धर्मकेंद्राचा अभ्यास केला. गांधीवाद, समाजवाद, भांडवलशाही, लोकशाही, राजशाही इत्यादी सामाजिक व राजकीय विचारधाराही अवगत करून घेतल्या.

निसर्गाविषयीं भगवंतायेवढीच श्रध्दा व प्रेम बाळगणारे 'श्री' अत्यंत साधे, निरागस, विनयशील, मधुर स्वभावाचे ! कन्नड, इंग्रजी, मराठी व हिंदी या भाषांचे प्रकांड पंडित असून 'श्री' नी कन्नड व इंग्रजी भाषेंत अनेक ग्रंथांची रचना केली आहे. अनेक पाश्चात्य देशांमध्ये त्यांची व्याख्याने झाली आहेत. 'श्री' च्या प्रवचन माधुर्यांत श्रोत्यांना ब्रह्मानंदाचा अनुभव लाभतो.

"भगवच्चिंतन" हे या अध्यात्म प्रवचनांचे संकलन, भगवद्दर्शनासाठीं मार्गदर्शक ठरले आहे.